

॥ श्रीगणेशायनमः ॥ ॥ श्रीकृष्णायनमः ॥

# श्रीज्ञानेश्वरी-सुबोधिनी

## अध्याय दुसरा

## सांख्य योग

**संजय उवाच ।**

**तं तथा कृपयाविष्टमश्रुपूर्णाकुलेक्षणम् ।**
**विषीदन्तमिदं वाक्यमुवाच मधुसूदनः ॥ १ ॥**

[तं = अर्जुनाला. कृपया = कारुण्यम् , करुणा, घृणा, कृपा, दया, अनुकम्पा, अनुक्रोशः इति ७ करुणस्य। आविष्टम् = ग्रस्त. कृपयाविष्टम् = दयारूपी भुतानें पछाडलेला, पूर्ण व्याप्त, क्षुब्ध, विव्हल, गुंतागुंत झालेला, गढून गेलेला. अश्रुपूर्ण = अश्रु–नेत्रोदक, अस्रु, नेत्रांबु, रोदनम् , अस्रम् , अ ु इति ५ (नेत्रोदकस्य)। पूर्ण, पूरितः इति २ पूर्णस्य। आकुल इक्षणम् = (व्यस्तः, अप्रगुणः, आकुलः इति ३ आकुलस्य।); इक्षणम् = नेत्र, (लोचनम् , नयनम् , नेत्रम् , ईक्षणम् , चक्षुः , अक्षिः , दृक् , दृष्टिः इति ८ नेत्रस्य।). विषीदन्तम् = (विषदंत = नाग. विष + शृंगिन् = गांधील माशी). विषद् = श्रमणें, दमणें, दुःखामुळें मट्दिशी खालीं बसणें, हताश होणें, निराश होणें.–[विलपति, हसति, विषीदति, रोदिति, चंचति, मुंचति तापम्–(गीतगोविंद ४)]. विषद् (क्रि.) = दमवणें, खर्चणें, रिकामा करणें, निराश होणें, निरुत्साही होणें, दुःख देणें, त्रास देणें, विषाद, पूर्ण निराशा, विषण्ण, फेंकला जाणें, टाकला जाणें. दंत–केकिताक्ष्यौं मयूरगरुडौ अहिभुजौ, दन्तः। द्विजः–विप्रेत्युपलक्षणं क्षत्रवैश्ययोः, अण्डजाः पक्षिणः एतेद्विजः। विष्णुहरौ छगोबस्तः एते अजाः। वाक्यम् = ("प्रकृतिसिद्धमिदं हि महात्मनाम्"–कारकान्विता कारकैः संबद्धा क्रिया वाक्यमुच्यते।). उवाच = (वच्) बोलला. मधुसूदन = १) मधमाशी. २) विष्णूचें रूप. (१. गुणवाचक विशेषण. २. उपाधि.)]

**अन्वय :** तथा कृपयाविष्टम् तम् । (अर्जुनम् , पार्थम्) अश्रुपूर्ण आकुल इक्षणम् । मधुसूदनः। विषीदंतम् तम् अर्जुनम् । इदं वाक्यम् उवाच ।

**अर्थ :** त्याप्रमाणें दयेनें घेरलेल्या (त्या अर्जुनाला)–ज्याचे नेत्र अश्रुपूर्ण झाल्यामुळें सर्व देखणें हेंच आवरिलें आहे ज्या अश्रूंनीं–अशा त्या (पार्थाला) अर्जुनाला–ज्याचें मन विषादानें घेरलें आहे अशाला, श्रीभगवान् मधुसूदन (असें बोलिलें–"हे वाक्य" बोलिले)–खालीं दिलेलें वाक्य बोलिले—(१).

**मग संजय म्हणे रायातें । आईकें तो पार्थ तेथें ।**
**शोकाकुळित रुदनातें । करित असे ॥ १ ॥**
**तें कुळ देखोनि समस्त । स्नेह उपनलें अद्भुत ।**
**तेणें द्रवलें असें चित्त । कवणेपरी ॥ २ ॥**
**जैसें लवण जळें झळंबलें । नातरि अभ्र वातें हाले ।**
**तैसें सधीर परि विरमलें । हृदय तयाचें ॥ ३ ॥**
**म्हणौनि कृपा आकळिला । दिसतसे अति कोमाईला ।**
**जैसा कर्दमिं रुतला । राजहंस ॥ ४ ॥**
**तयापरि तो पांडुकुमरु । महामोहें अतिजर्जरु ।**
**तें देखोनि श्रीसारंगधरू । काय बोले ॥ ५ ॥**

रायातें = धृतराष्ट्रातें. संजयो = संजय. शोकाकुळित–शोकाकुल = शोकानें ग्रस्त, दुःखानें, खेदानें व्याप्त, विव्हळ, क्षुब्ध. करीत असे = करून आहे, करिता झाला. रुदनातें (रोदन = रडणें, अश्रु) (शोकस्य–मन्युः; शोकः, शुक् इति ३).–(१). स्नेह उपनले ( = उपजले) अद्भुत ( = अपूर्व) = अपूर्व स्नेह उपजलें, निपजलें, उत्पन्न झालें. तेणें द्रवलें ( = विरघळलें, पाझरलें, वितळलें) असें चित्त = चित्त वितळलें, पाझरलें, विरघळलें, द्रवलें. कवणेपरि = कशा रीतीनें (२). लवण = मीठ (सौंदर्य, तेज, खारटपणा, समुद्र, रुचकर). झळंबलें = विरघळलें. नातरि = ना. अभ्र = ढग, आकाश, (अभ्रक, सोनें, कापूर, शून्य ही संख्या). वातें = वाऱ्यानें, देहस्थ वात, धातु, वारा, वायु (वाहिलेला, जाणारा). सधीर = धैर्ययुक्त, धीट, निर्भय, निश्चल, शांत, गंभीर, (धीर = समुद्र, परमेश्वर :: राग आवरणारी स्त्री). विरमलें = विरघळलें, थांबलें, विसांवलें. हृदय = छाती, काळीज, मन, इच्छा, जीवितरहस्य, प्रीति. विरमलें हृदय तयाचें = त्याचें मन द्रवलें, विरघळलें (३). म्हणौनि–म्हणोनि. कृपा = ममतेनें, आदरानें, गर्वानें; स्वार्थदृष्टि, ममत्व. कृपेनें = (कृपा, दया, अनुकम्पा, करुणा). आकळिला = धरिला, पकडला, लक्षांत घेतला गेला, समजला. (इषत् कलः काकलीति। मधुरः श्रुतिसुखः, म चासावस्फुटोऽवक्ताक्षरः, एतादृशे ध्वनौ कल इति।). दिसतसे (विपीदंतम्) अति कोमाईला = म्लान झालेला, खिन्न, थकलेला. जैसा कर्दमिं = चिखलामध्यें. कर्द, कर्दम = चिखल, गाळ. (निषद्वरः, जम्बालः, पङ्कः, शादः; कर्दमः इति ५ कर्दमस्य।). रुतला = रुपला, खुपला,–डोळ्यामध्यें जसें बारीक शल्य खुपतें; अति जर्जर होतो. राजहंस = चोंच व पाय तांबडे असलेला शुभ्र असा हंस. भानु हंसः सहस्रांशु (सूर्य). हंसः श्वेतगरुत्, चक्राङ्गः, मानसौकाः इति ४ हंसस्य । ये सिता देहेन शुक्लाः; चञ्चुचरणैर्लोहितैरुपलक्षिता हंसास्ते राजहंसाः स्युः इति १ । कादम्बः कलहंसः इति २ कादम्बस्य । कादम्ब = बदक, बाण, ऊंस, कदंब. कल = १. अस्पष्ट व मधुर शब्द, मंजुळ वाजणारे. २. गणना करणें, शब्द करणें. ३. हांकून देणें, पळविणें, फेकणें, ढकलणें, प्रेरणा करणें. ४. जाणें, पावणें, जाणणें, लेखणें, ताब्यांत आणणें, ग्रासणें, मोजणें. कलकंठ–कलकंठी = कोकिळ, पारवा, हंस (४). पांडुकुमरु–पांडुकुमर. महामोहें [ = मोह शोक (द्वंद्व) लोभ मोह मद मत्सर इत्यादि (षड्रिपु). महा = महत, वियत्, महान्त. महत् = राज्यं चकारात् बृहच्च महत्. महत् = विस्तीर्ण = विशङ्कटम्, पृथु, बृहत्, विशालम्, पृथुलम्, महत, वड्रम्, उरु, विपुलम्, इति ९ विस्तीर्णस्य।]. जर्जरु–जर्जर = ग्रस्त, अर्धवट उच्चारलेले, जर्जरित, झिजलेले, वृद्ध, जर्जरिक. महामोहें अति जर्जरु = षड्रिपुमधला जो मोह त्यानें अति व्याकुळ झालेला. तें देखोनि–देखोनि. श्रीसारंगधरू–श्रीशार्ङ्गधर = श्रीकृष्ण. (सारंग = सारंग. तोकक, चातक इति ३ चातकस्य। सारङ्ग पुंसि हरिणे चातके त्रिषु शबले. सारङ्गाश्चातकाः । देवा अपि दिवौकसः । शृंगारादौ शृंगारवीर करुणादौ नवविधे । विषे गरले । वीय तेजसि। गुणे स्वाद्वम्लादौ। रागे द्रवे सर (रसः) शब्दः स्यात्. काय बोले = असें म्हणत आहेत की–(५)

संजय म्हणत आहे कीं—अर्जुन कृपेनें घेरला-अश्रुपूर्ण (नयन) दृष्टीचा झाला आहे-(१)

समस्त कुळ पाहून अद्‌भुत स्नेह उपजलें, चित्त द्रवलें-(२)

मीठ पाण्यानें झळंबलें, अभ्र वाऱ्यानें हालले जसें; अर्जुन धीरवान, पण त्याचें सधीर हृदय विरमलें, (थाबलें, विसावलें)-(३)

कृपेनें आपलासा केला-(आकळिला) जसा कर्दमीं राजहंस रुतला, तसा तो दिसत आहे-(४)

पांडुकुमर मोहानें आज जर्जर झालेला पाहून देव (काय) म्हणाले कीं-(५)

**श्रीभगवानुवाच ।**

**कुतस्त्वा कश्मलमिदं विषमे समुपस्थितम् ।**
**अनार्यजुष्टमस्वर्ग्यमकीर्तिकरमर्जुन ॥ २ ॥**

[कुतः त्वा = कुठून आले तुज. इदं कश्मलम् = कलंक लावणारें दुःख-मोह, पाप, भीति. कश्मल = सुकून जाणें, चेहरा गोरामोरा होणें, चेहरा पडणें. (क्लान्त, ग्लानि (ने), म्लान). विषमे = प्रतिकूल, विपरित. समुपस्थितम् विषमे = संग्राम व पापभीति असें विषम. सम × विषम (द्वंद्व). स्त्रीपुरुषयुग्मस्य द्वंद्वस्य। प्रकृति = स्वभाव, स्वरूप. शरीररूपी अधिदैवत = प्रकृति प्रधान म्हटली. कश्मल विषम = येथें चेहराच मुळीं तुझा हरवला जात आहे. अनार्य = अनिष्ट, असभ्य, नीच. जुष्टम् = पीडा करणारें, उष्टें सेविलेलें. अस्वर्ग्यम् = स्वर्गप्राप्तीस विघातक. अकीर्तिकरम् = फजिती, अप्रतिष्ठा करणारें.]

**अन्वय :** अर्जुन। त्वाम्-त्वा-कुतः इदं विषमे समुपस्थितम् कश्मलम् । अनार्यजुष्टम् । अस्वर्ग्यम् । अकीर्तिकरम् ।

**अर्थ :** हे अर्जुना! तुजला हें कुठून बरें चेहरा पडणेचें होणें आलें आहे तें!—असें कलंक लावणारें दुःख-मोह, पाप भीतीचें हें अनिष्ट, असभ्य, नीच, पीडा करणारें, उष्टें सेविलेलें, स्वर्गप्राप्तीस विघातक असें फजिती-अप्रतिष्ठा करणारें तें-(१).

**म्हणे अर्जुना आदिं पाहिं। हें उचित काय यियें ठाईं।**
**तूं कवण हें कायी। करीत आहासि ॥ ६ ॥**

**तुज सांगें काय जालें। कवण उणें आलें।**
**करितां काय ठेलें। खेद कायेसा ॥ ७ ॥**

**तूं अनुचिता चित्त नेदिसि। धीर कंहिं न संडिसि।**
**तुझेनि नांवें अपेसी। दिशा लंघी ॥ ८ ॥**

**तूं शूरवृत्तीचा ठावो। क्षेत्रियांमाजि रावो।**
**तुझिया लाटेपणाचा आवो। तिहिं लोकिं ॥ ९ ॥**

**तुंवा संग्रामिं हरू जितिला। निवातकवचांचा ठावो फेडिला।**
**पवाडा तुंवा केला। गंधर्वासीं ॥ १०० ॥**

यियें-इयें ठायीं = रणांगणावर. करीत आहासि = करीत आहेस-(६). तुज काय जाहालें-जालें-झालें (= असणें, होणें, जाणें, प्रकाशणें, घेणें). कवण उणे (= कमी) आलें = (कमनीय, इच्छिण्यास योग्य). कम् = प्रेम करणें, इच्छिणें. उणे आलें = संतुष्ट होणें तें राहिलें, अद्याप होणेंचे आहे. करितां काय ठेलें = (राहिलें), थांबलें, स्तब्ध झालें, थांबविलें गेलें. खेद (= थकवा, श्रम, ग्लानी, शोक, दुःख). कायेसा-

कायिसा ( = काय म्हणून! कशाकरितां तो! दुःख शोक)-(७). तुझेनि नांवें अपेसी-तुझेनि नामें अपयशी. तुझेनि नांवें = तुझ्यापुढें. अपेसी = अपयशानें, अपेशानें. अपयशी = अपकीर्तीनें. दिशा लंघी-दिशा लंघिजे. दिशा = क्षितिज, आशा. (पूर्वा दिक् प्राची। दक्षिणा दिक् अवाची। पश्चिमा दिक् प्रतीची। उत्तरा दिक उदीची। "दिश्यो हस्ति"-"दिश्या हस्तिनी"। ८ दिग्गजाः = ऐरावतः, पुण्डरीकः, वामनः, कुमुदः, अञ्जनः, पुष्पदन्तः, सार्वभौमः, सुप्रतीकः, इति ८ क्रमात् दिग्गजाः। ८ करिण्यः = अभ्रमु, कपिला, पिङ्गला, अनुपमा, ताम्रकर्णी, शुभ्रदन्ती, अङ्गना, अञ्जनावती एताः ८ करिण्यः। १) प्राच्यै दिशे इंद्राय नमः, २) आग्नेय दिशे अग्नये नमः, ३) दक्षिणे दिशे यमाय नमः, ४) नैऋते दिशे नैऋताय नमः, ५) प्रतीचे दिशे वरुणाय नमः, ६) वायव्यै दिशे वायवे नमः, ७) उदिचें दिशे सोमाय नमः, ८) इशान्यै दिशे ईश्वराय नमः। लंघिजे = हद्दपार व्हावें-(८). ठावो = ठिकाण, स्थल, जमीन. शूरवृत्तीचा = शौर्याचा, पराक्रमाचा, वीर्याचा, शक्तीचा-स्वरूप, आकार = लाटेपणाचा. रावो = 'र' व = गुंजारव, आवाज, गर्जना, स्वामी, राजा. तुझिया लाटेपणाचा आवो ( = डौल, प्रतिष्ठा, आश्रय, कायमपणा, अधिकार, अढळस्थान). तिहिं लोकिं = स्वर्ग, मृत्यु, पाताळ-(९). हरू-हर = शंकर. (नीललोहितः, हरः, स्मर हरो, भर्गः, त्र्यम्बकः। जिंतिला-जिंकिला. निवातकवचांचा ठावो-ठाय फेडिला = मागमूस नाहींसा केलास. पवाडा = गाण्याचा विषय. गंधर्व = १) दिव्य गायने गंधर्वः, देवानां गायनाः गंधर्वाः, देवयोनि संज्ञक गंधर्वः। २) अश्व, गंधर्व, वाजी, वाहः, अर्वा, हयः, सैंधवः, सप्तिः इति १३। ३) गंधर्व मृगभेदः-सुरयोनि आंगे आठ। उर्ध्वाचि॥ १०५-१४॥-(१०).

अर्जुनाच्या स्थितीसंबंधीं विचारपूस—कुठून हे अर्जुना, तुजला असलें हें कलंक लावणारें दुःख-मोह, पाप, भीति, कश्मल आलें आहे!- अशा वेळेस हें असलें अनार्य, अनिष्ट, असभ्य, नीच, पीडा करणारें, उष्टें सेविलेलें, स्वर्गप्राप्तीस विघातक, अकीर्तीकर, फजिती, अप्रतिष्ठा करणारें हें बरें नाहीं. अगोदर असें पाहा कीं, ह्या संग्रामसमयीं ह्या ठिकाणीं असें हें रुदन करणें तुला योग्य आहे काय?-तूं कोण आहेस, व हें असें काय करीत आहेस!-(६)

तुला काय झालें आहे तें सांग-तुला काय कमी पडलें आहे तें-? कोणतें काम तुझेकडून होण्याचें राहिलें आहे?-व आतां त्यासंबंधीं खेद तो कां?-(७)

भगवंतांनीं अर्जुनास धीर दिला-अर्जुनाची स्तुति : जें योग्य नाहीं तेथें तूं केव्हांहि चित्त देणारा नव्हेस-तूं केव्हाहि धीर सोडलेला नाहींस, तुझें नांव ऐकल्याऐकल्याच अपयश तें दिगंताच्याहि पलीकडे जाणारें-(८)

तूं शूरवृत्तीचा ठाव-क्षत्रियांमध्यें सर्वश्रेष्ठ-तुझ्या शौर्याचा-लाटेपणाचा धाक तिन्हि लोकीं-(९)

तुंवा संग्रामीं हर जिंकलास, निवातकवचांचा ठाव-ठिकाणाच कीं नाहींसा केलास, गंधर्वासी तुवां पराक्रम (पवाडा) केलास-(१०)

**हें पाहातां तुझेनि पाडें। दिसे त्रैलोक्यहि थोकडें।**
**ऐसें पुरुषत्व चोखडें। पार्था तुझें ॥ ११ ॥**

**तो तुं किं आजी येथें। सांडुनियां वीरवृत्तीतें।**
**अधोमुख रूदनातें। करित आहासि ॥ १२ ॥**

**विचारीं तू अर्जुनु। किं कारुण्ये किजसी दिनु।**
**सांग पां अंधकारें कां भानु। ग्रासिला आथीं ॥ १३ ॥**

**ना तरि पवन मेघातें भीये। किं अमृतासी मरण आहे।**
**पाहे पां इंधनचि गिळुनि जाये। पावकातें ॥ १४ ॥**

**किं लवणेंचि जळ विरे। संसर्गें काळकुट मरे।**
**सांगे महाफणि दर्दुरें। गिळिजे कायी ॥ १५ ॥**

हे पाहातां–पाहाता. पाडें = तुलनेनें, बरोबरीनें. थोकडें = लहान. पुरुषत्व = (पुंभावे पुरुषस्य भावे तत्क्रियायां पुरुषस्य कर्मणि पौरुषम्।) (११). वीरवृत्तीतें सांडुनियां = पराक्रमी शूर अशा वृत्तीस सांडून, टाकून. वृत्ती = स्थिति, क्रिया, सेवा, व्यवहार, मनःस्थिती. अधोमुख = खालीं तोंड घालून. रुदनातें करित आहासि = रोदन करीत आहेस–(१२). विचारी = विचार कर. कारुण्ये किजसी दिनु = करुणेनें दीन केला गेलास. अंधकारें कां–अंधकारे भानु ग्रासिला आथि = सूर्य काय अंधकारानें कधि ग्रासिला आहे काय?–(१३). पवन मेघातें–मेघासि भिये–बिहे = काय वारा मेघास भितो? अमृतासी मरण आहे = अमृत मरणारें नव्हें. ईंधनचि गिळुनि–गिळोनि जाये पावकाते = इंधन–जळण–कधींतरी अग्नीस गिळून टाकील काय? कधींहि नाहीं–(१४). लवणेंचि जळ विरें = मिठानें पाणी विरघळलें असें नाहीं. संसर्गें काळकुट मरे = संसर्गानें विष कालकूट–सर्व विषांमध्यें अति जलाल असें तें मरणारें नव्हें. सांगे पां–सांग पां–महाफणि दर्दुरें गिळिजे कायी = मोठा नाग काय बेडकाच्यानें गिळिला म्हणावा–तर तसें होत नाहीं–(१५).

तुझा मोठेपणा पाहावा (तुला पहावें) तो, त्रैलोक्यहि लहान असेंच! असें तुझें चांगलें पुरुषत्व–(११)

वीरवृत्ति सोडून तूं आतां खालीं मान घालून शोक करीत आहेस! (१२)

अर्जुनास उपदेश :: हे अर्जुना! तूं विचार कर! (दयेमुळें) कारुण्यामुळें तूं तर दीनपणा स्वीकारीत आहेस! अरे बाबा! (सूर्य कधींहि अंधकारानें ग्रासला जाणार नाहीं.)–सूर्य कधीं तरी अंधकारानें ग्रासिला होतो काय!–(१३)

वारा मेघास भीत नाहीं! अमृत केव्हांहि मरत नाहीं! इंधन केव्हांहि अग्नीस खाणारें नव्हें! (१४)

मिठानें पाणी कधींहि (विरघळणार नाहीं)-विरघळणारें नव्हें! कालकूट संसर्गानें केव्हांहि मरणारें नव्हें! महानाग, केव्हांहि बेडकानें गिळिला जाणारा नव्हें–(बेडूक काय महानागास गिळील!)–(१५)

**सिंहासि झोंबे कोल्हा। ऐसा अपाड आथी कां जाला।**
**परि तो तुंवा साच केला। आजी येथें ॥ १६ ॥**

**म्हणोनि आइकुणि अर्जुना। झणें चित्त देसी या हीना।**
**वेगिं धीर करूनि मनां। सावधान होयिं ॥ १७ ॥**

**सांडि हें मूर्खपण। उठीं घे धनुष्येबाण।**
**संग्रामीं हें कवण। कारुण्य तुझें ॥ १८ ॥**

**हां गा तूं जाणता। तरि न विचारिसि कां आतां।**
**सांगें झुंझावेळें सदयता। उचित कायी ॥ १९ ॥**

**हे असतिये कीर्तिसि नाशु। आणि परत्रिकांसि अपभ्रंशु।**
**म्हणे श्रीजगन्निवासु। अर्जुनातें ॥ २० ॥**

सिंहासि झोंबे कोल्हा = कोल्हा सिंहाबरोबर झोंबी करूं लागला. ऐसा अपाड आथी कां जाला–जाहला = अद्भुत चमत्कार–विचित्र गोष्ट–विलक्षण प्रसंग, असा नच समतोल, नच बरोबरीचा. परि तो तुंवा–परि तो त्वां साच केला आजी येथें एथ = कुठचा खरा पण तो तुंवा येथें खरा करून दाखविला–(१६).

चित्त देसी या हीना = कल्पित गोष्टीच्या अशा ह्या दीनहीनपणास, अयोग्यतेस चित्त–अंतःकरण–मन देऊं नको–(१७). मूर्खपण सांडि = मूर्खपण सोडून दे. धनुष्यबाण घे = हातीं धनुष्यबाण घे. कवण हें कारुण्य तुझें संग्रामीं = ह्या रणांगणीं तुझें ममत्व–दयार्द्रतेचें तें करुणतेचें असें होणें हें काय कसचें तें!–(१८). जाणता तूं कां न विचारिसि आतां = शहाणा असा जाणता, ज्ञाता तूं म्हणवितोस–वर हें कां बरें विचारास घेत नाहींस? झुंझावेळें सदयता उचित कायी = संग्रामसमयीं असें सदय हृदय होणें योग्य काय?–(१९). असतिये कीर्तिसि नाशु = पदरांत असलेल्या–असत्या कीर्तीचा, यशाचा, कृपेचा विध्वंस–नाहींसें होणें जें. परत्रिकांसि–पारात्रिकासि. अपभ्रंशु–अपभ्रंश = परमार्थाला, परलोकगतीला मुकणें, परलोकींचा, पुढील कांठचा कनिष्ठपणा–(२०).

सिंहाबरोबर कोल्ह्यानें कुस्ती करणें नाहीं; अपाड तें केव्हांहि होणें नाहीं–विषमतेसम होणारें नाहीं :: पण तें आज येथें तूं खरें करीत आहेस–(१६)

अर्जुना, असल्या हीनदीनपणास चित्त देऊं नको! त्वरित धीराचा हो! मनाला धीर दे! सावधान हो–(१७)

हें असलें मूर्खपण सांड! धनुष्यबाण घेऊन झुंजु लाग; संग्रामाचे ठायीं असलें करुणास्पदतेचें होणें बरें नाहीं–(१८)

तूं जाणता म्हणवितो आहेस, पण तें जाणतेंपण विचारास कां घेत नाहींस–सांग, झुंजवेळेस असें सदयत्व योग्य काय?–(१९)

असें जाणतेंपण सांडणें तें तर तुझ्या असलेल्या कीर्तीचा नाश करील व त्यामुळें परत्राचा अपभ्रंश होईल, असें श्रीजगन्निवास अर्जुनास म्हणत आहेत–(२०)

**क्लैब्यं मा स्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते।**
**क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप ॥ ३ ॥**

[क्लैब्यं = नपुंसकत्व, भित्रेपणा, दुबळेपणा. मा गमः स्म = (स्म = ) नच अंगदे–पतकरूं नको. त्वयि एतद् न उपपद्यते = पदवीचें होत नाहीं, शोभत नाहीं हें तुजला. हृदयदौर्बल्यं क्षुद्रं = मनाचें दुर्बळपण क्षुद्र असें तें. परंतप = शत्रुतापना. त्यक्त्वा उत्तिष्ठ = टाकून देऊन, सोडून देऊन–युद्धास सज्ज हो.]

**अन्वय:** पार्थ, मा स्म गमः क्लैब्यम्। एतद् त्वयि न उपपद्यते। परंतप। हृदयदौर्बल्यं क्षुद्रं त्यक्त्वा उत्तिष्ठ।

**अर्थ:** पार्था, क्लीबता–नपुंसकत्व पतकरूं नको; हें तुला शोभत नाहीं–हे शत्रुतापना! क्षुद्र असें मनाचें तें हृदयीं आलेलें दौर्बल्य काढून टाकून युद्धास तयार हो–(३).

**म्हणौनि शोक न करिं। तूं परता धिर धरिं।**
**हे शोच्यता अव्हेरिं। पांडुकुमरा ॥ २१ ॥**

**तुज नव्हे हें उचित। येणें नासेल जोडलें बहुत।**
**तूं आझुणि वरि हित। विचारिं पां ॥ २२ ॥**

**येणें संग्रामाचेनि अवसरें। येथें कृपाळुपण नुपकरे।**
**हें आतांचि काय सोयरे। जाले तुज ॥ २३ ॥**

**तूं आधीचि काय नेणसि। किं हे गोत्रज नोळखसि।**
**वायांचि काय करिसी। अतिशो आतां ॥ २४ ॥**

**आजि हें झुंझ। कायि जन्मा नवल तुज।**
**हें परस्परें तुम्हां व्याज। सदांची आथी ॥ २५ ॥**

परता-पुरता घिर धरीं = तूं परत धीराचा हो-पुरता धीर धरून ऐस. शोच्यता अव्हेरीं = खेद करणें टाकून दे-(२१). उचित नव्हे हें तुज = हें तुजला योग्य नाहीं. येणें जोडलें बहुत नासेल = ह्या योगें प्राप्तीचें बहुत जोडलेलें असें तें नाहींसें होईल. आझुणि वरि-अझुनि तरी हित विचारी पां = अद्याप तरी तूं हितासंबंधींचा हो-(२२). अवसरे संग्रामाचेनि = संग्रामसमयींचें, युद्धाच्या वेळेस. येथें-एथ कृपालुपण नुपकरे = दयाळू होणें हें इथें उपयोगीं नाहीं. आतांचि काय तुज हे सोयरे जाले-जाहले = ह्याच प्रसंगीं काय ते तुजला सोयरे धायरे वाटूं लागणारे झाले-(२३). आधीचि काय नेणसी = तुजला अगोदर हें माहीत आहेच. गोत्रज नोळखसी = काय ह्या दायादांना ओळखीत नाहींस! वायाचि काय अतिशोअतिशय करिसी = पराकाष्ठेचा असा येथें शोकाचा तो पाल्हाळच जसा वाया-व्यर्थ तो का!-(२४). आजि झुंझ-आजिचे हे झुंझः कायि-काय जन्मा नवल तुज = आजचें युद्ध हें काय तुझ्या जन्माचे ह्या एका आश्चर्य वाटूं लागलें. परस्परें हें तुम्हां व्याज सदाचि आथि = परस्पर कौरव-पाण्डवांना तर हें एक नेहमींच होणारें असें निमित्तच कीं आहे ना!-(२५).

शोक करूं नको! धीराचा हो!-हीनवृत्ति-शोच्यता टाकून दे! (२१).

तुजला शोक करणें हें उचित नाहीं! ह्यायोगें बहुत जोडलेलें तें नासेल! अझुन तुझें हित कशांत आहे तें विचारास घे!-(२२).

संग्रामसमयीं-लढाईच्या वेळेस-कृपाळू होणें तें कांहीं उपकारणें नव्हें; हे गोत्रज आतांच काय तुज सोईरे दिसतात-(२३).

अगोदरच कीं तुला हें माहीत आहेच कीं, हे-गोत्रज!!! येथें पाल्हाळ! अतिशो! तो का! (२४).

आताचें झुंझ म्हणजे आश्चर्य, कौतुक, नवलच एक जन्माचें ह्या! युद्ध असें हें! सदाचे कीं तुम्हां एकमेकांना-क्षत्रियांना-नवलच असें-नवलाचें असेंच होय-(२५).

**तरि आतां काई जालें । कायि स्नेह उपनलें ।**
**हें नेणिजे परि कुडें केलें । अर्जुना तुंवा ॥ २६ ॥**

**मोहो धरिलिया ऐसें होईल । जे असति प्रतिष्ठा जाईल ।**
**आणि परलोक अंतरेल । आहिकेंसीं ॥ २७ ॥**

**हृदयाचें ढिलेपण । येथें निकियास नव्हे कारण ।**
**हें संग्रामीं पतन जाण । क्षेत्रियांसी ॥ २८ ॥**

**ऐसेनि तो कृपावंतु । नानापरि असे सीकवितु ।**
**हें ऐकोनि पांडुसुतु । काय बोले ॥ २९ ॥**

काई जालें-काय जाहालें. स्नेह उपनलें = प्रेम उत्पन्न झालें, ओलावा आला. कुडें केलें नेणिजे हें = समजेना पण हें कांहीं (कुडें) बरें वाईट असें केलेंस कीं-(२६). मोहो-मोह धरिलिया = मूर्खपणाच्या प्रेमाचें वेड, मूर्च्छा, मतिभ्रमाच्या होण्यानें. असति प्रतिष्ठा जाईल = असलेली ती प्राप्ती,-सिद्धि जाईल. ऐहिकेंसीं परलोक-परलोकही-अंतरेल = इहलोकासहित परलोकास मुकशील-(२७) येथें-एथ हृदयाचें ढिलेंपण नव्हें कारण निकियासी = मनाचें दुबळेपण भलेपणाला-चांगुलपणाचें होण्यास कारण होईल असें नाहीं-(२८). कृपावंत सिकवितु-शिकवीत नानापरी = श्रीकृष्ण कृपावंत-दयावंत होऊन, त्यास अनेक तऱ्हांनीं शिकवित आहेत. पांडुसुतु काये-काय बोले = अर्जुन काय म्हणत आहे तें पाहा-(२९).

आतांच काय झालें कीं, कसें (स्नेह) प्रेम उपजलें आहे तें, पण तुवां हें वावडेंपण (कुडें) केलेंस-(२६)

(स्नेह) मोह धरिलास असें होईल, जे का असलेली प्रतिष्ठा जाईल व ऐहिकासहित परलोकासहि अंतरावें लागेल– (२७).

हृदयाचें ढिलेंपण हें हिताचें असें नाहीं, कारण क्षत्रियांना हें पतनच कीं–(२८).

येणें प्रकारें तो कृपावंत भगवान् अर्जुनास अनेक तऱ्हांनीं शिकवित आहे–तें ऐकून पांडुसुत काय म्हणत आहे: पाहा! – (२९)

**अर्जुन उवाच।**

**कथं भीष्ममहं संख्ये द्रोणं च मधुसूदन।**
**इषुभिः प्रतियोत्स्यामि पूजार्हावरिसूदन॥ ४॥**

[कथं=कसे बरें ते. संख्ये=रणांगणीं. इषुभिः=बाणांनीं. प्रतियोत्स्यामि=लढूं–बाणावर बाण सोडूं, लढणाऱ्याशीं लढूं. पूजार्हावरिसूदन=पूजा करण्यास योग्य, श्रेष्ठ असे ते.]

**अन्वय:** हे मधुसूदन। अहं संख्ये पूजार्हा भीष्मं द्रोणं च कथं इषुभिः प्रतियोत्स्यामि तौ द्वौ पूजार्हौ हे अरिसूदन।

**अर्थ:** हे मधुसूदना! रणांगणावर (संख्ये) पूजा करण्यास योग्य असे जे भीष्म, द्रोण ते दोघेहि; म्हणून हे अरिसूदना, त्यांच्या बाणांवर मी बाण सोडूं व त्याजशीं लढूं हें कसें होणारें तें!– तें नच होणारें कीं! तें नच व्हावें कीं!!– (४).

**देवा हें ईतुलेंवरि। बोलावें न लगे अवधारीं।**
**आधीं तुं चित्ति विचारिं। संग्राम हा॥ ३०॥**

**हे जुंझ नव्हे प्रमादु। येथें प्रवर्तलीया दिसतसे बाधू।**
**हा उघड लिंग-भेद। वोडवला आम्हां॥ ३१॥**

**देखें मातापितरें अर्चीजेति। जे सर्वस्वें तोष पाविजति।**
**तियें पाठिं केविं वधिजेति। आपुला हातिं॥ ३२॥**

**देवा संत-वृंद नमस्कारिजे। कां घडे तरी पूजिजे।**
**हें वांचुनि केविं निंदिजे। स्वयें वाचा॥ ३३॥**

**तैसे गोत्रगुरु आमुचे। हे पूजनिय आम्हां नियमाचे।**
**मज बहुत भिष्मद्रोणांचें। वर्तत असे॥ ३४॥**

ईतुलेंवरि–येतुलेवरि = इतकें असें हें (बोलणें नच). न लगे–नलगे = नकोच; आपणास इतकें बोलणें करावें लागत आहे ते कां! अवधारीं = ऐक. आधीं तुं चित्ति विचारिं=अगोदर (हा संग्राम म्हणजे काय) हें विचारास घ्यावें, लक्षांत घ्यावें तुम्हीं कीं–(३०). प्रमादु–प्रमाद = अविचारच एक; मोठी चूकच एक. येथें-एथ. बाधु–बाध = बाधा, दोष. उघड लिंग-भेद वोडवला आम्हां=अहो येथें तर स्पष्टपणेंच कीं थोरा-मोठ्यांचा–पूज्य पुरुषांचा–तो उच्छेद करणें म्हणजे समूळ नाश करणें जें तेंच प्राप्त झालें म्हणावें कीं. लिंग-भेद = (भेद = फितुरी, नाश, द्वैत, बदल, फरक, भिन्नभाव. लिंग = स्त्रीत्व पुरुषत्व भेद, सूक्ष्म देह, ब्रह्मचर्य, मूर्ति, उपाधि, शिवलिंग.) उपाधि, भिन्नभाव. पूज्यपणें पुरुषांचा–मोठ्यांचा, उच्छेद–उच्छेदन = समूळ नाश. (लिंगवृत्ति=धर्मध्वजीः –जीविकार्य जटादि धारणवतः)–(३१).

अर्चिजेति–अर्चिजति = पूजिली जावीत, पूजिली जातात. जे सर्वस्वें–सर्वस्वें तोष पाविजति–तोषु पाववविजती = तोषवावी. वधिजेति–वधिजति. आपुलां–आपुलिया. तिये पाठिं = तें सोडून देऊन, त्याच्या उलट–(३२). संतवृन्द = साधुसमूह [संतत (संत १२६। २) विस्तृत, निरंतर, पुष्कळ, सज्जन, कपडे घालणें, तयार करणें, पहारा, पोषाख, (सज्जनी हत्ती सजविणें). सज्जा = शृंगार, तयारी]. स्वयें वाचा निंदिजे केविं = (स्वयम् = स्वतः, स्वस्फूर्तीनें. वाचा = वाणी, वागिंद्रिय, सरस्वति. निंद = निंदणें). (निंदास्तुति = निंदाद्वारा स्तुति. निंद्य = निषिद्ध, निंदार्ह) (३३). हे पूजनीय–पूजनीय = पूज्य. नियमाचे–नेमाचे ( = नित्यनेमानें) (नेम = अर्धा, अंश, वेळ, मुदत, खड्डा, कपट. नियम = व्रत, आळा घालणें, कायदा, निश्चय, धर्माचरण, प्रतिज्ञा, अट, निर्धार, अष्टांगयोगांतील एक). (नित्य = कायमचें, स्थिर, सनातन; समुद्र; दुर्गा नित्यकर्मन् = रोजचें संध्यावंदनादि कर्म. नित्यप्रलय = झोंप. नित्ययौवना = द्रौपदी). वर्तत असे–वर्ततसे = वाटत आहे (मानमरातबचे ते आहेत असे). गोत्रगुरु = गोत्राचे गुरु, कुलगुरु–(३४).

अर्जुन म्हणतो, अहो जी देवा, हें असें एवढें बोलणें तें कशास करतां! अहो! ऐका कीं, अगोदर तुम्हीं (आपल्या चित्ताचे ठायींच कीं) हा संग्राम तो विचारास घ्या–(३०).

अहो, हें कांहीं युद्ध नव्हे! पण उघड उघड प्रमादच कीं एक, व येथें प्रवर्तल्यास बाध कीं बाधा दिसत आहे! अहो हा तर उघड लिंगभेदच कीं आम्हावर येऊन आदळत आहे!–(३१)

अहो! आईबाप ते अर्चावेत, पूजावेत! सर्वस्वेंकरून संतोषवावेत व नंतर कसें बरें तें आपल्या हातानींच कीं वधावेत ते–! (३२)

देवा! संतवृंद नमस्कारावेत!–अथवा जमल्यास पूजावेत! तसें नच करतां कसें बरें तें आपणच आपल्या वाचेनें निंदण्याचें तें करावेत ते!–(३३)

त्याप्रमाणें, गुरुगोत्र आमचे हे आम्हांस नेमानें केव्हांहि पूजनीयच होत! अहो मला तर ह्या भीष्मद्रोणा-संबंधीं बहुत असेंच कीं वाटत आहे–वर्तत आहे–(३४)

**जयां लागिं मनें विरू। आम्ही स्वप्नीं न शकों धरूं।**
**तयां प्रतक्ष केविं करूं। घात देवा ॥ ३५ ॥**

**वर जळों हें जीयाले। येथ अवघेयांसि हें काय जालें।**
**जेयांचा वधिं अभ्यासिलें। मिरविजे आम्हि ॥ ३६ ॥**

**मी पार्थ द्रोणाचा केला। येणें धनुर्वेद मज दिधला।**
**तेणें उपकारें काय अभारैला। वधिं तयातें ॥ ३७ ॥**

**जेथिंचीया कृपा लाभीजे वरू। तेथें मि मनें व्यभिचारूं।**
**तरि काय मि भस्मासुरू। अर्जुन म्हणे ॥ ३८ ॥**

मनें विरू = मनानें वैर करणें–(वैरभाव वागविणें)–मनानें वांकडें होणें, वांकडें आलें असें होणें. स्वप्नीं –स्वप्नींहि = झोंपेंत सुद्धां (आळसाचे का सुस्तीचे होऊनसुद्धां घात नच करावा). केविं करूं = कोणत्या प्रकारें (करावा घात तो अहो देवा)–(३५). वर जळों हें जीयाले = यापेक्षां जीवित जगणें–(जगणें, जगलेपणा, ज्यालेपणा) हे जळो. (तयाचे जियाले–(ज्यालो) म्हणो कायि। वरि मरण चांग ४. १९३) पै वीरू जयासि येकिजे। आणि या बोलीचि प्राण सांडिजे। ते येथें संग्रामव्याजें उमे आसो ॥ ५३–२ ॥ येथ अवघेयासि–एथ अघवेयासि हें काय जालें–काय जाहलें = ह्या सर्वांना असें हें काय झालें आहे कीं जें. जेयांच्या–जे यांच्या वधीं अभ्यासिले त्याची (अभ्यासिलें मिरविजे =) आम्हीं प्रतिष्ठा मानावी कांहीं. ज्यांच्यापासून आम्हीं शस्त्रविद्या शिकलों, त्यांच्याच वधार्थ तिचा उपयोग करावा काय? (३६).

द्रोणाचा केला=द्रोणाचार्यांनीं शिकवून तयार केलेला शिष्य. (धनुर्वेद=श्रुति, वेद, आम्नाय त्रयी वेदस्य। धनु=धनुः, चापः, धन्व, शरासनम्, कोदण्डम्, कार्मुकम्, इष्वासः, इति ७ धनुषः। अर्जुनाचें धनुष्य=गाण्डीवः, गाण्डिवः, कर्णाचें धनुष्य="कालपृष्टम्") अभारैला-आभारैला=आभारी झालेला-द्रोणानें मजला यजुर्वेदाचा उपवेद जो धनुर्वेद तो शिकविला, त्या उपकारानें काय-मदत, भोगवट, भूषविलेला मी काय-भूषण, आभार झालेला तो- (भूषणं, अलंक्रिया-भूषण क्रियायाः।) त्यास वधावें. वेद=ज्ञान, मंत्र ब्राह्मणात्मक ग्रंथ, वेद, कर्मकांड. वेदांग = शिक्षा, कल्प, व्याकरण, छंद, ज्योतिष, निरुक्त हीं सहा. वेदांत = ब्रह्मज्ञान. वेदत्रय = ऋक्, यजुस्, व साम्. उपवेद-ऋग्वेदाचा आयुर्वेद, यजुर्वेदाचा धनुर्वेद, सामवेदाचा गांधर्ववेद. वेदमातृ=गायत्री मंत्र-गायत्री, सावित्रि, सरस्वति. वधित्र=कामेच्छा. वधु=तरुण स्त्री, सून. वधू = मादी, स्त्री, नवरी, पत्नी. वध = नाश. [वध शब्दाचे एकंदर तीस अर्थ आहेत-त्यांपैकीं काहीं येथें देतोंः-विशरः, घातः, उन्माथः, वधः, पिञ्ज, आलम्भ, उज्जासनम्, प्रमथनम्, उद्वासनम्, विशर, विशरण=वध, नाश. घात=ठोसा, तडाखा, वध, नाश. उन्माथः = उच्छेद-(लिंगभेद-), पीडा. वध=आघात, ताडण, नाश. पिञ्ज=गोंधळलेला; आलम्भ इत्यादि]-(३७).

ज्या ठिकाणाहून मी कृपेनें वर आशीर्वाद मिळवावा, तेथेंच कसा तो, का तो, व्यभिचार-विपर्यास, विपरीतपणा-जर तर काय (भस्म=राख, भस्म, विभूति) भस्मासुर तो मी अर्जुन म्हणावा. भस्मासुर = एक आसुर. हा ज्याच्या डोक्यावर हात ठेवील त्याचें भस्म व्हावें, असा यास वर होता. हा सर्वांना पीडा देऊं लागला म्हणून विष्णूनें स्त्रीरूपानें यास मोह पाडून, याला स्वतःच्याच डोक्यावर हात ठेवण्यास लाविलें व त्याचा नाश केला (३८)

ज्यासाठीं मनानें "विरू" आम्हीं स्वप्नींसुद्धां धरणार नाहीं, तया प्रत्यक्षपणें अहो देवा! घात तो, कसा करावा तो-(३५)

वर हें जियालेपण जळो, येथे अवध्याना ह्या काय झालें आहे तें, जें का त्यांच्या वधानेंच, त्यांना मारूनच अभ्यासिलेलें तें मिरवावें-(३६)

मी पार्थ द्रोणानें केलेला घडविलेला; ह्यानें मजला धनुर्वेद दिला, शिकविला. त्या उपकारासाठीं काय आभाराचा होऊन त्यालाच उलटें वधावें तें!-(३७)

ज्याच्या कृपेनें-ज्याच्या कृपेवर-ज्याची कृपा झाली तो-आशीर्वाद लाभाचा होणारा, तेथें काय मनानें मी व्यभिचाराचें व्हावें, तरी काय मी भस्मासुर म्हणावा, असें अर्जुन म्हणत आहे-(३८)

**गुरूनहत्वा हि महानुभावान्।**
**श्रेयो भोक्तुं भैक्ष्यमपीह लोके।**
**हत्वार्थकामांस्तु गुरूनिहैव।**
**भुञ्जीय भोगान् रुधिरप्रदिग्धान्॥ ५॥**

[गुरु=श्रेष्ठ जबाबदार, महत्त्व, पूज्यता, वजन. अहत्वा [हन=नच खस्त देऊन, नच गुणून जोडणें (गुणीभूत=अंगभूत, मुख्य, गुणांचें करणें, गुणणें, वाढविणें, बोलावणें, उपदेश करणें) नच मारून, जेरीस आणणें, कुंठित करणें]. हि=खरोखर महत्+अनु+भावान्=महत्तत्त्व+अनु अनुभव शरीर जन्म संसार भावः स्वरूपः. श्रेय= अधिक चांगलें, शुभ, पुण्य. भोक्तुं=(उपभोग, उपयोग, खाणारा, फायदा, भोगणारा= भुञ्ज्) खाणेंपिणें करणें. भैक्ष्यम्=भिक्षान्न (भिक्ष्=मिळविणें, मागणें, भिक्षा मागणें): भिक्षावृत्ति. इहलोके अपि=ह्या मृत्युलोकीं सुद्धां (परलोकीं कसें होतें तें-) हा ईहलोक जरी तरी सुद्धां=महत्तत्व जें तेथें ह्या शरीरा -जन्मा-संसारास जन्म देणें जें अनु तेथेंच असणें, त्यांतच मुरणें अनुभउ-तें रूपाचें करणें जें- असें भावरूपानें जन्म संसारच रूपाचा केला

रुधिर = तांबडें, मंगळ ग्रह (ज्यो.), रक्त, केशर.–(कुसुंभ). [रुधिर = (रुधिरम् असृक् लोहितम् अस्रम् रक्तम् क्षतजम् शोणितम् इति ७ रक्तस्य।]-उष्णं, मासं, रुधिरं, मुखं, अक्षि, द्रविणं–. रक्त (मराठी) = रंगविलेलें, तांबडें, अनुरक्त, आसक्त, क्रीडारत, पोवळें, तांबडी गुंज, लाख, रक्त, केशर, शेंदूर, रक्तचंदन. रक्तांग = ढेकूण, मंगळ ग्रह. रक्तांबर, रक्तवासस् = संन्यासी. रक्तोत्पल = तांबडें कमळ. रक्तोपल = काळ, गेरू. रक्तकंठ = कोकिळ. रक्तचूर्ण = शेंदूर, गुलाल, पिंजर. रक्तजिव्ह = सिंह. रक्तप = जळू, राक्षस. रक्तपापिन् = जळू, ढेकूण. रक्त संदशिका–रक्त संदोहिका = जळू. रक्तपुष्प = पळस, पांगारा, जास्वंद. रक्तक = विनोदी, सुपारी, अशोक, काममोहित, तांबें. कुसुम्भः (केशर) = कमलोत्तरम् कुसुम्भम् वन्हिशिखम् महारजनम् इति ४ कुसुम्भस्य। कुसुंभ (मराठी) = कमंडलु, केशर, सोनें. (महारजने पुष्पभेदे कुसुम्भम् क्लीबम्। करकेः कमंडलौ पुंसि। क्षत्रिये नाभिः पुंसि। क्षत्रियेऽपि। 'अपि' शब्दान्मुख्यनृपे चक्रमध्ये च। प्राण्यतु द्वयोः मृगभेदे तु स्त्रियाम्।)] प्रदिग्ध = (प्र = समोर, पुढें, दूर, अति, मान, उत्कर्ष, वियोग, इत्यादि) दूषित झालेले, माखलेले, विषारी, अग्नि, स्निग्ध पदार्थ, गोष्ट. [(कालवण, मांसाचें पक्कान्न) (दिग्धम् लिप्तम् इति २ विलिप्तस्य। विषाक्तः दिग्धः लिप्तकः इति ३ विषाक्ते बाणः।). दिह् = माखणें, लेप देणें. संदिह् = संशय घेणें, भलतेंच मानणें]. भुञ्जीय = (भुज्–भुञ्ज् = वांकणें, वांकडें होणें, रक्षणें, खाणें, उपभोगणें, संयोग करणें, भोगणें, सोसणें, व्यापणें) भोगीन्–मला भोगावे लागतील.]

**अन्वय :** महत् अनुभवभावान् गुरून् अहत्वा– [नच गुणून (अगुण = मोक्ष दोष निरुपयोगी)] भैक्ष्यम् अपि इह लोके श्रेयः। अर्थकामान् तु गुरून् (विषय इच्छा प्रेम इच्छिणारे) हत्वा इह एव रुधिर प्रदिग्धान् भोगान् भुञ्जीय।

**अर्थ :** पूज्य जे त्यांना वाढवून, गुणाचे करून, खरोखर महत्तत्व एकसारखें त्या गुण गुणण्यामध्येंच राहाणें, रूपाचें होणें–यापेक्षां अधिक श्रेयस्कर तें म्हणजे ह्या मृत्युलोकीं मागून मिळविणें जें (भिक्षणें) भिकेचें अन्न–भिक्षेचें अन्न देखिलें बरें म्हणतां येईल, पण स्वार्थी अर्थकाम–स्वार्थच एक इच्छिला–त्यानें प्रेरित झालेला, वंदनीय गुरु जबाबदार जरी तरी त्यांना मारल्यामुळें–उपदेश करून–गुणांचे करून त्यांच्या–रुधिरानें दूषित झालेले उपभोग मला भोगावे लागतील–(५)

**देवा समुद्र गंभीर आयिकिजे। वर तोहि आहाच देखिजे।**
**पर क्षोभ मनिं नेणिजे। द्रोणाचिये॥ ३९॥**
**हें अपार जें गगन। वर तयाहि होईल मान।**
**परि अगाध भलें गहन। हृदय याचें॥ ४०॥**
**वरि अमृतहि विटे। कां (कीं) काळवशें वज्र फुटे।**
**पर मनोधर्म न लोटे। विकरविलाहा॥ ४१॥**
**स्नेहालागीं माये। म्हणिपे तें कीर होये।**
**परि कृपा ते मूर्त आहे। द्रोणियिये॥ ४२॥**
**हा कारुण्याचि आधि। सकल गुणांचा निधि।**
**विद्यासिंधु निरवधी। अर्जुन म्हणे॥ ४३॥**
**हा येणें मानें महन्तु। वरि आम्हांलागीं कृपावन्तु।**
**आतां सांग पां आम्हीं येथें घातु। चिंतुं येईल॥ ४४॥**
**ऐसे हे रणिं वधावे। मग आपण राज्यसूख भोगावें।**
**तें नये मना आघवे। जीवितेंसिं॥ ४५॥**

आयिकिजे-आइकिजे. पर-वरि. पर-परी क्षोभ. समुद्र = मोहोरबंद, संख्याविशेष. (समुद्ररमणा-पृथ्वी). गंभीर = गहन, खोल, निबिड, खोल बुद्धीचा, गंभीर, गुप्त. आहाच वरि देखिजे = वरवरच पाहावा होतो. क्षोभ मनिं नेणिजे द्रोणाचियें = (क्षोभ = हलणें, हबका, विघ्न, मनाची खळबळ, क्रोध) = द्रोणाच्या मनीं मनाची खळबळ नाहीं—(३९). वर-वरी. तयाहि-तयाही. परि-परी. अपार = अमर्याद, अनंत इत्यादि-पैलतीर नसलेला, उल्लंघण्यास कठीण, ॥ समुद्र, पृथ्वी ॥. गगन = आकाश, शून्य (गगनध्वज = सूर्य). मान = माप. अगाध = फार खोल, गूढ, अविद्वान, गूढ, अप्रतिष्ठित, खोल चीर खळगा इत्यादि. गहन = खोल, दुर्बोध, तीव्र, गुंतागुंतीचें. हृदय = काळीज, छाती, मन, इच्छा, हेतु, अहंकार, प्रीति-(४०). वरि-वरी = शिवाय पुन्हां कदाचित्. अमृतहि-अमृतही. का-के. वज्र-वज्रही. पर-परी (= परंतु तरीहीपण). विकरविला हा-विकरविलाही (= क्षोभविला, रूप बदलून दिसला, (मनोधर्म) तरी त्याची वृत्ति ढळत नाहीं). अमृत = अमर करणारें, अमरत्व, देवांचें खाद्य. विटे = बिघडेल. काळवशें = कालपरत्वें, वेळवशें, प्रसंगपरत्वें. वज्र = इंद्राचें शस्त्र अतिकठीण असें × अशा आकाराचा. (घातुक शस्त्र, हिरा, काळा अभ्रक). फुटे = मोडत नाहीं. न लोटे = ढळत नाहीं. मनोधर्म = संकल्पविकल्पात्मक अंतःकरण, वृत्ति, मन, कल्पना, विचार-(४१).

स्नेहालागीं माये = आई प्रेमानें प्रेमासाठीं, बाळाच्या आवडीनें, आवडीसाठीं जें जें कांहीं. म्हणिपे तें कीर होये = संबोधते, सांगते, बोलते, समजते तेंच तसेंच खरोखर होऊन येते. परि कृपा ते मूर्त आहे = (कृपा = अनुग्रह, दया. कृप् = विचार करणें, दया करणें. मूर्त = मूर्तिमान) कळवळा आलेल्या दयेनें तेथें कारुण्य अनुग्रहास आलें, तें साकार झालें, मूर्तिमान झालें द्रोणियिये = ह्या द्रोणाचार्याचे ठायीची ती-(४२). ह्या कारुण्याची आधि = करुणरस, ममता. आधि = मुख्य, पहिला. सकल = संपूर्ण, सगळा. गुण = आवृत्ति, मूळधर्म, (व्याकरणांत अ. ए. ओ.). निधि = निधी, निधान, आधार, खजिना. विद्यासिंधु निरवधी (अर्जुन म्हणे) = विद्या = ज्ञान, तत्त्वज्ञान, मंत्र. सिंधु = समुद्र, नदी, गाण्यांतला एक राग. निरवधी = सतत, अमर्याद-(४३).

हा येणें मानें महन्तु = (मह् = पूजा करणें, प्रकाशणें, बोलणें. मह = उत्सव, यज्ञ, तेज, पूजनीय महंत. मानें = परिमाण, इयत्ता, सत्कार, अभिमान, गौरव. वरि आम्हांलागीं कृपावन्तु = दयावंत. आम्हांसंबंधी तर मोठाच-(याहीवर : वरि = ). आतां सांग पां येथें घातु चिंतुं येईल = (समान संख्यांचा गुणाकार । बाण । वध विचारास येईल? विचार करूं येईल?-(४४). ऐसे हे रणिं वधावे = ह्यांचा घात करावा? रणिं-रणामध्यें, –रण् = शब्द, युद्ध. शब्द करणें जे तेथें. (रणरण = दुःख, उद्वेग). मग आपण राज्यसुख भोगावें = स्वामित्वाचें सुख भोगणें, उपभोगणें आपण जे. तें नये मना आघवे जीवितेंसिं = सर्व कांहीं जीवित, जीवन –आयुष्य सर्वस्वासह मन मानीत नाहीं–मनास येईना–मन घेत नाहीं–(४५).

देवा, समुद्र गंभीर असतो (आहे) असें ऐकतों, वर तोही सहज पाहावा होतो, पण (द्रोणाच्या मनानें क्षोभ कधींहि जाणिला जाणारा नव्हेच)–द्रोण मनानें कधींहि क्षोभाचे झाले नाहींत–(३९)

गगन अपार जें तेंसुद्धां मापलें जाईल, पण ह्याचें हृदय अगाध असें गहनतेचें–(४०)

अमृतहि वरी विटेल, वज्रहि कालवशेंकरून फुटेल, पण मनोधर्म हा विकरविलाहि नच लोटेल कीं–(४१)

स्नेहासाठीं माय म्हणेल तें होईल, पण द्रोणाचे ठाईं कृपाहि मूर्त होऊन आहे–द्रोण हे सगुणतेनें मूर्तिमंत कृपाच होत–(४२)

हे कारुण्यवृत्तीचें मूळ असे होत, सकळ गुणांची जी धी, तिचे निधी, ठेवा–निधान होत–ते विद्यासमुद्र —अहो, विद्येचा सिंधु होत–समुद्र होत केव्हांहि !–असें अर्जुन म्हणत आहे–(४३)

ह्या महत्त्वामुळें हे–संतमहंत–महन्त असे आहेत–वर आम्हांकरितां तर हे फार कृपावंत असे होत–आतां सांगा कीं, येथें घात तो चिंतण्याचें कधीं तरी होईल काय ?–(४४)

असले हे कृपावंत संग्रामी वधावेत–व मग आपण राज्यसुख भोगावें–असें हें जीव गेला तरी आवडत नाहीं, मनास येत नाहीं–(४५)

**हें येणें मानें दुर्भर । जे यांहिंहूनि भोग सधर ।**
**ते अस्तोत येथें वर । भिक्षा मागतां भलि ॥ ४६ ॥**

**नातरि देशत्यागें जाईजे । कां गीरिकंदर सेविजे ।**
**परि शस्त्र आतां न धरिजे । ययांवरि ॥ ४७ ॥**

**देवा नवनिशिर्ति शरिं । वावरोनि यांचा जिव्हारिं ।**
**भोग गिंवसावे रूधिरिं । बुडाले जे ॥ ४८ ॥**

**ते काढूनि काय किजेति । लिप्त कैंविं सेविजेति ।**
**मज नये हे उपपत्ति । याचि लागीं ॥ ४९ ॥**

**ऐसें अर्जुन तें अवसरीं । म्हणे श्रीकृष्णा अवधारीं ।**
**परि मना नयेचि श्रीमुरारि । आईकोनियां ॥ ५० ॥**

**हें जाणोनि पार्थ भ्याला । मग पुनरपि बोलों लागला ।**
**म्हणे देवो चित्त कां या बोला । देतिची ना ॥ ५१ ॥**

हें येणें मानें दुर्भर = अनिष्ट, कठीण असेच ते भोग जर का ह्या जीवितावर परिमाण होण्यानें–महत्त्वाच्या समजुतीनें पाहिलें तर. जे याहींहूनि भोग सधर = आधार देणें जे जेथें अशा भोग उपभोगासंबंधीं तर याहीपेक्षा तेथची पकड ती, तेथचें आवरणें तें, तेथचें घेणें देणें तें. ते असतु एथवर = ते तसे असोत, वागोत, अस्तित्वांत असोत ह्या जगीं–येथें, इथपर्यंत. भिक्षा मागतां भलि = भिक्षेचें अन्न सेवणें हेंच भलेंपण होय ना–(४६). नातरि देशत्यागें जाईजे = विशिष्ट स्थान का प्रांतविभाग त्यागून जावें, का गिरीकंदर सेविजे = अथवा डोंगरपर्वतांमधील गुहा का दरी सेवावी. आदराचें करावें, चाकरीचे करावे–उपभोगावे. परि शस्त्र आतां न धरिजे इयावरि = पण ह्यांच्यावर शस्त्र धरूं–वापरूं नयेच कीं–(४७). देवा नवनिशिर्ति शरिं = बाणानीं देवा ! तीक्ष्ण पोलादी नव्या वावरोनि यांच्या जिव्हारिं = ह्यांच्या काळजाचे, जिव्हाराचे, मर्मस्थानाचे ठायींच कीं वावरणें, फिरणें, हिंडणें, भटकणें करून. भोग गिंवसावे रुधिरिं = सुखदुःखाचा अनुभव, खाणें पिणें जें उपभोगणेचे होतें ते शोधावेत, सांपडवून घ्यावेत, ह्या रुधिरानें रुधिरामधीलचे–रक्तामधीलचे–अशुद्धामध्यें असलेले जे. बुडाले जे = आंत जे बुडून आहेत–बुडालेले आहेत–मग्न आहेत, आच्छादित आहेत, समाविष्ट आहेत, खोल गेलेले आहेत–(४८).

ते काढुनि काय कीजति = खालून काढून वर घेणें जें, दुःख संकटांतून सोडविणें, आंतून बाहेर घेणें जें, दूर करावेत का स्वतःच्या भोगासाठी योजावेत–लिप्त कैंविं सेविजेति = लिंपलेले, माखलेले, दोष लागलेले जे, आच्छादिलेले जे, ते कसे बरे घ्यावेत भोगावेत, चाकरीस घ्यावेत, आदर दाखविले जावेत. मज नये हे उपपत्ति = येथीलची जी कांही तत्त्वनिर्णयाची सीमा–सिद्धांतास येणारी ती कांहीं मला समजत नाहीं–माझे ठायींची होईना. याचि लागी = याजसाठी, याचकरितां–(४९). ऐसे अर्जुन तें अवसरीं = असें अर्जुन त्या वेळेस, त्यावेळीं (अवसर = वेळ, खलबत). म्हणे श्रीकृष्णा अवधारीं = निश्चयानें ऐक, निर्णय देऊन घेऊन ऐक, अवधार लक्षांत घेणेंचे करावें त्याचे बोलणें. परि ते मना नयेचि मुरारि = पण मुरारि श्रीकृष्णांना, ते रुचलें नाहीं, त्याचें बोलणें आवडलें नाहीं, त्यांच्या विचारास पटलें नाहीं. आईकोनियां = मनांत बिंबविलें,

ऐकविलें तरी-(५०) हें जाणोनि पार्थ भ्याला = देव लक्ष देईनात हें पाहून, अर्जुन संकोचास पावला, बिहाला, भयास आला, त्याच्या मनोवृत्तीनें आखडणें केले, ती आकुंचितपणास आली. मग पुनरपि बोलो लागला = व मग त्याच बोलण्यावर आणीक म्हणूं लागला कीं,—तेंच बोलणें, शब्द जोडून घेऊन त्यानें बोलणें केले. म्हणे देवो का चित्त या बोला देतीचि ना = देव ह्या बोलण्यास कां बरें लक्षांत घेईनात ते–ते मनावर घेईनात. ते कां–अंतरीं विचारीनात ते कां–(५१)

अशा मानण्यानें हे दुर्धर असे होत, पण याहीपेक्षा भोग सधर ते कीं–असे हे असो वर, यांना वधण्यापेक्षां भिक्षा मागणें बरें–(४६)

नाहींतर देशत्याग करावा अथवा गिरीकंदर सेवावे, पण यांवर शस्त्र धरूंच नये–(४७)

देवा, बाणाच्या टोकांनीं वावरून ह्यांच्या जिव्हारीचे (काळजाचे ते, काळजामध्यें बुडालेले ते) भोग ते कशास हुडकण्याचे ते, (सांपडवून घ्यावेत ते–) (४८)

ते रुधिरीचे भोग काढून घेऊन काय करावयाचे आहेत–अहो! लिप्त जे रुधिरानें, ते कसे–कसचे बरे उपभोगावेत भोगावेत सेवावेत–आपलें म्हणणें यासाठी येथे मला मुळींच कसल्याहि उपपत्तीचें होत नाही–(४९)

असें त्या वेळेस अर्जुन तो म्हणत आहे (कीं, हे श्रीकृष्ण भगवान, ऐका कीं माझें म्हणणे तें)–पण श्रीमुरारीना तें त्याचें म्हणणें मानवलें नाही–मनास आलें नाही–(५०)

असे समजल्यानें पार्थ भ्यायला व पुन्हां बोलूं लागला कीं–अहो, येथें देव तर माझें ह्या बोलण्यास मुळींसुद्धां (चित्तीं–) विचारास घेत नाहीत कीं–(५१)

**न चैतद्विद्मः कतरन्नो गरीयो**
**यद्वा जयेम यदि वा नो जयेयुः ।**
**यानेव हत्वा न जिजीविषाम-**
**स्तेऽवस्थिताः प्रमुखे धार्तराष्ट्राः ॥ ६ ॥**

[न = नाही. च = आणि. एतद् = ही गोष्ट. विद्मः = आम्ही जाणणें. कतरत् = कोणतें. (कतर = दोहोंतून कोणता). नः = आम्हां पांडवांना. गरीय = चागलें. (गरीयस् = अधिक श्रेयस्कर). यत = जें. वा = का. जयेम = आम्हीं जिंकू. वा = अथवा. नः = आम्हांला. जयेयु = आम्हा जिकतील. यान् = ज्या कौरवांना. हत्वा एव = असे मारल्यावर. न जिजीविषामः = आम्ही जगावें असें वाटणार नाही जिजीविषा = जिवंत असण्याची इच्छा. ते = ते धार्तराष्ट्राः. अवस्थिताः = उभे आहेत; प्राप्त झाले आहेत. प्रमुखे = समोर. (प्रमुख = प्रथम, श्रेष्ठ). धार्तराष्ट्राः = कौरव.]

**अन्वय :** न च एतद् विद्मः । कतरत् नः गरीयः । यद् वा जयेम । यदि वा न जयेयुः । एव यान हत्वा । जिजीविषामः । ते धार्तराष्ट्राः । प्रमुखे अवस्थिताः ।

**अर्थ :** (१) आम्हीं कोणतें तें कर्म आम्हास श्रेयस्कर आहे, तें जाणत नाही–जे का आम्हीं जिकूं अथवा ते आम्हांस जिंकतील–ज्यांना मारल्यावर आम्हास ही जगण्याची ती जी विषा–इच्छा उरणार नाहीं जशी का–असे ते कौरव आम्हां–समोर उभे आहेत–

(२) आतां आम्हां पांडवांना कोणतें अधिक (श्रेयस्कर) चांगले (करणे) तें बरें समजत नाहीं–(अथवा) आम्ही शत्रूंना जिंकूं किंवा शत्रू आम्हांला जिकतील हें कळत नाही. ज्या कौरवांना अशा रीतीनें मारल्यावर जिवंत राहण्याची इच्छा (जगावें असें आम्हांसहि वाटणार नाहीं) आम्हांसहि उरणार नाहीं–असे ते धार्तराष्ट्राः आमच्यासमोर उभे आहेत–(६).

**येऱ्हवीं माझ्या चित्तिं जें होतें । तें मी विचारुनि बोलिलों येथें ।**
**परि निकें काय या परौतें । तें तुम्हिं जाणा ॥ ५२ ॥**

**पै "वीरू" जयांसि यैकिजे । आणि या बोलिंचि प्राण सांडिजे ।**
**ते येथें संग्रामव्याजें । उभे आसो ॥ ५३ ॥**

**आतां ऐसियांतें वधावें । किं अव्हेरून निघावें ।**
**या दोहिंमाजी काय करावें । तें नेणों आम्हि ॥ ५४ ॥**

माझ्या–माझ्या. चित्तिं–चित्ती. विचारुनि–विचारूनि. येथें–एथे. निकें=खरे, हितकारक. या परौतें =यापेक्षां दुसरें जे कांहीं तें (५२). वीरू–विरू, वैर–यांच्याशीं वैर हे शब्द ऐकतांच आम्हीं प्राणत्याग करावा (वीर्याद्वीर=शूरत्वानें शूर.) प्रभावस्तेजो विशेषः तत्र वीर्यम्। वीर्य=येन कृत्वा असाध्यसाधनेऽप्युद्यतो भवति, स उत्साहोऽति शक्तिभाक साऽतिशक्तिश्चेत्। यैकिजे–ऐकिजे. बोलिंचि–बोलींच. (बोल=दोष, बोलि=शब्द). येथें–येथ. संग्रामव्याजें=लढाई, विलंब, लक्ष्य, मिष, निमित्त, दोष, युक्ति. उभे आसो–उभे आहाती–(५३). ऐसियातें–ऐसे यातें. अव्हेरुनि–अव्हेरुनिया=त्याग करून, दुर्लक्ष करून. निघावे=सुटावे. काय बरवें–बरवें=चांगले, शोभास्पद (५४).

येऱ्हवीं माझ्या (चित्ता) मनामध्यें जे होतें तेंच मी विचारास आणून येथ बोललों, पण याहीवर हितकारक जें कांहीं असेल तें तुम्हीं समजा, जाणा, विचारास घ्या–(५२)

पण "वीरु" ज्यास ऐकावें (व ह्या बोलण्याचालण्याचें) केव्हाहि तेथें (होणारें जाणारें त्यामुळें तर) प्राणच की सांडावेत असें वाटणारें जसें ते संग्रामनिमित्तेकरून येथें असोत जरी-(५३)

आतां अशांना वधावें का त्यांचा अव्हेर करून येथून निघून जावें, ह्या दोहोमध्यें जें कांहीएक करावें तें आम्ही जाणूं ना–(५४)

**कार्पण्यदोषोपहतस्वभावः**
**पृच्छामि त्वां धर्मसंमूढचेताः ।**
**यच्छ्रेयः स्यान्निश्चितं ब्रूहि तन्मे**
**शिष्यस्तेऽहं शाधि मां त्वां प्रपन्नम् ॥ ७ ॥**

[कार्पण्यदोष = बुद्धीच्या कृपणतेच्या–कोतेपणाच्या दोषामुळें (कार्पण्य = आत्मवस्तूचें अज्ञान). उपहत स्वभावः = स्वाभाविक क्षात्रधर्म नष्ट झाला आहे ज्याचा असा मी. धर्मसंमूढचेताः त्वां पृच्छामि = स्वधर्म, स्वकर्तव्याविषयीं मोह झालेला–संमूढचेताः तुजला विचारीत आहे. चेतस् = मन, ज्ञान, सजीवता. यत् श्रेयः स्यात = जें हितकर असेल. तत् मे निश्चितम् ब्रूहि = तें निश्चिततेचें असें स्पष्टपणें सांग. (ब्रू=बोलणें, सांगणें. बृह् = बोलणें, प्रकाशणें, वाढणें). अहं ते शिष्यः = मी तुझा शिष्य. मां त्वां प्रपन्नम् शाधि = मी तुजला शरण आलेला त्या मला शाधि–उपदेश कर.]

**अन्वय :** कार्पण्यं दोष उपहत स्वभावः । धर्मसंमूढचेताः । त्वाम् । पृच्छामि । यत् श्रेयः स्यात् । तत् । मे निश्चितम् ब्रूहि । ते अहं शिष्यः । त्वाम् प्रपन्नम् माम् शाधि ।

**अर्थ :** (कार्पण्य) कंजूषपणा, दुर्बलपणा, दया (दोष), अपराध, चूक, अनियमिततेचे (उपहत) मलित, दूषित, ताडित, ध्वंसित, (स्वभावः) प्रकृति सहजकर्म माझे व त्यामुळें (चेतस् =) मन, ज्ञान, सजीवता, (संमूढचेताः) घाबरलेली, मोडकी, बुद्धिहीन, विस्मित असा मी तुजला विचारीत आहें कीं–जें मजला श्रेयस्कर –मंगलकारक होईल, असेल तें मजला निर्धारानें ठरवून सांगावें, बोलावें (ब्रूहि) अशी विनवणी आहे–(७).

**आम्हां काय उचित । तें पाहातां न स्फुरे येथ ।**
**हें मोहें येणे चित्त । व्याकुळ माझें ॥ ५५ ॥**

**त्रिमीरावरूद्ध जैसें । दृष्टीचे तेज भ्रंशे ।**
**मग पासिचि असतां न दिसे । वस्तूजात ॥ ५६ ॥**

**देवा तैसें मज झालें । जे मन हें भ्रांति ग्रासिलें ।**
**आतां काय हीत आपुलें । तेंहि नेणें ॥ ५७ ॥**

**तरि श्रीकृष्णा तुंवा जाणावें । निकें तें आम्हां सांगावें ।**
**जे सखा सर्वस्व अघवें । आम्हांसि तुं ॥ ५८ ॥**

पाहातां–पाहतां. न स्फुरे येथ = येथे सुचत नाहीं, प्रकटत नाहीं, चमकत नाही (आड काय घ्यावें, ढाल घ्यावी का काय तें सुचेना). हें मोहें येणे–जे माहे येणे = अज्ञानामुळें, दुःखानें का भ्रांतीमुळें, अविद्येमुळें का कांहीं हातून चूक झाल्यामुळें. चित्त व्याकुळ माझें = मन, अंतःकरण तें, का विचार तो उत्कंठित, गुंतलेला, विव्हल, चंचल असा होऊन आहे– (५५). त्रिमिर अवरूद्ध जैसें = अंधारानें (तिमिर = अंधःकार). दृष्टीचे तेज भ्रंशे = डोळयांना दिसेनासें झालें. (भ्रंशे = बुद्धीचा चळ, पतन, ऱ्हास. तेज = तीव्रता, कांती, बल, वीर्य, प्रताप, उष्णता, सोनें, अग्नि. दृष्टि = अवलोकन शक्ति, नेत्र, बुद्धि, मत.) मग पासिचि असतां न दिसे वस्तूजात = कीं जवळची वस्तूहि दिसत नाही. पासिचि = जवळच (पासि ठाकावया योग्य नव्हे ते. १८४–१०). वस्तूजात = (वस्तु = पदार्थ, मूल गुण, सत्य, सारांश जात = पदार्थमात्र, प्रकार, समुदाय, उत्पत्ति)–(५६). जालें–जाहलें. जे मन–जे मन हें भ्रांति ग्रासिलें = जें का मन म्हणजे अंतःकरण तसेंच बुद्धि ही भ्रमानें भटकत आहे–मन भ्रांतीनें हरण केलें गेल्यानें तें भीतीचें, धांदलीचें असें होत आहे–झालें आहे–आतां हीत आपुलें काय तें नेणें = आतां आपलें हित, इष्ट साधक, उपयुक्त, योग्य, कल्याण करणारे तें काय तें मी जाणेना–जाणत नाही–(५७).

कृष्णा–श्रीकृष्णा. तुंवा जाणावें = तुंवा जाणतें व्हावें, तुंवा ज्ञानी व्हावें, शहाणें व्हावें. निकें = बरें. निकें तें आम्हां सांगावें = बरें जें कांही आम्हांस असेल तें सांगावें. सखा = मित्र, सोबती, स्नेही. सर्वस्व = स्वसत्तेचें सगळें धन-तत्त्वांश. अघवें–आघवें = सर्व. जे सखा सर्वस्व अघवें–आघवें आम्हांसि तुं = कारण कीं अहो, तुम्हीच कीं आमचें सर्वस्व अवघे असे मित्र–सोबती (सखि–स्नेहो) आहांत–आम्हाला अवघे सर्वस्वाचे सखे आहांत–(५८).

आम्हास "योग्य तें काय" तें येथे स्फुरत नाही. माझें चित्त मोहामुळें व्याकुळ झालें आहे—(५५)

तिमिरावरुद्ध तसें माझ्या दृष्टीचें तेज भ्रंशलें आहे–(भ्रंश पावावें व मग)–अगदीं जवळचीहि वस्तु दिसत नाहीं–(५६)

हे देवा, तसें मजला झालें आहे–मन हें भ्रांतीनें ग्रासलें आहे–आतां आपलें हित तें कशांत (का काय) तें जाणवेना–(५७)

तरी हे कृष्णा ! तुम्ही तें जाणावें व हितकर असें जें कांहीं तें आम्हास सांगावें. कारण कीं, अहो, तुम्हींच कीं सखे असे अवघ्या सर्वस्वाचे आम्हांस आहांत–(५८)

**तूं गुरु बंधु पिता । तूं आमुचि इष्ट देवता ।**
**तूंचि सदा रक्षिता । आपदिं आम्हांतें ॥ ५९ ॥**

**जैसे शिष्यातें गुरू । सर्वथा नेणे अव्हेरू ।**
**कीं सरितांतें सागरू । त्यजी के ॥ ६० ॥**

**नातरी अपत्यातें माये। सांडुनि जरि जाये।**
**तरीं तें कैसेनि जिये। आईकें श्रीकृष्णा ॥ ६१ ॥**

**तैसा सर्वैपरि आम्हांसि। देवा तूंचि येक आहासि।**
**आणि बोलिलें जरि न मनिसि। मागिल माझें ॥ ६२ ॥**

**तरि उचित कायि आम्हां। जें व्यभिचारेना धर्मा।**
**तें झडकरिं श्रीपुरुषोत्तमा। सांग आतां ॥ ६३ ॥**

तूं गुरु=बृहस्पति, बाप. (मोठा, जड, श्रेष्ठ, दीर्घ). बंधु=भाऊ, भाऊबंद, मित्र. पिता=बाप. (पितामह=ब्रह्मदेव, आजा) तूं आमुचि ईष्ट देवता=[इष्ट=इच्छित, सन्मानित, प्रिय. (इष्ट–इष्टि=यज्ञ)] देवपणा, देवदेवाची मूर्ति. तूंचि सदा रक्षिता=निरंतर संरक्षण करणारे असे संरक्षणकर्ते आहात. सदा=निरंतर. रक्षितृ=संरक्षणकर्ता आपदिं आम्हांतें–आपदीं आमुतें=आम्हांस संकटामध्यें, हालअपेष्टांमध्यें का विपत्तीमध्यें आमचे संरक्षणकर्ते आहांत. आपदि=विपत्ति, हाल, संकट–(५९). जैसे–जैसा. शिष्यातें=चेला जो त्यास. शिष्य=१. शासन करण्यास योग्य. २. क्रोध. ३. जुलूम. सर्वथा=सर्वप्रकारें, बहुतकरून. अव्हेरू=त्याग, अनादर. अव्हेरणें=दुर्लक्ष करणें, त्याग करणें. सरितांतें=(सरित=नदि, तंतू). सागर=समुद्र. त्यजी (त्यज्=टाकणें, सोडणें, देणें). के–केवीं. (के=काय? केवीं=कसा तो? कसचा तो–) –(६०). नातरी–नातरि=अथवा. अपत्यातें=लहान अर्भकास. माय–माये=आई. सांडुनि जरि जाये=टाकून जाईल जर. तरी तें कैसेनि जिये=तर तें कसें बरें जगेल–वांचेल? आईकें–ऐके–श्रीकृष्णा–कृष्णा=कृष्णा ऐका तर खरें–(६१). सर्वैपरि–सर्वापरी=सर्वथैव, सर्वप्रकारें बहुतकरून. देवा तूंचि येक आहासि=तुम्हीच देवा एक आहांत. बोलिलें जरि न मनिसि=म्हटलेलें तें जर नच मनावर घ्याल. मागिले माझें==पूर्वीचे माझें–(६२). कायि–काय=कोणतें, काय कसचें तें. जें व्यभिचारेना धर्मा=जे धर्माशीं विरुद्ध नसेल व उचित असेल तें लवकर सांग. तें झडकरिं=तें लवकरच. श्रीपुरुषोत्तमा सांग आतां=हे पुरुषोत्तमा, आतां सांगण्याचें करावें–(६३).

तुम्हीं गुरु, तुम्ही बंधु, तुम्ही पिता, तुम्हीच कीं आमची इष्ट ती देवता आहात–(तुम्हीच कीं संकट-काळीं सदा आम्हांस रक्षिते असे आहांत): आपदि आमचें रक्षण करणारे नेहमीं असे तुम्हीं कीं–(५९)

शिष्यास गुरु सर्वथा अव्हेर करणें जाणत नाहींत (करणारे नच–)अहो नद्यांना सागर कसा बरें त्यजणारा तो–तसा केव्हांहि नव्हें–(६०)

अथवा (अपत्यास), लेकरास (माय) आई ती जर सोडून गेली, तर तें अपत्य कसें (जगावें, कशानें, कशावर, कसें बरें तें) जगेल तें असें अहो श्रीकृष्णा ऐका, विचारास घ्या–(६१)

तसें तुम्हीं देवा, सर्व तऱ्हेनें, (सर्वापेक्षांहि जास्त प्रमाणानें तुम्हींच एक) आम्हांस आहात, वर कांहीं म्हटलें तर मागे जें कांही बोलिलें–म्हटलें असेल, तें आपण मनावर घेऊं नये–(६२)

करितां आम्हांस योग्य असें जें, जें कांहीं धर्मास विरुद्ध नसेल–(व्यभिचारेना) तें झडकर आतां सांगावें, हे पुरुषोत्तमा अहो!!!–(६३)

**न हि प्रपश्यामि ममापनुद्याद्यच्छोकमुच्छोषणमिन्द्रियाणाम्।**
**अवाप्य भूमावसपत्नमृद्धं राज्यं सुराणामपि चाधिपत्यम् ॥ ८ ॥**

[न हि प्रपश्यामि=मला दिसत नाहीं. मम=माझा. अपनुद्यात्=नाहींसा करील. (अपनोदन=दूर करणें, खंडन). यत् शोकम्=खेद, दुःख. शोषणम्=शुष्क होणें, ओढून घेणें; शुष्क करणारा–संताप

देणारा शोक. अवाप्य = मिळालें तरी. भूमौ = ह्या भूलोकीं. असपत्नम् = अकंटक, शत्रुरहित. ऋद्धम् = समृद्ध. ऋद्धम् राज्यम् = (विस्तीर्ण) राज्य. सुराणाम् = देवांचें. आधिपत्यम् = प्रभुत्व, श्रेष्ठत्व, अधिकार. ]

**अन्वय :** मम इन्द्रियाणाम् उत् शोषणं शोकं यत्। अपनुद्यात्। न हि प्रपश्यामि। भूमौ असपत्नं ऋद्धं राज्यम्। सुराणाम् अपि अधिपत्यम् च। अव्याप।

**अर्थ :** भूमीचें शत्रुरहित सर्व राज्य, तसेंच देवांचें अधिपत्य जरी मला मिळालें तरी–माझ्या इंद्रियांना शुष्क करणारा शोक नाहींसा होईल (ज्यायोगे) असें कांहींच मला येथें दिसेना (८).

**हें सकळ कुळ देखोनी। जो शोक उपजलासे मनिं।**
**तो तुझें वाक्यें वांचुनि। न जाये आणीकें ॥ ६४ ॥**

**येथें पृथ्वीतल आप होईल। हें महेंद्रपदहि पाविजेल।**
**परि मोहो हा न फिटेल। मानसिंचा ॥ ६५ ॥**

**जैसिं सर्वथा बीजें आहाळलिं। ते सुक्षेत्रिं जरि पेरिलिं।**
**तऱ्ही न विरूढति सींचीली। आवडे तैसिं ॥ ६६ ॥**

**ना तरि आयुष्य पुरलें आहे। तरि वोषधि कांहिं नव्हे।**
**येथ येकचि उपेगा जाये। परमामृत ॥ ६७ ॥**

**तैसें राज्यभोग समृद्धि। उजीवन नव्हे जीवबुद्धी।**
**येथें जीव्हाळा कृपानिधि। कारुण्य तुझें ॥ ६८ ॥**

**ऐसें अर्जुन तेथें बोलिला। जरि क्षण येक भ्रांति सांडिला।**
**मग पुनरपि व्यापिला। उर्मि तेणें ॥ ६९ ॥**

**कीं मज पाहातां उर्मि नव्हे। हें अनारिसें गमत आहे।**
**तो ग्रासीला माहामोहे। काळसर्पें ॥ ७० ॥**

उपजलासे–उपजलासे = उपजला आहे. तुझें वाक्यें वांचुनि–तुझिया वाक्या वाचुनि. न जाये–न जाय–(६४). येथें–एथ. परि–परी मोहो–मोहो हा = अज्ञान भ्रांति. पृथ्वीतल आप होईल = सार्वभौमत्व–पृथ्वीचें राज्य प्राप्त होईल. महेंद्रपद = इंद्रपद.–(६५). आहाळलि = भाजलेली. जरि–जऱ्ही तऱ्ही–तरी सींचीली–सिंचली = पाणी शिंपलें असता. आवडे तैसिं–आवडे तसी = हवी तशी, मनाजोगी. बीजें = बी, बियाणीं. सुक्षेत्र = उत्तम शेत–(६६) पुरलें आहे = संपलें. वोषधि = औषधें. नव्हे–नोहे. येथ–एथ. उपेगा जाये परमामृत = भगवन्नाम अमृत–हरिनामच एक उपयोगी पडणारें होतें–(६७). उजीवन–उज्जीवन (= स्फूर्ति, औत्सुक्य). नव्हे जीवबुद्धि–नोहे इये बुद्धि = ह्या बुद्धीला (उत्तेजन, उज्जीवन, स्फूर्ति) येत नाहीं. येथे–एथ. जीव्हाळा = मर्म, जिव्हार, आश्रय प्रेमाचा–(६८).

जरि–तंव. भ्रांति सांडिला = भ्रांतीनें सोडलेला शुद्धीवर आला. तेणें उर्मि व्यापिला पुनरपि = पुन्हा त्या उर्मीनें–जीवदशेच्या षडूर्मी त्यांनीं–व्यापला, ग्रासला (६९). उर्मि नव्हे–उर्मी नोहे = भ्रमाची लहर नव्हे. तो–ते. अनारिसें = भिन्न, निराळें, भलतें. गमत आहे = वाटत आहे. मज पाहातां = मी विचारास घेतलें असतां. तो माहामोहे काळसर्पे ग्रासीला = मोह हाच सर्प–त्यानें ग्रासिला–(७०).

कुळ सकळ पाहून मनास–मनामध्यें–शोक झाला, उपजला आहे–तो तुमच्या वाक्याशिवाय दुसऱ्या कशानेंहि जाणारा नव्हे–(६४)

पृथ्वीतळ आपलें होईल, महेंद्रपदहि पावणें होईल; पण मनाचा मोह तो नच फिटणारा होईल–(६५)

बीजें सर्वथा भाजलेलीं–तीं जरी सुक्षेत्रीं पेरिलीं व वाटेल तितकीं सिंचिलीं तरी उगवणारीं होत नाहींत–(६६)

आयुष्य संपलें आहे, तेथें औषधी कांहींच नव्हे!–उपयोग होत नाहीं. येथें एकच तें परमामृत उपयोगाचें होणारें! – (६७)

राज्यभोग समृद्धीचा तेथें जीवबुद्धी उज्जीवन तें नव्हेचि–नच होणारें–येथें हे कृपानिधि जिव्हाळाच एक तुमच्या कारुण्य कृपेचा तो– (६८)

—असें अर्जुन बोलला, क्षणभर एका भ्रांतीनें सोडिला, सांडला व मग पुन्हां भ्रांति उर्मीनीं व्यापिला झाला–(६९)

अहो मला वाटतें, ती उर्मी नव्हे! येथें कांहीतरी निराळेंच एक अनारिसें गमत–वाटत आहे, जे का तो माहामोहरूपी काळसर्पानेंच कीं जसा ग्रासिलेला–(७०)

**सवर्म हृदयकल्हारिं। तेथें कारुण्यवेळेचा भरिं।**
**लागला म्हणौनि लहरि। भांजेचि ना॥ ७१॥**

**हे जाणोनि जैसिया प्रौढि। जो दृष्टीसवें (चि) विष फेडि।**
**तो धांवया श्रीहरि गारोडि। पातला किं॥ ७२॥**

**तैसिया पांडुकुमरा व्याकुळा। मिरवितसे श्रीकृष्णाजवळा।**
**तो कृपावशें अवलीळा। रक्षैल आतां॥ ७३॥**

**म्हणौनि तो पार्थु। मोहफणिग्रस्तु। (ग्रहस्तु)**
**म्यां म्हणीतला हा हेतू। जाणोनियां॥ ७४॥**

**मग देखा तेथें फाल्गुनू। घेतला असे भ्रांती कवळुनु।**
**जैसा घनपडळिं भानु। आच्छादिजे॥ ७५॥**

सवर्म = वर्मयुक्त, मर्मयुक्त–(रक्षणकर्ता). हृदयकल्हारिं = हृदयकमळी. कारुण्यवेळेच्या भरि लागला म्हणौनि–म्हणोनि–लहरि भांजेचि ना = देहममता, देहबुद्धीस स्पर्शून आहे. देहबुद्धीच तेथें दंश पावली, स्पर्श करून आहे, देहममता कारुण्यवेळेची भर घेऊन आहे; कींव, दया, कृपेच्या ऐन भरास येऊन आहे–लागून आहे–परिणाम होऊन आहे; काळसर्पाचा मर्मस्थानी दंश (दंश झाला या अर्थी) झाला तर वेग किंवा झटक्याच्या लहरीवर लहरी येऊन त्या आवरत नाहींत, आटोपत नाहींत, थांबत नाहीत. भांजेचि ना = आटोपत्या होत नाहींत (७१). जैसिया–ऐसी. प्रौढि = मोठा प्रसंग, साहस. जो दृष्टीसवें (चि) विष फेडि = ज्याच्या कृपादृष्टीबरोबर विष उतरते का विष नाहींसे करतो जो. श्रीहरि धांवया पातला किं = हांकेसरसी, त्याची प्रार्थना केली कीं तो तेथें श्रीहरी पोहोंचला. गारोडि = जादूगार, सर्पाचें विष उतरविणारा मांत्रिक, मंत्रविद्या जाणणारा (७२). तैसिया पांडुकुमरा व्याकुळाजवळा श्रीकृष्ण मिरवतसे = व्याकुळ झालेल्या पार्थाजवळ श्रीकृष्ण उपायाची योजना मनामध्यें चिंतीत आहे. तो आतां कृपावशें अवलीळा रक्षैल = सहज लीलेनेंच त्याचें रक्षण करील–(७३). मोहफणिग्रस्तु = मोह हाच कोणी एक सर्प त्यानें ग्रासलेला. हेतू = संकेतु (७४). फाल्गुनू = अर्जुन. भ्रांती कवळुनु = व्यापला आहे मोहभ्रांतीने–कवळिलेला आहे, धरला आहे, मिठी मारिली आहे. घनपडळिं = ढगांच्या पडद्यांनीं. आच्छादिजे = झांकावा, आच्छादावा–(७५).

सवर्म, वर्मयुक्त हृदयकमलाचे ठाई कारुण्यवेळेच्या भरानें लागला म्हणून, तेथच्या लहरींनीं–उर्मीनीं भांजेना–(७१)

असें जाणून जसें का हांक–मोठा प्रसंगच जाणून प्रौढीनेंच नुसत्या पाहण्यानेंच धांवया–दृष्टीसवेंच विष फेडणारा–कृपादृष्टीनें विष उतरते असा श्रीहरी गारोडी तेथें पोहोंचला, धांवतच आला–(७२)

तशा त्या श्रीकृष्णाजवळच असलेल्या त्या व्याकुळ झालेल्या, व्याकुळपणानें भिरवणाऱ्या पांडुकुमराला, तो कृपावशेंकरून आतां अवलीळा—सहज लीलेनेंच रक्षील-(७३)

असा त्याचा हेतू जाणूनच कीं, मी म्हणूं केलें कीं-पार्थ तो तर मोहरूपी काळसर्पानें ग्रस्त असाच म्हटला-झालेला-(७४)

मग पाहा कीं, तेथें तो फाल्गुन भ्रांतीनें वेढ़न-कवळून घेतला आहे-जसा का मेघ पडळांनीं सूर्य आच्छादिला जावा-(७५)

**तयापरि (तो) धनुर्धरु । जाला असे दुःखें जर्जरु ।**
**जसा ग्रीष्मकाळि गिरीवरू । वणवला कां ॥ ७६ ॥**

**म्हणौनि सहजें सुनीळु । कृपामृतें सजळु ।**
**तो वोळला असे गोपाळु । माहामेघ ॥ ७७ ॥**

**तेथ सुदर्शनाची द्युती । तेच्चि विद्युल्लता जैसि झळकती ।**
**गंभीर वाचा ते आईति । गर्जनेच्चि ॥ ७८ ॥**

**आतां उदारू तो कैसा वर्षेल । जेणें अर्जुनाचळ निवेल ।**
**मग नवि विरूढि फुटेल । उन्मेषाच्चि ॥ ७९ ॥**

**तेच्चि कथा आयिका । मनाचिया आराणुका ।**
**ज्ञानदेवो म्हणे देखा । निवृत्तिदासु ॥ ८० ॥**

जर्जरू = जीर्ण, पीडित, व्याकुळ. ग्रीष्मकाळिं = उन्हाळ्यात. गिरिवरू = महान् गिरिपर्वतवर (श्रेष्ठ) गिरी = मान्य, पूज्य; संन्याशाचें सन्मानाचें उपपद-आनंदगिरि-(गिरिशृंग = गणपति. गिरिसार = मलय पर्वत. गिरिमान = बलाढ्य हत्ती. गिरिवासिन् = सुरण विशेष) वणवला कां = वणव्यानें व्यापला-(७६). सहजें सुनीळु = अतिशयतेचा सुंदर अशा शुद्ध नीलवर्णाचा-उत्तम श्यामवर्ण. कृपामृतें सजळु = दया अनुग्रहरूपी देवलोकींचें पेय-त्यानें थबथबलेला-आर्द्र, दयायुक्त, ओला, मेघ, ढग जसा-सर्व पाणीच जेथें. वोळला माहामेघ गोपाळु = मेघरूपी गोपाळ प्राप्त झाला, वृष्टि करूं लागला,-आश्चर्याचा झाला-(७७). सुदर्शनाची-सुदर्शनाची द्युति = सुंदर दांतांचें तेज, प्रभा, शोभा, प्रौढी. (सुदंत = नट. सुदंती = वायव्य दिग्गजाची स्त्री. सुदर्श = प्रसन्न मुख. सुदर्शन = सुंदर, मेरु, गिधाड, विष्णूचे चक्र, सुंदर स्त्री, आज्ञा, औषधी चूर्णविशेष. सुदर्शनी = अमरावती.) गंभीर = खोल, दाट. वाचा = वाणी. आईति = विस्तार, लांबी, मिलाफ. गर्जनेचि = आवाज, संताप, युद्ध-(७८). उदारू = दानशूर, मोठा. कैसा वर्षेल = कशी वृष्टि करील, पाणी शिंपडेल, वृष्टि-वर्षाव करील. जेणें-तेणें. अर्जुनाचळ = अर्जुनरूपी पर्वत. (अचल = ब्रह्म, पर्वत, स्थिर.) निवेल = शांत होईल, थंड होईल मग नवी विरुढि = पालवी. फुटेल = उगवेल, बाहेर येईल. उन्मेषचि = ज्ञानाची = बुद्धि, ज्ञानडोळ्यांची उघडझांप, विकास, प्रकटपणा-(७९). मनाचिया आराणुका = मनाच्या समाधानानें-समाधानासाठीं-(मन = अंतःकरणाची ओढ, आवड, इच्छा, जाणीव, हृदयांतील भाव, विकार, चित्त, बुद्धि, विचार, तर्क, स्मृति यांचें उगमस्थान) (८०).

तसा धनुर्धर तो दुःखानें जर्जर झालेला आहे, जसा ग्रीष्मकाळी गिरिवर तो वणवला-पेटला-वणव्यानें व्यापला जावा-(७६)

म्हणून सहजच कीं सुनीळ असा, कृपाअमृतानें सजल असा गोपाल महामेघच कीं वोळला आहे-(७७)

तेथें दर्शन प्रभा द्युति ती सुदर्शनाची–तीच कीं झळकत, प्रकाशत, प्रकाश असलेली विद्युल्लता–वाचा गभीर ती गर्जनेची आइति–(७८)

आतां उदारू (ज्ञान उदार लक्षण असलेला), तो कसा कृपेचा वर्षाव करील, ज्यायोगें अर्जुनरूपी अचळ पर्वत तो निवेल, व मग उन्मेषाची (ज्ञान उन्मेख दृष्टि) नवी अशी विरूढी फुटेल, नवपणानें ज्ञानदृष्टीची ती नवी स्फूर्ति–विरूढी–उगव–ती कशी बोलेल तें–(७९)

तीच कथा ती मनाच्या आराणुकेनें ऐका, असें निवृत्तिदास ज्ञानदेव म्हणतात–(८०)

**संजय उवाच।**

**एवमुक्त्वा हृषीकेशं गुडाकेशः परंतपः।**
**न योत्स्य इति गोविन्दमुक्त्वा तूष्णीं बभूव ह ॥ ९ ॥**

[एवम् उक्त्वा हृषीकेशम् = याप्रमाणें ज्ञानेंद्रिय स्वामी जे हृषाकेश त्यांना बोलून. गुडाकेशः = शिव, अर्जुन. परंतपः = शत्रूंना जिंकणारा. न योत्स्य इति = मी लढणार नाहीं. गोविन्दं उक्त्वा = गोविंदरूपी श्रीकृष्णास म्हणाला. तूष्णीं बभूव = मुकाट्यानें स्वस्थ–गप्प बसला. ह = खरोखरीच कीं. (तूष्णीभावः = मुकाट्यानें असणें).]

**अन्वय:** परंतपः हृषीकेशम् एवम् उक्त्वा च गुडाकेशः "न योत्स्य" इति गोविन्दम् उक्त्वा ह तूष्णीम् बभूव।

**अर्थ:** शत्रूंना तापदायक–जिंकणारा–अशा अर्जुनानें हृषीकेशांना असें म्हणून–निद्रेचा स्वामी (शिव) अर्जुन, गोविंद श्रीकृष्णास "मी नच लढणार" असें म्हणाला व मुकाट्यानें गप्प बसला (९).

[(परंतप), हे धृतराष्ट्र राजा, (गुडाकेशः) अर्जुन श्रीकृष्णाला याप्रमाणें बोलून आणि पुन्हां आपला दृढ निश्चय त्याच्या मनावर बिंबवण्यासाठीं 'मी युद्ध करणार नाहीं' असें कृष्णाला निकराचें असें शेवटचें बोलणें करून–मागून–खरोखर तो अगदीं (मुकाट्यानें) गप्प बसला]

**ऐसें संजयो असे सांगतु। म्हणे राया तो पार्थु।**
**पुनरपि शोकाकुळितु। काय बोले ॥ ८१ ॥**
**आईके सखेद बोले श्रीकृष्णातें। आतां नाळवावें तुम्हि मातें।**
**मि सर्वथा न झुंजे येथें। भरंवसेनी ॥ ८२ ॥**
**ऐसें येकिहेळां बोलिला। मग मौनें करूनि ठेला।**
**तेथें श्रीकृष्ण विस्मो पातला। देखोनि तयांते ॥ ८३ ॥**

शोकाकुळितु–शोकाकुलित = दुःखानें व्याप्त–व्याकुळ झालेला; रुदनांते करितु असे = रडूं लागला–(८१). सखेद = दुःखानें, कंटाळण्यानें. नाळवावें तुम्हि मातें = मीड घालू नका, मनधरणी करूं नका, हाक देऊं नका (युद्ध कर अशी). सर्वथा न झुंजे मि = चहुंबाजूंनीं पाहतां मुळींहि मी युद्ध करणार–लढणार नाहीं. भरंवसेनी = खात्रीनें, निश्चित, विश्वासेंचि कीं–(८२). येकिहेळां बोलिला = एकदम, तत्क्षणींच, एकाच वेळीं, थोडक्यांत. मौनें करूनि–धरूनि ठेला = मौन धरून राहिला. श्रीकृष्ण–विस्मो पातला–विस्मयो पावला = देव आश्चर्याचा झाला; भगवान श्रीकृष्णास आश्चर्य वाटलें–(८३).

असें संजय सांगत आहे–तो म्हणतो कीं, हे राया धृतराष्ट्रा, तो पार्थ पुन्हां अपि शोकानें आकळिला होऊन म्हणत आहे कीं–(८१)

तो पार्थ सखेद असा श्रीकृष्णास म्हणतो, बोलतो, सांगतो कीं–आतां आपण मजला आळविण्याचें करूं नये. अहो देवा, मी तर येथे केव्हांहि सर्वथा भरंवसेंच–भरंवशाचें (असें बोलणें बोलत आहे) सांगतो कीं नच झुंजणार मी–(८२)

असें एकाच हेळा बोलला व मग मौन करून (बसला) आहे–तेथें श्रीकृष्णास अशा त्या पार्थाला पाहून विस्मयो पातला–श्रीकृष्ण आश्चर्ययुक्त झाला–(८३)

**तमुवाच हृषीकेशः प्रहसन्निव भारत ।**
**सेनयोरुभयोर्मध्ये विषीदन्तमिदं वचः ॥ १० ॥**

[तम् = अर्जुनाला. हृषीकेशः = भगवान श्रीकृष्ण. प्रहसन् इव = उपहासात्मक हंसल्यासारखें (करून) दाखवून. भारत = धृतराष्ट्र राजा, भरत वंशज. सेनयोः उभयोः मध्ये = दोन्ही सैन्यांमध्यें. विषीदन्तम् तम् = खिन्न झालेल्या पार्थास. इदं वचः उवाच = याप्रमाणे बोलणें बोलले कीं–].

**अन्वय :** भारत सेनयोः उभयोः मध्ये तम् विषीदन्तम् पार्थम् हृषीकेशः प्रहसन् इव इदं वचः उवाच।

**अर्थ :** भारत धृतराष्ट्र राजा, दोन्ही सैन्यांमध्यें त्या खिन्न झालेल्या अर्जुनाला उपहासात्मक हंसल्यासारखें दाखवून, भगवान् श्रीकृष्ण असें भाषण करिते झाले कीं–(तें पुढें दिले आहे)–(१०).

**मग आपुला चित्तीं म्हणे । येथें हें काय आदरिलें येणें ।**
**अर्जुन सर्वथा कांहिं नेणें । कायि किजे ॥ ८४ ॥**
**हा उमजे आतां कवणीपरि । कैसेनि धिर स्विकारि ।**
**जैसा ग्रहातें पंचाक्षरी । अनुमानि कां ॥ ८५ ॥**
**नातरि असाध्य देखोनि व्याधि । अमृतासम (दिव्य) औषधि ।**
**वद्य सूची निरवधि । निदानिंचि ॥ ८६ ॥**
**तैसें विवरित असे श्रीअनंतु । तया दोन्हि सैन्यां आंतु ।**
**जयावरि पार्थु । भ्रांति सांडि ॥ ८७ ॥**

आपुला–आपुल्या–चित्तीं म्हणे = (चिति = विचार करून) आपल्या विचारानें म्हणतो. येथे हें काय–एथ हें कायि. काय–काय. आदरिले = स्वीकारिलें–(८४) धिर स्विकारि = धीटपण, गंभीरपण, निश्चलपण, अंगिकारील–घेईल. कवणीपरि–कवणेंपरी. ग्रहातें पंचाक्षरी अनुमानि का = भूतबाधा–ग्रह–निवारण्याचा जसा पंचाक्षरी विचार करतो–(८५) असाध्य = बरी नच होण्यासारखी. व्याधि = रोग, आजार. दिव्य–दिव्य = स्वर्गीय, अलौकिक, सुंदर निरवधि निदानिंचि औषधी–औषधी सूची = शेवटच्या प्रसंगाची औषधी वेळ न दवडितां तात्काळ योजनेची करतो–विचार करून ठरवितो–(८६). विवरित असे = स्पष्ट करून सांगत आहे. जयापरी पार्थु–पार्थ भ्रांति साडी = भ्रम, भास, सशय सोडील, टाकील, मागे टाकील. श्रीअनंतु = श्रीकृष्ण–(८७).

मग देव आपल्या मनी म्हणत आहेत कीं, येथ ह्या पार्थानें, काय हें करण्याचे मनावर घेतले आहे अहो! अर्जुन हा तर नेणता सर्वथैव—तो सर्वथा कांहीच जाणत नाही असा! ह्यास काय बरें आतां करावें तें?–(८४)

अहो, आतां हा पार्थ कवण्यापरीनें बरें उमजेल, समजेस येईल, जाणता होईल–कसा तो बरें धीराचा अवलंब करील–धीर स्वीकारील–जसा पंचाक्षरी (भूतबाधा) ग्रहास (अनुमानानेंच कीं कल्पनेनेंच का) विचार करतो–भूतास बोलावयास लावतो जसा–(८५)

अथवा व्याधि असाध्य पाहून निदानीची अशी अमृतासम दिव्य औषधी वैद्य ताबडतोब सूचनेची करतो, योजतो–(८६)

तसें श्रीअनंत, त्या दोन्ही सैन्यामध्यें विवरित आहेत, ज्यायोगें कीं पार्थ तो भ्रांती सांडील–(८७)

**तें कारण मनिं धरिलें। मग सरोख बोलों आदिरिलें।**
**जैसें मातेचां कोपिं थोकलें। स्नेह आथी ॥ ८८ ॥**

**कां औषधाचा कडवटपणीं। जैसि अमृताचि पुरवणि।**
**तें आहाच न दिसे परि गुणीं। प्रकट होये ॥ ८९ ॥**

**तैसिं वरिवरि पाहातां उदासें। आंत तरि अतिसुरसें।**
**तियें वाक्यें हृषीकेशें। बोलों आदरिलीं ॥ ९० ॥**

तें कारण मनिं–मनें धरिलें=मूळ हेतु, प्रयोजन, ध्येय, साधन जीवीं बाळगून, मनानें मनामध्यें घेतलें, आधाराचें केलें. सरोख–सरोष=रागानें. मातेचा कोपि थोकलें स्नेह आथी=मातेच्या क्रोधांत गुप्तपणें राहिलेला स्नेह–प्रेम असतें–तेथें ओलावा असतो. थोकलें=गुप्त, पोटांत (८८). औषधाचा कडवटपणीं=औषधाची न रुचणारी चव, गोडाच्या विरुद्ध औषधाची चव. अमृताचि पुरवणि=अमृताची समृद्धि–उणिवेची भर, पुरवठा, सांठा, व्याप्ति. आहाच न दिसे=ती वरवर पण नच दिसणारी. गुणीं=धर्मानें, स्नेहानें. गुणीं प्रकट होये=परिणाम करण्यानें, औषधाचा गुण होण्यानें प्रकट होतें (८९). वरिवरि पाहातां उदासें=वरवर पाहतां विरक्ततेची–उदास अशी तिऱ्हाईतपणे. आंत अतिसुरसें=अंतःकरणांत, आंतल्या बाजूस, मध्यें, फार उत्तम आवडीची, गोडीची, रससहिततेची, रसाळ, रसयुक्त, कसदार व रसमय. वाक्यें हृषीकेशें बोलों आदरिलीं= वाक्यें, वचन, सिद्धांत–श्रीकृष्णांनी बोलिलीं–बोलूं आरंभिलीं–(९०).

ते "कारणस्य कारण" देवांनी मनी धरून, त्यास सरोख–त्याजवर दृष्टीचा रोख करून आदराचें केलें, बोलूं आदरिलें–जसें, आईच्या रागाचें स्नेह, प्रेम तें थबथबलेलें असें–(८८)

अथवा औषध कडू, तर अमृत पुरवणीचे असें तें उगीच असे वरवर दिसणारे, पण गुणानें तर अमृतच प्रत्यक्ष प्रकट असें–(८९)

तसें वरवर पाहिलें तर उदास, आंत तर अतिसुरस अशी ती वाक्यें, श्रीहृषीकेशांनीं (ज्ञानेंद्रियाच्या स्वामीनीं)–बोलण्यानें आदराचीं केलीं–मोठ्या आदरानेंच कीं बोलिलीं–(९०)

[येथपर्यंत गीताग्रंथाचा भागविषय प्रवेशदर्शक असून गीताशास्त्राच्या प्रवृत्तीचें कारण सांगणारा आहे. हा पूर्वभाग प्रस्तावनारूप असल्यामुळें त्यावर आचार्यांचें भाष्य नाहीं–त्यानीं नुसता उपोद्‌घात लिहून ग्रंथाची संगती लाविली आहे–गीतेचा खरा आरंभ पुढील श्लोकापासून आहे व तेथूनच भाष्याला आरंभ आहे.]

**श्रीभगवानुवाच।**

**अशोच्यानन्वशोचस्त्वं प्रज्ञावादांश्च भाषसे।**
**गतासूनगतासूंश्च नानुशोचन्ति पण्डिताः ॥ ११ ॥**

[अशोच्यान्=ज्याबद्दल शोक करणें उचित नाहीं. अन्वशोचः त्वम्=तूं शोक करीत आहेस. भाषसे प्रज्ञावादान् च=मोठ्या पांडित्याच्या गोष्टी करीत आहेस. गत असून् अगतासून् च=गेलेल्याचा का नच गेलेल्याबद्दल. पण्डिताः न अनुशोचन्ति=पंडित–तत्त्वज्ञानी–मुळींच शोक करीत नाहींत.]

**अन्वय :** अशोच्यान्। अन्वशोचः। त्वम्। प्रज्ञावान्। च। भाषसे। च। पण्डिताः। गतासून। अगतासून्। च। न अनुशोचन्ति।

**अर्थ :** ज्याविषयीं शोक करणें योग्य नाहीं. तेथें तूं शोक करीत बसला आहेस (व तूं अज्ञान आहेस म्हणावें तर-) वर मोठ्या पांडित्याच्या गोष्टी-प्रज्ञावाद-(बुद्धिवाद सांगत) करीत आहेस-पंडित, तत्त्वज्ञानी जे असतात, ते तर गेलेल्याचा-(असु, प्राण, गेल्याविषयीं-)मृताविषयीं-कां (न गेलेल्यांचा मुळींच मृत नच त्या आप्तइष्टांसाठीं-) जिवंत असलेल्यांसाठीं-विषयीं-शोक करीत (बसत) नाहींत-(तत्वज्ञानी जित्या मेल्यांचा हर्ष, खेद, शोक करीत बसत नाहींत-(११).

[पण्डिताः—९२. तत्त्वज्ञानी-१८१, १९३. विवेकिन्-१०२. नित्यरूप-१२४. चैतन्य-११०, १२६, १४४. जाणता-९२. बुद्धिवंत-१२८. विचारपरलोक-१२५. ज्ञानिया-१३१. स्वसुखानुभवी न भोगी ऋद्धि-३६४. स्थितप्रज्ञ-३६८.]

**मग अर्जुनातें म्हणितलें । आम्हि आजी हें नवल देखिलें ।**
**जें तुंवा येथें आदरिलें । माझारिंचि ॥ ९१ ॥**

**तूं जाणता जरि म्हणविसि । तरि नेणिवेतें न संडिसि ।**
**आणि सिकउं म्हणो तरि बोलसि । तूं बहुसाल निति ॥ ९२ ॥**

**जात्यंधा लागे पिसें । मग तें सैरा धांवे जैसें ।**
**तुझें शाहाणपण तैसें । दिसत असे ॥ ९३ ॥**

**तूं आपणपें तरि नेणसि । परि या कौरवातें शोचुं पावसि ।**
**हा बहु विस्मो आम्हांसि । पुढतपुढति ॥ ९४ ॥**

**तरी सांग पां मज अर्जुना । तुजपासूनि स्थिति त्रिभुवना ।**
**हे अनादि विश्वरचना । तें लटिकें कायी ॥ ९५ ॥**

**येथ समर्थ येक आथी । तयापासूनि भूतें होति ।**
**तरि हें वायांचि काय बोलति । जगामाजीं ॥ ९६ ॥**

येथें-एथ. आदरिलें माझारिंचि=मध्येंच जें कांही तुंवा आरंभिलेस. नवल देखिलें आम्हि आजी हें= नवल, आश्चर्यच एक अशी अद्भुत गोष्ट आज आम्हीं पाहिली-(९१). जरि-तरी. तरि-परी. नेणिवेतें = अज्ञानाला. न संडिसि-न सांडिसी : सिकउं-शिकवूं (म्हणो) = शिकवण्यास जावें तो. तूं बहुसाल निति= पुष्कळशी अशी, नाना प्रकारची युक्ति, व्यवस्था, वर्तन, सदाचाराचा मार्ग, नियम बोलत आहेस-(९२). जात्यंधा (=जन्मांधाला) लागे पिसें=जन्मांधाला अज्ञान, वेड, पिसें लागले (-भ्रमांत पाडते) मग तें सैरा धांवे जैसें = मग तें यथेच्छ जसें धावतें. शाहाणपण-शहाणपण = व्यवहाराची जाणीव, समजूतदारी-(९३). आपणपें=स्वस्वरूप. (परि या कौरवातें शोचुं) पावसि-पाहासी. विस्मो-विस्मय पुढतपुढति आम्हांसि हा बहु = आश्चर्यच आम्हांस वाटत आहे-(९४). स्थिति=आधार. लटिकें-लटकें=खोटें का लबाड-(९५). तया-आथी=आहे-समर्थापासूनि भूतें=प्राणिमात्र-पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश-पंचदेव-होती. तरि हें जगामाजी वायांचि ( =व्यर्थच) काय बोलति=असें व्यर्थच बोलणें होतें काय!-(९६).

देवांनीं मग अर्जुनास म्हटलें कीं-म्हणणें तें आदराचें केलें कीं-आम्हीं आज एक मोठेंच नवल देखिलें, पाहिलें जें का तुवां-जें कांहिं येथें संग्रामामध्येंच, रणांगणाचे ठायींच कीं, आधींमधींच कीं माझारीच आदरिलें आहेस-आपलेसें केलें आहेस-महत्त्व घेऊन का देऊन आहेस ज्यास का-(९१)

तूं जाणता-जाणिवेचा-म्हणवितोस, पण नेणतेंपण-नेणीव सांडीत नाहींस; तुला शिकवूं जावें तर सर्व एक नीतीच कीं बहुसाल बोलत आहेस-(९२)

जन्मतः अंध असलेल्यास पिसें लागलें तर तें सैरावैरा इकडे तिकडे धांवत राहतें, तसलें–तसें तुझें शहाणपण दिसत आहे–(९३)

आपलेंपण जाणत नाहींस तूं–तूं आपल्या स्वतःस जाणत नाहींस–स्वतः मी कोण तें नेणतोस–आपणा स्वतःस नेणतोस–(पण) वर या कौरवांसंबंधीं शोचूं बसतोस (कौरवांतें शोचूं पावसी) हाच एक बहुबहु असा–पुन्हा पुन्हा–विस्मयच कीं (आम्हांस वाटत) होत आहे; येथें आश्चर्याचे असें तुझें होणें तें–आम्हांस विस्मय देत आहे-(९४)

तरी येथें हे अर्जुना, मला सांग बरें कीं, काय हें त्रिभुवन तुजमुळेंच स्थितीस, योग्यतेस आलें आहे तें–ही अनादि विश्वरचना लटकी काय?–(९५)

येथें समर्थ येक आहे, त्यापासून भूतें ही होतात, असें जगामध्यें जे बोललें जातें तें वायांच काय? (९६)

**हो कां जें सांप्रत यैसें जालें। जे हे जन्ममृत्यु तुंवा सृजिले।**
**आणि नाश पावे नाशिलें। तुझेनि कायि ॥ ९७ ॥**

**तूं भ्रमले अहंकृति। यांसि घात न धरिसि चित्ति।**
**तरि सांगे काये हे हो (होती)। चिरंजीव ॥ ९८ ॥**

**कीं तूं येक वधिता। आणि सकळ लोक हा मरता।**
**ऐसि भ्रांति झणें चित्ता। यवों देसि ॥ ९९ ॥**

**हें अनादिसीद्ध आघवें। होत जात स्वभावें।**
**तरि तुंवा कां शोचावें। सांगे मज ॥ १०० ॥**

**परि मूर्खपणें नेणसि। न चिंतावें तें चिंतिसि।**
**आणि तुंचि नीती सांगसी। आम्हांप्रति ॥ १०१ ॥**

**देखें विवेकी जे होती। ते दोहिंतेंही न शोचिति।**
**जे होये जाये हे भ्रांति। म्हणौनियां ॥ १०२ ॥**

जाले–जाहाले. सृजिले = पसरिले, उत्पन्न केलेस, प्रसवलेस–(९७) भ्रमले–भ्रमलपणें अहंकृति. चिरंजीव (= दीर्घकाळ जगणारा)–चिरंतन (= जुना, प्राचीन). यासी घात (= नाश) न धरिसी चित्ती = यांचेविषयीं नाश, वध, तडाखा, घात नच मनीं धरीत आहेस–(९८). ऐसि भ्रांति झणें चित्ता यवो देसि = अशी भ्रांति अंतःकरणांत येऊं देऊं नको–(९९). हे अनादिसीद्ध–अनादिसिद्ध हे = अनादिकालापासून असेंच कीं असलेलें. आघवें = सर्व. होत जात स्वभावें = उत्पन्न होतें व नाहींसें होतें सहज प्रकृति मूळधर्म स्वभावें निसर्गतेकरून की. तरि तुंवा कां शोचावें (= शोक करावा) सांगे मज–(१००). परि मूर्खपणें नेणसि = पण अज्ञानामुळें तत्त्व जाणत नाहींस. न चितावें तें चिंतिसि = मनांत आणूं नये जें तेंच चिंतीत–लक्षांत घेत आहेस–पर्वा करीत आहेस. आणि तुंचि नीती (= व्यवस्था, युक्ति, राजकारण) सांगसी आम्हांप्रति = तेंच आम्हासी बोलत आहेस–(१०१). दोहिंतेंही–ते दोहीतेही = जन्म व मृत्यु या दोहोंना. न शोचिति = जन्ममृत्यूमुळें शोकग्रस्त होत नाहीत. होये जाये–होय जाय = होते जाते ही भ्रांतीच एक, मोहांत पडणेंच एक. म्हणौनियां–म्हणउनियां–(१०२).

सांप्रत ऐसें झालें आहे कीं, जे कांहीं जन्ममृत्यू तुंवाच कीं सृजिले, उत्पन्न केलेस व ते जन्ममृत्यू नाशिले तर तुझेनि–तुझ्याकडूनच ते काय नाश पावतील–(९७)

"अहंकृती भ्रमले" तूं यांसी–जन्ममृत्यूस–घात न धरिसी चित्तीं, तरी सांग कीं काय हे चिरंजीव आहेत हो–(९८)

तूं आपले चित्तामध्यें स्वतःसच भुलणें तें भ्रमानें-तेथें भ्रांति येऊं देशील कदाचित, जे का-"तूं एक वधिता व सकळ लोक हा मरता"-(९९)

हे आघवे स्वभावेंकरूनच अनादिसिद्ध असें होत जात-तरी तुंवा शोचावें तें कां, तें मज सांग-(१००)

पण मूर्ख आहेस म्हणून, तणे मूर्खपणें जाणत नाहीस; जें नच चिंतावें तें चिंतीत आहेस-वर तूंच कीं आम्हांस नीति सांगत आहेस-(१०१)

देख, जाण कीं, विवेकी-जें होतें व जातें ही भ्रांतीच एक कीं-आणि म्हणून ते दोहिंतेंही (जन्मणें व मरणें जें) नच शोचिती-(१०२)

**न त्वेवाहं जातु नाऽऽसं न त्वं नेमे जनाधिपाः ।**
**न चैव न भविष्यामः सर्वे वयमतः परम् ॥ १२ ॥**

[न तु एव = असे नाहीच. आहं-अहं जातु = एकादे वेळी-कधींहि पूर्वी. न आसं = असणें, राहणें-नव्हतो. न त्वं न इमे जन अधिपाः = राजा जे; मुख्य लोक न च एव = असेंही नाही. न भविष्यामः = नच पुढें होणारें. सर्वे = सगळें. वयम् अतः परम् = ह्यानंतर, पुढें-देह नाश पावल्यावरहि.]

**अन्वय :** अहं जातु न आसं तु न एव त्वं इमे जनाधिपाः च अतः परम् वयं सर्वे न भविष्यामः न च एव ।

**अर्थ :** मी पूर्वी नव्हतो असें नाहीं; तूं आणि हे राजे नव्हते असेंहि नाही; आणि यापुढेंही आपण सर्व असणार नाहीं असेंहि नाही-(आत्मा नित्य आहेच आहे, देह नाश पावला तरी)-(१२).

**अर्जुना सांगेन आयिक । येथ आम्ही तुम्हि देख ।**
**आणि हे भूपति जे शेष । आदिकरूनि ॥ १०३ ॥**
**नित्यतां ऐसेचि असोनि । नातरि निश्चीत क्षया जाउनी ।**
**हें भ्रांती वेगळी करूनि । दोन्ही नाहिं ॥ १०४ ॥**
**हे उपजे आणि नासे । तें मायावशें दिसे ।**
**येऱ्हवीं तत्त्वतां वस्तु जें असे । तें अविनाशचि ॥ १०५ ॥**
**जैसें पवनें हालवलें । आणि तरंगाकार जालें ।**
**तरी कवणें कें जन्मलें । म्हणों येथें ॥ १०६ ॥**
**तेंचि वायूचें स्फुरण ठेलें । आणि उदक सहज सपाटलें ।**
**तरि काय आतां निमालें । विचारिं पां ॥ १०७ ॥**

आयिक-आइक. जे शेष-अशेष = अशेष, सर्व-(१०३). नित्यतां = ते निरंतर-नित्यता-नित्य असेच राहतील (असणार) किंवा निश्चयानें लयाला जातील (क्षया जाणार) ह्या दोन्ही गोष्टी भ्रांति-केवळ भास-सोडून पाहिलें तर खऱ्या नाहींत-(१०४). मायावशें = जीव मायेच्या आधीन आहे तोवर-मायेच्या योगानें. वस्तु = परब्रह्म. तत्त्वता = खरेपणानें अविनाशचि = नाशरहित-(१०५). कवणे-कवण. म्हणो येथे-म्हणो ये एथ पवनें तोय = वाऱ्याच्या योगानें उदक. कें = कुठचें, कोठें-(१०६). सपाटले-सपाट जाहलें = स्थिर झालें तरि काय आतां-तरि आतां काय. निमालें = लय पावले. विचारिं पां = विचारास घेऊन पाहा-(१०७).

अर्जुना, ऐक सांगेन तें, जें का देख कीं-तुम्ही आम्हीं व हे भूपति आदिकरूनि हे सर्व-(१०३)

नित्यता-नेहमींच्या नेहमीचे असेच असून (आहेत), तरी निश्चित क्षयास जाऊन, दोन्हींहि नाहीं असें भ्रांतीचें न होतां जाण-(१०४)

हे उपजे आणि नासे, तें मायावशें दिसे, येऱ्हवीं तत्त्वता जें वस्तु असे, तें अविनाशचि–(१०५)

जसें वाऱ्यानें पाणी हालवलें व तें तरंगाकार झालें, तर तेथें कोण बरें तें जन्मले–म्हणणें होतें–का म्हणावें–(१०६)

तें वायूचें स्फुरण बंद झालें व उदक, पाणी तें सहज सपाट झालें, तरी आतां विचार की तें काय आतां जें निमालें तें. . . . (१०७)

**देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा ।**
**तथा देहान्तरप्राप्तिर्धीरस्तत्र न मुह्यति ॥ १३ ॥**

[अस्मिन् देहे = देहामध्येंच यथा देहिनः = देहधारी आत्म्याला. कौमारं यौवनं जरा = बाल, तरुण, वृद्ध अवस्था. तथा देहान्तरप्राप्तिः = दुसरा देह प्राप्त झाला असतां. तत्र = तेव्हां. जेव्हां का देहनाशानंतर दुसरा देह प्राप्त झाला तरी त्याविषयीं. धीरः = विद्वान्. न मुह्यति = मोहानें शोकाकुल होत नाही ]

**अन्वय :** अस्मिन् देहे यथा देहिनः कौमारं यौवनं जरा तथा देहान्तरप्राप्तिः तत्र धीरः न मुह्यति ।

**अर्थः** ह्या देहामध्यें ज्याप्रमाणे देहधारी आत्म्याला बाल्य, तारुण्य व वृद्धपण–वार्धक्य, त्याप्रमाणेच देहनाश झाला तरी दुसऱ्या देहाची प्राप्ति होते तेव्हां देखील विद्वान मोहानें शोकाकुल होत नाहीं–(कारण आत्मा तो आहेच आहे, तो काहीं नाश पावणारा नव्हे)–(१३).

**आयिके शरिर तरि येक । परी वयसाभेदें अनेक ।**
**हें प्रत्यक्षचि देख । प्रमाण तुं ॥ १०८ ॥**
**येथें कौमारत्व दिसे । मग तारुण्य तें भ्रंशे ।**
**परी देहचि न नासे । येकेकासवें ॥ १०९ ॥**
**तेसीं चैतन्याचा (च्या) ठाईं । यें शरिरांतरें होति जाति पाहिं ।**
**येसें जाणे तयां नाहिं । व्यामोहदुःख ॥ ११० ॥**

वयसाभेदें = वयपरत्वें (१०८). देहचि–देहीच = आत्मा, देहाभिमानी जीव–(१०९). चैतन्याचा (च्या) ठाईं = चिच्छक्तीच्या ठिकाणीं, आत्म्याच्या ठायीं. शरिरांतरें = वेगवेगळीं शरीरें. व्यामोह (दुःख) = भ्रांतीमुळें–मोहभ्रांतीपासून होणारें दुःख–(११०).

ऐक कीं, शरीर तरी एकच–पण वयामुळे अनेकतेचें असें–हें येथें तूंच प्रत्यक्षच प्रमाण पाहा–(१०८)

येथे कौमारत्व दिसतें, मग त्याच्या भ्रंशानें तारुण्य तें–तें येतें–पण एकेकाबरोबर–कौमारत्वा का तारुण्यतेबरोबर–देह नच नासे कीं–(१०९)

तशीं ही शरीरांतरें हीं पाहा कीं चैतन्यांच्या ठायींच होतात जातात, व ऐसें हें जो जाणतो त्यास मोह-दुःख होत नाही–(११०)

**मात्रास्पर्शास्तु कौंतेय शीतोष्णसुखदुःखदाः ।**
**आगमापायिनोऽनित्यास्तांस्तितिक्षस्व भारत ॥ १४ ॥**

[मात्रास्पर्शाः = इंद्रियस्पर्श = इंद्रियाजवळचें होणें–इंद्रिय विषय संयोग–शीत उष्ण सुख–दा = इत्यादि भावना उत्पन्न करितात. तु = परंतु. ते आगम अपायिनः = उत्पत्ति, विनाशयुक्त असे येणारे जाणारे असल्यानें अनित्यतः = ते क्षणिक होत. अतः तान् तितिक्षस्व = म्हणून त्याना सहन कर. अतः = यासाठीं.]

**अन्वय :** कौंतेय मात्रास्पर्शाः तु शीत उष्ण सुख दुःख दा आगम अपायिनः अनित्याः अतः तान् भारत तितिक्षस्व ।

**अर्थ :** हे कौंतेया! इंद्रियविषय संयोग (स्पर्श) शीत, उष्ण, सुख, दुःख भावना (देतात)–उत्पन्न होतात, उत्पन्न करतात–परंतु ते इंद्रियविषय संयोगवियोग–आगम (उत्पत्ति) व अपायिनः (विनाश) यांनीं युक्त–येणारे जाणारे म्हणून क्षणिक असे–यासाठीं (अतः) त्यांना सहन कर–(सुखानें मदयुक्त होऊं नको, दुःखानें घाबरूं नको (१४).

[ (आगम = येणें, प्राप्ति, लाभ, उत्पत्ति, दत्तऐवज, उत्पन्न, मिळकत, विद्या, शास्त्र, वेद, मंत्र, तंत्र, शब्दप्रामाण्य, मार्ग, येण्याचा रस्ता, घडणें, फळ.). अपायिनः = (अपाय = वियोग, निघून जाणें, नाश, अरिष्ट, शेवट, विनाशयुक्त असें). मात्रा = माप, इयत्ता, मर्यादा, सूक्ष्म भाग, अंश, इंद्रियांचे विषय विकार, ऱ्हस्व स्वरोच्चारास लागणारा काळ, अक्षरावरची मात्रा. वृत्त–(१४)]

**येथें नेणावया हेंचि कारण । जें इंद्रियां आधिनपण ।**
**तिंहिं आकळिजे अंतःकरण । म्हणोनि भ्रमे ॥ १११ ॥**
**इंद्रियें विषये सेविति । तेथें हर्ष शोक हे उपजति ।**
**ते अतर आप्लविति । संगें येणें ॥ ११२ ॥**
**जयां विषयांचा ठाईं । येकनिष्ठता कहिं नाहिं ।**
**तें दुःख आणि कांहिं । सुखहि दिसे ॥ ११३ ॥**
**देखें हे शब्दाचि व्याप्ति । निंदा आणि स्तूति ।**
**तेथें द्वेषाद्वेष उपजति । श्रवणद्वारें ॥ ११४ ॥**
**मृद आणि कठिण । हे स्पर्शाचे दोन्हि गुण ।**
**जे वपुचेनि संगे कारण । संतोष खेद ॥ ११५ ॥**
**भ्यासुर आणि सुरेख । हें रूपावें स्वरूप देख ।**
**जें उपजवि सुखदुःख । नेत्रद्वारें ॥ ११६ ॥**

येथें–एथ. इंद्रियां आधिनपण = इंद्रियांच्या वश्य, स्वाधीन झाल्यानें. म्हणोनि–म्हणऊनि आकळिजे = (ओढावे). इंद्रिये तीं अंतःकरण (चित्त) ओढतात व म्हणून भ्रम–भ्रमे = गोंधळात पडतो, भ्रांत होतो. तीं इंद्रियें चित्त (अतःकरण) विषयाकडे ओढतात, म्हणून हा भ्रांत होतो–भ्रमांत पडतो–(१११). इंद्रियांचा विषयांशी संयोग–इंद्रियाचे विषयसेवन करणें–तेथे हर्ष शोक हे उपजतात इंद्रियें तीं संयोगामुळें–देहसंगामुळें –अतर–अत.करण आप्लविति–सुखदुःखांत बुडवितात. संगे येणे ते अंतर आप्लविती = विषयसंगतीमुळें हर्ष, शोक अतःकरण व्यापतात = अंतर हर्ष शोकांत बुडवितात–(११२). येकनिष्ठता( = स्थिरता, एकविधपणा) कहि नाहि = कधीहि नित्यस्थितीचें असे स्थैर्य नाहीं. तें–तेथ दुःख आणि कांहिं सुखहि दिसे = त्यामुळें कधीं दुःख तर कधी सुख असें होतें (ह्या संगामुळें कीं)–(येकनिष्ठता = अंतःकरण, चित्त, नित्यस्थिती, शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध–(११३). शब्दाचि व्याप्ति । निंदा स्तुतिची । श्रवणद्वारें द्वेष अद्वेष उपजणारे ज्ञानेंद्रियें = श्रवण, नयन, त्वचा, घ्राण, रसना (११४). स्पर्श–गुण मृदु कठीण देहसंगानें संगती संतोष अथवा खेदास सुख-दुःखांना कारण होणारा–(११५) रूप–स्वरूप–भ्यासुर सुरेख नेत्रद्वारें सुखदुःख उपजविणारे–(११६).

*नेणावयास येथें हेंच कारण जें का (इंद्रियाधीनपण)* इंद्रियांच्या आधीनपणानें असणें तें–व त्या इंद्रियांनींच कीं अंतःकरण आकळावें, आकळिले व्हावें असें, ज्यायोगे अंतःकरणाचे तेथें भ्रमणें हें भ्रांतीचें होणारें होय–(१११)

इंद्रियें विषय सेवितात; तेथें इंद्रिय व विषयांच्या मिळण्यावर हर्ष उपजतो का शोक होतो, तो त्या संगामुळें–इंद्रिय व त्याचा विषय ह्याच्या संगानें–मिळण्यानें–अंतर तें अंतःकरण तेंच कीं मुळीं आकळितात, आप्लवितात, सुखदुःखांत बुडवितात–(११२)

अहो, ज्या विषयाच्या ठायीं-इंद्रियासंबंधींची ती-त्या एकनिष्ठतेचे मुळींसुद्धा नाव नाहीं, तेथें तें दुःख दिसतें व कांहीं सुखहि दिसतें; असतें जसें-(११३)

(शब्द) जाण कीं निंदा व स्तुति ही शब्दाची व्याप्ति-तेथें द्वेष अद्वेष हे श्रवणद्वारानें उपजणारे-(११४)

(स्पर्श)-मृदु आणि कठीण हे स्पर्शाचे दोन गुण, जे का देहवपूच्या संगामुळें संतोष का खेद कारणाचे होणारे-(११५)

(रूप)-भयासुर तसेंच सुरेख असें रूपाचें स्वरूप (होय) जाण-जें नेत्रद्वारें सुखदुःख उपजविणारें होतें-(११६)

**सुगंध आणि दुर्गंध। हा परिमळाचा भेद।**
**जो घ्राणासंगें विषद। तोष देता॥ ११७॥**

**तैसाचि द्विविध रसु। उपजवि प्रीतित्रासु।**
**म्हणोनि हा अपभ्रंशु। विषयसंगु॥ ११८॥**

**देखें इंद्रियां आधीन होईजे। तरि शीतोष्णांतें पाविजे।**
**आणि सुखदुःखि आकळिजे। आपणपें॥ ११९॥**

**या विषयांवांचुनि कांहिं। आणिक सर्वथा रम्य नाहिं।**
**यैसा स्वभावोचि हो पाहीं। इंद्रियांचा॥ १२०॥**

**हे विषय तरि कैसे। रोहिणिचें जळ जैसें।**
**कां स्वप्नीचा आभासे। भद्रजाति॥ १२१॥**

**देखें अनित्य तियापरि। म्हणौनि तूं अव्हेरिं।**
**हा सर्वथा संग न करिं। धनुर्धरा॥ १२२॥**

गंध = परिमळ, वास भेद-सुगंध दुर्गंध-घ्राणाच्या संगानें = घ्राणेंद्रियाच्या योगानें विषाद देणारा अथवा तोष तुष्टि खेद आनंद देता होतो-(११७). रस-मधुर कटु द्विविध = दोन प्रकारचा-प्रीति-त्रास-आवड अथवा कंटाळा उपजविणारा म्हणून (अपभ्रंश करणारा-संस्कृताहून कनिष्ठ भाषा त्यास अपभ्रंश म्हणतात) हा विषयाचा संग वृत्ति चंचल करणारा असल्यामुळें अविचाराचा होतो, स्वरूपापासून पतन करणारा होतो -(११८) आधीन = स्वाधीन. सुखदुःखि आकळिजे = आवरिला होतो. आपणपे = स्वतः आपण-(११९). इंद्रियें रमविणारीं होत-असा इंद्रियांचा स्वभावच अहो! विषयच सर्वथा रम्य, त्यांवांचून दुसरें कांहीहि रम्य असें रमविणारें नाहीच-(१२०). रोहिणिचें जळ = [(माहेयी सौरभेयी, गौः, उस्रा, माता, शृङ्गिणी, अर्जुनी, अघ्न्या, रोहिणी इति ९ गवि।) रोहिण = दिवसाचा नववा मुहूर्त, सुमारें दुपारीं १२॥ वाजल्यापासून १। वाजेपर्यंतचा काल = अपराण्ह काळ-त्यात दिसते म्हणून मृगजळ, रोहिण. रोहिणी (रोहित) = तांबडी गाय, गाय, (ज्यो) चौथें नक्षत्र, नऊ वर्षांची कन्या, गंडमाळा, वीज, केदार कुटकी. स्वप्नीचा = जीवावस्था विशेष, अज्ञानावस्था, दोष, आळस. भद्रजाति = हत्ति. आभास = दर्शन. विषय मृगजळासारखे किंवा स्वप्नांत भासणाऱ्या गजांत लक्ष्मीसारखे मिथ्या आहेत. [भद्र = (१) सुखी, शुभमुख, श्रेष्ठ, अनुकूल, चांगला, भला, सुंदर, सुखकर, स्तुत्य. (२) बैल, हत्तिभेद. (३) खंजरीट पक्षी. (४) ढोंगी. (५) मेरु पर्वत. (६) देवदार, निवडुंग. (७) कडधान्य. —(१) गंगा, (२) गाय, (३) २।७।१२ तिथी, (४) सुभद्रा, (५) हळद, शमी, अनंत, (६) आकाशगंगा. (१) सुख, कल्याण. (२) सोनें (३) नीलकमल. भद्रकाली = दुर्गादेवी] (१२१). अनित्य = नश्वर, नित्याच्या उलट अनित्य. प्रसंगविशेषींच करण्याचें, अनिश्चित.

नित्य = शाश्वत, ध्रुव, नित्य, सनातन. ते = विषय. सर्वथा = सर्वप्रकारें, एकंदरित, पूर्णपणें. संग = आसक्ति, विषयासक्ति, संयोग, संबंध, एकत्र येणें.–विषय संग वृत्ति चंचल करणारा असल्यामुळें स्वस्वरूपापासून ढळविणारा आहे—(१२२)

(गंध, परिमळ)-सुगंध तसेंच दुर्गंध हा परिमळाचा भेद, जो का घ्राणाच्या संगानें विषाद देणारा अथवा तोष (देता) देणारा असा–(११७)

(रस)-तसाच (द्विविध) दोन तऱ्हांचा रस प्रीति का त्रास उपजवितो आणि म्हणून विषयसंग हा अपभ्रंश-(११८)

इंद्रियाच्या आधीन व्हावें तरी शीत व उष्ण असें भासणारें, सुखदुःख झालें तर (स्वस्वरूप झांकून टाकणारें = आपणें = स्वतःस) स्वतःसच कीं तें आकळणारें असें होतें-(११९)

ह्या विषयांवांचून दुसरें कांहींहि सर्वथैव रम्य असें दुसरें कांहीहि नाही असाच कीं ह्या इंद्रियांचा स्वभाव पाहा–(१२०)

विषय हे कसे आहेत म्हणावें तर जसें का रोहिणीचें जळ (मृगजळ), अथवा स्वप्नीं (दिसणारा) आभासणारा भद्रजाति (हत्ति–गजांतलक्ष्मी) होय– (१२१)

जाण कीं यापरि (प्रमाणें), अशा तऱ्हेनें ते अनित्य म्हणून, तूं, हे धनुर्धरा, त्यांना अव्हेर–सर्वथा संग हा त्या विषयांशी नच कर–(१२२)

**यं हि न व्यथयन्त्येते पुरुषं पुरुषर्षभ ।**
**समदुःखसुखं धीरं सोऽमृतत्वाय कल्पते ॥ १५ ॥**

[पुरुष ऋषभ = श्रेष्ठ नर = पुरुषर्षभ = पुरुषश्रेष्ठ. समदुःखसुखं = सुखदुःख समान मानणारा. धीरम् = बुद्धिमान. सः = तो पुरुष. अमृतत्वाय = मोक्षाला. कल्पते = समर्थ होतो, योग्य होतो.]

**अन्वय :** पुरुषर्षभ, एते (विषया) यम् धीरं पुरुषं समदुःखसुखम् न व्यथयन्ति, स पुरुषः अमृतत्वाय कल्पते ।

**अर्थ :** पुरुषश्रेष्ठ, नरश्रेष्ठ अर्जुना, ज्या बुद्धिमान पुरुषास सुखदुःख समान आहेत, त्याला हे विषय मनोव्यथा–संसारव्यथा–करीत नाहींत; संताप उत्पन्न करूं शकत नाहींत (१५)

**हे विषय जयातें नाकळिती । तया सुखदुःखें दोन्हि न पवति ।**
**आणि गर्भवाससंगति । नाहिं तया ॥ १२३ ॥**
**तो नित्यरूप पार्था । वोळखावा सर्वथा ।**
**जो या इंद्रियार्थां । नागवेचि ॥ १२४ ॥**

नाकळिती–न आकळिती = आकर्षित नाहींत. सुखदुःख (दोन्हीं)–सुखदुःखे = सुख तसेंच दुःख न पवति = प्राप्त होत नाहींत. गर्भवाससंगति = मातेच्या उदरांत पचणें नऊ महिने जें–(१२३). नित्यरूप (नित्यतृप्त) वोळखावा = समजावा, जाणावा. इंद्रियार्थां नागवेचि जो = जो इंद्रियांच्या अर्थांमध्ये म्हणजे विषयांमध्यें सांपडत नाहीं (अर्थ = हेतु, इच्छा, ध्येय. इंद्रियविषय = शब्द, स्पर्श, रूप, रस, गंध प्रत्येकीं) (१२४).

विषय हे ज्यास आकळीत, आवडीत नाहींत, त्यास सुख का दुःख (रूपी द्वंद्वें) हीं होत नाहींत; तसेंच त्यास गर्भवासंगती नाहीं (पुनर्जन्म घेणें नाहीं) (१२३)

हे पार्था, असा तो सर्वथैव नित्यरूप असा ओळख–जो ह्या इंद्रियांच्या अर्थांस (विषयांस) सांपडत नाहीं. (१२४)

**नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः ।**
**उभयोरपि दृष्टोऽन्तस्त्वनयोस्तत्त्वदर्शिभिः ॥ १६ ॥**

[न असतः = नित्यता किंवा स्वतंत्र सत्ता नाहीं, पराधीन अशा विद्यमान वस्तूला. भावः = स्वयमेव उत्पत्ति, अस्तित्व. न विद्यते = असत नाहीं. अभावः = नाहींपणा, नाश. सतः = जें खरें, स्वतंत्र, सत्ताधारी, नित्य अशी विद्यमान वस्तु. न विद्यते = असत नाहीं. तु = परंतु. तत्त्वदर्शिभिः = सत्यसिद्धांती, तत्त्वज्ञानी पुरुषांनीं अनयोः उभयोः अपि = दोहोंचाहि. अन्तः = यथार्थ निर्णय. दृष्टः = पाहिलेला, अनुभवलेला असतो]

**अन्वय :** असतः भावः न विद्यते । सतः अभावः न विद्यते । तु अनयोः उभयोः अपि तत्त्वदर्शिभि· अन्त दृष्टः ।

**अर्थ :** [नसणारें, खोटें, वाईट, अयोग्य, निरुपयोगी (ला०) शून्य, असत्य, अविद्यमान, कार्यरूप (जग)] जें असत् म्हटलें त्यास रूप (स्वयमेव उत्पत्ति, अस्तित्व) असत नाहीं व जें सत [खरें, चांगले, असणारें, योग्य, पूज्य, सुंदर, प्रत्यक्ष होणारें, मूर्त, व्यक्त (पृथ्वी, आप, तेज), साधु, सद्गुणी मनुष्य, अस्तित्व, सत्यता, सत्यवस्तु, ब्रह्म, कारण, आदरसत्कार, (सगुण मूर्त)] म्हटलें त्यास स्वरूप रूप असतेंच असतें; या दोहींचा यथार्थ निर्णय सत्यसिद्धांत पाहणाऱ्या तत्त्वज्ञानीयांनीं अनुभविलेला असतो.

(विकार असत्य होत, कारण ते कांहीं काळच टिकणारे असतात. ते नित्य नसतात)-(१६).

**आतां अर्जुना आणिक कांहिं येक । सांगेन मी आयिक ।**
**जें विचारपर लोक । वोळखति ॥ १२५ ॥**

**या उपाधिमाजीं गुप्त । चैतन्य असे सर्वगत ।**
**तें तत्वज्ञ संत । स्वीकारिती ॥ १२६ ॥**

**सलीलीं पय जैसें । येक होउनि मिनलें असें ।**
**परि निवडुनि राजहंसे । वेगळें किजे ॥ १२७ ॥**

**कीं अग्निमुखिं किडाळ । तोडुनियां चोखळ ।**
**निवडिति केवळ । बुद्धीवंत ॥ १२८ ॥**

आणिक कांहिं येक = आणखी कांहीं दुसरे. आयिक-आइक जें विचारपर = दूरदर्शी, युक्तायुक्त विचार करणारे, तत्त्वनिर्णय जाणणारे. लोक = जन, समुदाय (१२५). उपाधिमाजीं गुप्त = उपाधि = विश्वामध्यें, जगामध्यें, पांच भौतिक सृष्टीत गूढ गुप्त असें चैतन्यतत्त्व आहे. चैतन्य असे सर्वगत = पांच भौतिक सृष्टींत चैतन्य चिच्छक्ति तत्त्व सर्वव्यापक-सर्वगत-असें आहे. तें तत्त्वज्ञ = ब्रह्मतत्त्व जाणणारे-ब्रह्मस्वरूप जाणणारे-यथार्थवादी. संत-सतत = नेहमीं तत्त्व जाणणारे ते संत-सतत. स्वीकारिती = आश्रयतात (१२६). सलीलीं पय = पाण्यामध्यें दूध जसें. वेगळें किजे राजहंसे निवडुनि = राजहंस दूध पाणी मिसळलेलें तें निवडून पाणी पाणी, दूध दूध, असें वेगळें करितात. राजहंस = चोंच व पाय तांबडे असलेला शुभ्र हंस. येक होउनि मिनलें असें = एकजीव होऊन मिसळलेलें असतें (१२७) अग्निमुखिं = अग्नींत तापवून (शुद्ध करून घेतात). किडाळ = हीणकट. किडाळ तोडुनियां = हीणकट, डागलग सोनें जाळून. चोखळ = शुद्ध. बुद्धीवंत-बुद्धिमंत = बुद्धिसंपन्न चतुर ते (निश्चयरूप अंतःकरण वृत्तीचे ते बुद्धिमंत) (१२८).

अर्जुना, आतां आणीक कांहींएक सांगेन तें ऐकण्याचें कर-जें का विचार करणारे, विचारानें चालणारे लोक ओळखतात-(विचारपर लोक)-(१२५)

त्या उपाधीमध्यें, पांच भौतिक सृष्टींत सर्वगत असें गुप्त चैतन्य असतें, आहे,-तें तत्त्वज्ञ असे संत स्वीकारतात-किंवा त्याचा स्वीकार करतात. (१२६)

पाण्यामध्यें जसें दूध एकजीव होऊन मिनलें, मिळालेलें, मिसळलेलें असतें; पण राजहंसांनीं तें निवडून वेगळें केलें, करावें जसें-(१२७)

अथवा बुद्धिवंत जे, ते अग्निमुख म्हणजे अग्नीमध्यें अग्नीनें, किडाळ अशुद्ध तें तोडून (बाजूस करून)-केवळ सुवर्ण चोखाळ तें निवडितात-

**नातरि जाणवेचीया आयीणिं। करितां दधिकडसणिं।**
**मग नवनित निर्वाणिं। दिसे जैसें॥ १२९॥**

**कां भुसबिज येकवाट। उपणितां राहे घनवट।**
**तेथें उडे तें फलकट। जाणो आलें॥ १३०॥**

**तैसें विचारितां नीरसलें। तें प्रपंच सहजें सांडवलें।**
**मग तत्वतां तत्व उरलें। ज्ञानियांसि॥ १३१॥**

**म्हणोनि अनित्याचा ठाईं। तया आस्तिक्यबुद्धि नाहिं।**
**निष्कर्षु दोहिंहि। देखिला असे॥ १३२॥**

जाणवेचीया-जाणिवेच्या = ज्ञानाच्या. आयीणि-आयणी = चातुर्यानें, आवडीनें. कडसणि = (दधि) घुसळण्याचें केलें असतां शेवटीं. नवनीत = लोणी. निर्वाणिं दिसे जैसें = शेवटीं दिसूं लागतें-(१२९). भुस-बीज येकवाट-भूस बी एकवट = कोंड्यासहित धान्य. उपणितां = पाखडितां, पाखडतां. राहे घनवट = दाणे तेवढे (मागे) राहतात; सारभूत धान्य तेवढें राहतें. तेथें उडे तें फलकट जाणों आलें = फोलकट तें उडून गेल्यानें, फोलकट तें फोल असें जाणलें होतें-(१३०). विचारिता = दूरदर्शीपणानें, युक्तायुक्त विचारानें, तत्त्वनिर्णयानें. नीरसलें = मिथ्या समजणें, नाहींसें होणें. तें प्रपंच सहजें सांडवलें = प्रपंचाचें, विस्ताराचें, पाल्हाळाचें तें, माया अविद्येचें तें, जगच संसार मानला तें, भ्रम-तें सहजच कीं मिथ्या मानलें होतें. मग तत्वतां = यथार्थपणें-तत्त्वज्ञानी जो त्यास यथार्थज्ञानेंकरून. तत्व उरलें = सत्य बाकी राहिलें. ज्ञानियांसि = ज्ञानी जो त्यास ब्रह्मच कीं सांपडतें-(१३१). अनित्याचा ठाईं = नश्वर, अनिश्चित, असत्य, अनित्य जें तेथें. तया आस्तिक्यबुद्धि नाहिं = तया ज्ञानियांना सत्यता का सत्यबुद्धि नाहीं आस्तिक्यबुद्धि = सत्यबुद्धि. दोहिंहि निष्कर्षु देखिला असे = दोहोंमधील (नित्य अनित्य)-सत् व नित्य, आणि असत् व अनित्य यांमधील निर्णय त्यांनीं अनुभविला असल्यानें-(१३२).

जाणतेपणाच्या आवडीनें, चातुर्यानें दहीं हें घुसळिलें असतां, शेवटीं नवनीतच एक जसें दिसतें-हातीं येतें-(१२९)

भूसबीज एकवटून असलेलें तें कांडून उपणिले-वाऱ्यावर धरिलें, तर घनवट असें बीज तें राहतें, उरतें व फलकट तें उडून जातें-तसें बीज तें घनवट व उडून जातें तें फलकट होय, असें जाणीवे। आलें-येतें-(१३०)

त्याप्रमाणें विचारलें तर, विचारास घेतलें तर, निरसनच होतें ह्या शंकेचें तें-जें का विचारानें घनवट जड असें बीज तें उरणारें तें तत्त्व परब्रह्म व प्रपंच तें सहजपणेंच कीं सांडवलें, उडालें असें होतें; व मग तत्त्वदृष्ट्या तत्त्वच एक, वस्तूच एक परब्रह्मच एक तें ज्ञानियांस उरतें-शिलकीचें असतें-(१३१)

म्हणून आणि याजकरितां, एवढ्याचसाठीं असें आहे म्हणून, खरें पाहिलें तर, अहो येथें अनित्य असत्-अनित्य, असत्य जें त्याच्या ठायीं आस्तिक्यबुद्धि-सत्यबुद्धि-नाहीं, व नित्य जें त्याच्या ठायीं तत्त्व सत् सत्य, नित्यरूपच उरून असतें! असा दोहोंमधील निष्कर्ष तो देखिला, पाहिला, जाणला, जाणवला होतो-(१३२)

**अविनाशि तु तद्विद्धि येन सर्वमिदं ततम् ।**
**विनाशमव्ययस्यास्य न कश्चित् कर्तुमर्हति ॥ १७ ॥**

[अविनाशि = कधींहि नाश न पावणारें असें. तत् तु विद्धि = तत् (ब्रह्म) तर समज, जाण. येन ततम् सर्वम् इदम् = (येन) ज्यानें (ततम्) व्याप्त आहे (सर्वम्) दृश्य विश्व (इदम्) हें. विनाशम् = (१) नाश. (२) (नश्वर) जग, कार्य, ब्रह्म. (३) अदर्शन ; गुप्त होणें; घात करणें जें. अस्य अव्ययस्य = ह्या निर्विकार आत्म्याचा, ब्रह्माचा, शाश्वत तत्त्वाचा. कर्तुम् अर्हति न कश्चित् = (घात) करण्यास कोणीहि समर्थ नाहीं.]

**अन्वय :** येन सर्वम् इदम् ततम् तत् अविनाशि विद्धि । तत् (अविनाशि) विनाशम् कर्तुम् न कश्चित् अर्हति ।

**अर्थ :** ज्यानें हें सर्व व्यापिलें (आंथरित) आहे तें अविनाशी (तत्त्व) जाण ; त्या अविनाशी निर्विकार (ब्रह्म) तत्त्वाचा–कार्यब्रह्माचा– कोणीहि नाश (विनाश) करण्याच्या योग्यतेचा, समर्थतेचा नाहीं-कुणासहि त्याचा विनाश करण्याचा अधिकार नाहीं–बरोबरीचें होणें नाहीं–(१७).

**देखें सारासार विचारितां । भ्रांति ते पाहिं असारता ।**
**तरि सार तें स्वभावतां । नित्य जाणें ॥ १३३ ॥**
**ह्या लोकत्रयाकार । तो जयाचा विस्तार ।**
**तेथ नामवर्ण आकार । चिन्ह नाहिं ॥ १३४ ॥**
**जो सर्वदा सर्वगतु । जन्मक्षयातीतु ।**
**तया केलियाहि घातु । कदा नव्हे ॥ १३५ ॥**

देखें = पाहा, जाण. सारासार–(सार = मुख्य, योग्य, समर्थ, तत्त्वांश, मुख्य भाग, बल, शौर्य, संपत्ति, पाणी, योग्यता) (असार = निःसत्त्व, निरुपयोगी, अशक्त, दुबळा, गरीब, तुच्छ, अनावश्यक भाग). विचारितां = विचार करितां, युक्तायुक्त विचार पाहतां. भ्रांति पाहिं असारता = निःसत्त्व, अनावश्यक भाग त्याचे ठायीं घोंटाळणें, (भ्रांति)–चंचलता, गोंधळणें तें निरुपयोगी होय. सार तें स्वभावतां नित्य जाणें. = तत्त्वांश स्वभावें-करूनच कीं तें (नित्य) सनातन स्वभावसिद्ध स्थिर असें होय. नित्य = सनातन–(१३३). लोकत्रयाकार–लोक त्रय आकार = स्वर्ग, मृत्यु, पाताळ, आकृति (स्वरूप). विस्तार जयाचा तो = तो ज्याचा विस्तार, वाढ, फैलाव, विस्तीर्णता, रुंदी, सर्व हकीकत, (ग.) व्यास, झाडाचा विस्तार, (विस्तर = प्रार्थना, प्रणय, आधार, आसन, पीठ, समूह, वैपुल्य, बोलण्याचा पाल्हाळ, विस्तार, फैलाव). तेथ नाम = प्रसिद्धि, नांव, खरेंच, संभव, संमति, स्वीकार, क्रोध, स्मृति, विस्मय, निंदा. वर्ण = जाती, रूप, रंग, आकार, जातप्रकार, अक्षर, शब्द, गुण, स्तुति, कीर्ति, आकृति, वस्त्र, हत्तीची झूल, उटणें, सोनें, व्रत, चित्र, पद्यरचना, तूर (व) केशर, अक्षर. आकार = नांव, रंग व रूप,–सौंदर्य, अभिप्राय, प्रकार, सूचना, खूण, (सां.) ऐक्य, ऐक्यज्ञान, आकृति, स्वरूप, चेहरा, चेहऱ्यावरील विकार, मुद्रा. चिन्ह = खूण, डाग, लक्षणदर्शक गोष्ट, ठसा, धोरण, पताका, (चिन्हकारिन् = मारणारा, भयंकर. चिन्हित = प्रख्यात)–(१३४). सर्वदा = नेहमीं. सर्वगतु = सर्वव्यापी. जन्मक्षयातीतु = जन्ममरण दूर गेलेला–रहित. क्षय = ऱ्हास, नाश, घर, (ग.) ऋणसंख्या, (क्षय, शोष, यक्ष्मा) (क्षय, स्थान, वृद्धि) (क्षय, क्षिया, अपचय). (क्षिया = दुर्वर्तन, आचारोल्लंघन, नाश, ऱ्हास. अपचय = ऱ्हास, कमी होणें, नाश, क्षय, नुकसान, पराजय, (फुलें) गोळा करणें, तोडणें. क्षयतिथी = सूर्योदयीं नसणारी तिथि. अतीतु = रहित. तया केलियाहि घातु (= वध, नाश, ठोसा, तडाखा, बाण, (ग.) समान संख्यांचा गुणाकार). कदा = केव्हांहि. (केव्हांहि = कदाअपि, कदाचन, कदाचित्. कदाचित = एकदां)–(१३५).

जाण कीं, सारासार विचारास घेतलें तर भ्रांती ती असारता होय व सार तें स्वभावतःच कीं नित्य असें पाहा–जाण–(१३३)

हा लोकत्रय आकार, स्वर्ग मृत्यु पाताळ (भुः भुवः स्वः)–तो ज्याचा विस्तार आहे, तेथें नाम, वर्ण, आकार चिन्ह नाहीं–(१३४)

जो सर्वदा सर्वगत असा, जन्मक्षय अतीत असा, तया घात केला तरी कदाकाळींहि नच होणारा–(१३५)

**अन्तवन्त इमे देहा नित्यस्योक्ताः शरीरिणः।**
**अनाशिनोऽप्रमेयस्य तस्माद्युध्यस्व भारत ॥ १८ ॥**

[ भारत = भारता, अर्जुना. अन्तवन्त = नाशवंत. इमे देहा = (सृष्टींतील) सर्व देह. नित्यस्य = अखंड असणारा अमर आत्मा. उक्ताः = म्हटलें आहे. शरीरिणः = देहधारी आत्म्याचें. ( शरीरिन् = मूर्तिमंत, जिवंत वस्तु, प्राणी, मनुष्य, जीवात्मा. देहिन् = प्राणी, मनुष्य, आत्मा ). अनाशिनः = (अनाशिन् = अविनाशी परमात्मा) अविनाशी. अप्रमेयस्य = दुर्ज्ञेय, अपरिमित, अतर्क्य, प्रमाणांनीं सिद्ध करतां येत नाहीं अशा ( देहधारी आत्म्याचे ) ( नित्य सिद्धस्य–अनुमान प्रमेय सिद्धांत. प्रमा = शुद्धि, जाणीव, (न्या ) यथार्थ ज्ञान ). तस्मात् = म्हणून ]

**अन्वय :** भारत, नित्यस्य शरीरिणः उक्ताः देहा, इमे अन्तवन्तः, नित्यस्य अप्रमेयस्य नित्यस्य अनाशिनः तस्मात् युध्यस्व।

**अर्थ :** भारता, अमर (अखंड असणाऱ्या) अविनाशी व प्रमाणांनीं सिद्ध करितां येत नाहीं अशा देहधारी आत्म्याचे ह्या सृष्टीमधील सर्व देह नाशीवंत असतात असें (उक्ताः) समंजस (विवेकी) जे त्यांनीं सांगितलें. म्हणून भारता, अर्जुना, तूं युद्ध कर–(आत्मा निर्विकार व अविक्रिय आहे तो)–(१८).

**आणि शरीरजात आघवें । हें नासिवंत स्वभावें ।**
**म्हणोनि तुंवा झुंझावे । पांडुकुमरा ॥ १३६ ॥**

आणि शरीरजात = आकारास आलेले, सर्व (शरीरधारी) (जात = कारणभूत, उघड, प्रशस्त, प्राणी, जन्म, उत्पत्ती, वर्ग, जाति, समूह, विशिष्ट स्वभाव). आघवें = सर्व. नासिवंत = (नाशीन् = नाशक, नाशवंत). स्वभावें = [ स्वभावः = (१) प्रकृति, मूळ गुण, सहजधर्म. (२) माया, प्रकृति ] = सहजधर्मेंकरून. झुजावे-जुंझावे = लढावें, युद्ध करावें–(१३६).

आतां शरीरजात अवघें सर्व हें स्वभावेंकरूनच कीं नाशीवंत असें–(आणि म्हणून)–असल्याकारणानें हे पांडुकुमरा, तुंवा झुंजावेंच–(१३६)

**य एनं वेत्ति हन्तारं यश्चैनं मन्यते हतम् ।**
**उभौ तौ न विजानीतो नायं हन्ति न हन्यते ॥ १९ ॥**

[ यः = जो. एनम् = ह्याला, आत्म्याला. वेत्ति = समजतो. हन्तारम् = (हन्तृ) (आत्मा हनन क्रियेचा कर्ता; दुसऱ्याला)–मारणारा. यः च = जो, आणि. मन्यते = समजतो. हतम् = मेला (असें समजतो), मारला जाणारा (असें समजतो), मृत्युवश होणारा आहे (असें समजतो). तौ उभौ = ते दोघेहि ( मारणारा का मेला का मारला जाणारा असा मृत्युवशतेचा आहे). न (विजानीतो) विजानीतः = जाणत नाहीं. [ वि, ज्ञ (विजानत) = १) नक्की जाणणें, पूर्ण जाणणें, २ ) कळवणें ] अयम् = हा आत्मा. न हन्ति, न हन्यते = कोणाला मारीत नाहीं, कोणाकडून मारला जात नाहीं.]

**अन्वय :** यः एनं हन्तारम् वेत्ति। यः च एनम् हतम् मन्यते। तौ उभौ। न विजानीतः। अयं न हन्ति न अयं हन्यते।

**अर्थ :** जो ह्या (अविनाशी) आत्म्याला मारणारा (दुसऱ्याला) समजतो, तसेंच जो ह्याला मेला असें समजतो, त्या दोघांनाहि कांहींच कळत नाहीं जें का हा आत्मा–आत्मा निर्विकार व अविक्रिय आहे–तो कोणाला मारीत नाहीं अथवा कोणाकडूनहि मारिला जात नाहीं (१९).

**तूं धरूनि देहाभिमानातें । दिठी सूनि या शरिरातें ।**
**मि मारिता हे मरते । म्हणतु आहासि ॥ १३७ ॥**

**तरि अर्जुना तूं हे नेणसि । जरि तत्वतां विचारिसि ।**
**तरि वधिता तुं नव्हसि । ते वध्य नव्हति ॥ १३८ ॥**

तूं देहाभिमानातें धरूनि = देह मीपणास चिकटून. [अभिमान ‡ = (देह दिवस, देह शरीर, देहा दिवसा), ज्ञान, बुद्धि । गर्व, अभिमान । मीपणा । समज, कल्पना । प्रेम । हक्क सांगणें । इजा । नाश । प्रमाण–शास्त्र । अभिमानितं = रतिसंभोग, प्रेम, अहंमन्यता. अभिमादः = झिंगणें]. (देहाते) शरिरातें दिठी सूनि = शरीराला, शरीरावर दृष्टि ठेवून–दृष्टीमध्येंच शरीराला घालून. मारिता मि हे मरते = मी मारिता व हे कौरव मरते–मरणारे आहेत असे. आहासि म्हणतु = म्हणत आहेस–(१३७). नेणसि = जाणत नाहींस. जरि तत्वतां = सत्यत्वेंकरून विचारिसी = तत्त्वनिर्णयासंबंधी विचार करशील, पुसूं जाशील तर. (तत्त्व = वस्तुस्थिति, सत्य, खरें स्वरूप, मूळ तत्त्व, ब्रह्म, परमात्मा, मन, शरीर, देवता, तात्पर्य). वधिता = मारणारा तुं नव्हसि = तूं नव्हेस. ते वध्य = मरणारे का नाश पावणारे ते नव्हति = ते नव्हत–(१३८)

तूं देहाभिमानास चिकटून राहून, ह्या शरीरांत दृष्टि घालून, मी मारिता व हे मरते असें म्हणत आहेस–(१३७)

–करितां अर्जुना, तूं हें जाणत नाहींस–तूं नेणसी जरी तत्वतां विचारास घेतलेस, तर तूं वधिता नव्हेस व ते वध्य नव्हत–(१३८)

**न जायते म्रियते वा कदाचि-**
**न्नायं भूत्वा भविता वा न भूयः ।**
**अजो नित्यः शाश्वतोऽयं पुराणो**
**न हन्यते हन्यमाने शरीरे ॥ २० ॥**

---

‡ **टीप :** ऐसा अहंकारारूढ । एकदेशी मूढ । तया हा परमार्थ गूढ । प्रकटावा ना ॥ ३–१७९ ॥ ते देहाभिमान सांडुनि । गुणकर्में वोलांडुनि । साक्षीभूत होऊनि । वर्तति देही ॥ ३–१८२ ॥ म्हणउनि आपणचि आपणपेया । घात कीजेत असे धनंजया । चित्त देउनि नाथिलेया । देहाभिमाना ॥ ६–७० ॥ हा विचारूनि आहंकार सांडिजे । मग असतुचि वस्तु होईजे । तरी आपली वस्ती सहजे । आपण केली ॥ ६–७१ ॥ येऱ्हवी कोशकीटकाचिये परी । तो आपणपां आपण वैरी । जो आत्मबुद्धि शरीरी । चारुस्थळीं ॥ ६–७२ ॥ कैसे प्राप्तीचे वेळे । निदैवा आंधळेपणाचे डोहळे । कीं असते आपले डोळे । आपण झांकी ॥ ६–७३ । देहाभिमानाचा वारा । आतां वाजो ठेला वीरा । तैं ऐक्य वींची सागरा । जीवेशा हे ॥ १४–३०६ ॥ परि देहाभिमान रुलि । जयाचि कुडी देहीचि आंतली । जे या आत्मविर्षी जाली । मध्य रात्री ॥ १८–३८१ ॥ आत्माची कर्ता । हा निश्चयो नाहीं तत्वता । देहीचि मी कर्म कर्ता । मानिती सांचे ॥ १८–३८३ ॥ तैसा देहाभिमान गेलिया । देह जेणें स्वभावें धनंजया । जाले ते आपैसया । चेष्टवीचि ते ॥ १८–४२८ ॥

अभिमान = अर्थरमुकुलगुणादिभिर्यो दर्पः तस्मिन् ज्ञाने प्रणये हिंसायां चाभिमानः । गर्व = गर्वः; अभिमानः; अहंकार इति ३ गर्वस्य । मान = चित्तस्य समुन्नतिः परस्मादुत्कर्षचिंतनेनौन्नत्यं मान उच्यते ।

**वेदाविनाशिनं नित्यं य एनमजमव्ययम् ।**
**कथं स पुरुषः पार्थ कं घातयति हन्ति कम् ॥ २१ ॥**

[ न जायते = (आत्मा) जन्मत नाहीं. न म्रियते = (आत्मा) मरत नाहीं. वा = अथवा, कदाचित्, केव्हांहि. अयम् = हा आत्मा. भूत्वा = पूर्वीं एकदां असून–म्हणजे पूर्वीं जन्म पावून. भूयः = पुन्हां अभविता न = मरणारा, पूर्वीं होऊन आतां नाहींसा होणारा.

अयम् (आत्मा) अजः = हा आत्मा जन्मसंस्काररहित.
,, ,, नित्यः = सर्वकाळीं असणारा.
,, ,, शाश्वतः = अक्षय्य.
,, ,, पुराणः = अनादि, सदोदित, एकरूप.

अपि शरीरे हन्यमाने अयं न हन्यते = शरीराचा घात होत असतांहि–त्याचा घात होत नाहीं, हा आत्मा मारला जात नाहीं, शरीर मेलें–मारलें गेलें तरी. ]

**अन्वय :** अयम् आत्मा न जायते कदाचित् । वा अयम् आत्मा न म्रियते कदाचित् । अयम् आत्मा भूत्वा भूयः अभविता न । अयम् आत्मा अजः । अयम् आत्मा नित्यः । अयम् आत्मा शाश्वतः । अयम् आत्मा पुराणः । अयम् आत्मा न हन्यते अपि हन्यमाने शरीरे ।

**अर्थ :** आत्मा हा केव्हांही जन्म पावत नाहीं, अथवा आत्मा हा केव्हांहि मरत नाहीं–हा आत्मा (भूत्वा) पूर्वीं असून–पूर्वीं होऊन, पूर्वीं जन्म पावून, (भूयः) पुन्हा (अभविता न) नच जन्मलेला–नाहींसा होणारा का मरणारा नाहीं–हा आत्मा (अजः) जन्मरहित,–जन्ममरणसंस्काररहित, हा आत्मा (नित्य) सर्वकाळीं असणारा, हा आत्मा (शाश्वतः) शाश्वततेचा असा, हा आत्मा (पुराणः) पुरातन–अनादि असून नेहमीं एकरूप असा आहे–शरीर मेलें का मारिलें गेलें, तरि आत्मा हा मरत नाहीं–मारला जात नाहीं–(२०).

[ आत्म्यानें शरीरत्याग केला तरी आत्म्याला कांहींच विकार होत नाहीं; सर्पानें कात टाकिली तरी त्याच्या देहाचा नाश होत नाहीं जसें का– ]

[ वेद = समजतो. अविनाशिनम् = नाश न पावणारा. नित्यम् = सदैव असा. अजम् = जन्मरहित. अव्ययम् = न्यूनाधिक न होणारा. क्षेत्रज्ञ, आत्मा, पुरुष इति ३ शरीराधिदैवतस्य । आत्मा क्षेत्रज्ञ मानवश्च पुरुषः । अततीत्यात्मा-धृति, बुद्धि, स्वभाव, वर्ष्म, यत्न । वेदनं = जाणणें. वेद = स्मृति, ज्ञान, अभिप्राय. ]

**अन्वय :** पार्थ । एनम् अविनाशिनम् । नित्यम् अजम् अव्ययम् । वेद । सः पुरुषः । कथम् कम् घातयति । कथम् कम् हन्ति ।

**अर्थ :** हे पार्था, ह्या आत्म्याला नाश न पावणारा–अविनाशी–असा जो जाणतो, ह्या आत्म्याला नित्य असा आहे असें जो जाणतो, ह्या आत्म्याला अज (जन्मरहित) असें जो जाणतो, ह्या आत्म्याला अव्यय म्हणजे न्यूनाधिक्यतेचा होणारा नव्हे, खर्चला जाणारा नव्हे असें जो जाणतो तो पुरुष, तो पंचजन, मनुष्य कुणाचा कसा घात करणार?–म्हणजे कुणाला मारविणार का मारणार? (आत्मा कुणालाहि मारवीत नाहीं, स्वतः मारीत नाहीं, आणि मरतहि नाहीं)–(२१).

**जैसें स्वप्नामाजि देखिजे । तें स्वप्नींची साच आपजे ।**
**मग चेउनियां पाहिजे । तंव कांहिं नाहिं ॥ १३९ ॥**

**तैसि हे माया । तूं भ्रमत आहासि वायां ।**
**शस्त्रें हाणितलिया छाया । जैसी आंगीं न रुपे ॥ १४० ॥**

कां पूर्ण कुंभ उलंडला । तेथें बिंबाकार दिसे भ्रंशला ।
परी भानु नाहिं नासला । तयासवें ॥ १४१ ॥
नातरि मठिं आकाश जैसें । मठाकृति अवतरलें असे ।
तो भंगलिया आपैसें । स्वरूपचि ॥ १४२ ॥
तैसें शरीराचा लोपीं । सर्वेथा नाश नाहिं स्वरूपीं ।
म्हणौनि तुं हे नारोपीं । भ्रांति बापा ॥ १४३ ॥

स्वप्नामाजिं देखिजे = स्वप्नामध्यें पाहावें. तें स्वप्नींची साच आपजे ( = वाटे, भासे, उमजते, उपजते ) स्वप्नामध्येंच कीं तें सत्य खरें असें भासतें, वाटतें, उमजतें, उपजतें. मग चेउनियां ( = जागें होऊन) पाहिजे = मग जागें झाल्यावर पाहावें तों–पण जागें होऊन पाहावें तों. तंव कांहिं नाहिं = तेथें कांहींच नाहीं–(१३९). तैसि हे माया = ममता. जाण = समज. (मायिक = खोटें, नाशीवंत). तूं वायां (च) = व्यर्थच कीं. भ्रमत = घोटाळ्यांत पडत, भ्रांतींत पडत, भ्रांतीचा होत. आहासि = आहेस. छाया = पडछाया. शस्त्रें = शस्त्रानें. हाणितलिया = वार केल्यास. जैसी = जसी. आंगीं = आपल्या आंगीं, आत्म्याला–आत्म्याच्या आंगीं. न रुपे = लागत नाहीं, खुपत–रुपत नाहीं (१४०). पूर्ण कुंभ = भरलेला घडा, घागर. उलंडला = पालथा केला. तेथ बिंबाकार = प्रतिबिंबरूप, मूर्ति, चित्र, आकार. भ्रंशला = नष्ट झाला, चळला, अदृश्य झाला. दिसे = असें दिसतें (१४१). मठिं आकाश जैसें = मठामधील पोकळीरूपी आकाश जसें. मठाकृति अवतरलें असे = मठाच्या आकृतीच्या आकारास आलेलें असतें–मठाच्या आकृतीस आलें–उतरलें. तो भंगलिया आपैसें स्वरूपचि = तो आकार भंगला, चळला कीं–आपोआपच कीं, सहजच कीं स्वरूपच एक निखळ असे–(१४२). शरीराचा लोपीं = नाशांत, नाशानें. स्वरूपीं = आत्म्याच्या ठायींच्या–आत्मस्वरूपाला नाश नाहीं–चित्‌कलेच्या, ठायींची चित्‌कला, लोप पावत नाहीं–नारोपीं = न आरोपीं = आरोपूं नको–(१४३).*

जसें स्वप्नामध्यें पाहावें, देखावें जें तें स्वप्नामध्येंच खरेपणानें पावतें व मग जागें होऊन पाहावें तर कांहींहि नाहीं कीं–(१३९)

तशी ही माया, तूं वायांच कीं भ्रमत आहेस, छाया शस्त्रानें हाणल्यास जसी ते अंगीं न रुतणारी–(१४०)

पूर्ण भरलेला कुंभ लवंडला, तेथें बिंबआकार भ्रंशला दिसतो, पण भानु, सूर्य तो कांहीं त्याबरोबर नासला नाहीं–(१४१)

अथवा मठीं आकाश जसें मठाकृती अवतरलेलें असतें, तो आकार भंगल्यास आपोआप स्वरूपच कीं–(१४२)

तसें शरीराच्या लोपानें स्वरूपीं सर्वथैव केव्हांहि नाश नाहींच–आणि म्हणून तूं ही भ्रांती स्वरूपावर लादूं नकोस, आरोपूं नकोस–(१४३)

वासांसि जीर्णानि यथा विहाय
नवानि गृह्णाति नरोऽपराणि ।
तथा शरीराणि विहाय जीर्णा-
न्यन्यानि संयाति नवानि देही ॥ २२ ॥

[वासांसि = वस्त्रें (वासस् = वस्त्र, पडदा. वासस् कुटी = तंबू). जीर्णानि = जुनीं, फाटलेलीं, प्राचीन. यथा = ज्याप्रमाणें. विहाय = टाकून. नरः = एकादा मनुष्य. अपराणि = दुसरी. अपर = निराळीं, दुसरीं,

* टीप : सांडूनि आंगिचि खोळी। सर्प निघालिया पाताळीं। ते त्वचा कोण सांभाळी। तैसें जालें॥ १४–३१३॥ (सर्पानें कात टाकिली तरी त्याचा देहनाश होत नाहीं, त्याप्रमाणें आत्म्यानें–शरीरिन् जो त्यानें–शरीरत्याग केला तरी आत्म्याला कांहींच विकार होत नाहीं.)

अधिक. नवानि (वासांसि) = नवीन वस्त्रें. गृह्णाति = घेतो. (गृह्ण = घेणें) देही = आत्मा, देहधारी जो. (देहिन् = प्राणी, मनुष्य, आत्मा. देहिनी = पृथ्वी). नवानि = नवीं. अन्यानि = दुसरीं. संयाति = घेतो. (या + सं = संयोग पावणें, एकत्र होणें) तथा = त्याप्रमाणें. जीर्णानि = जुनीं, दुर्बळ झालेलीं. शरीराणि = शरीरें. विहाय = टाकून. विहा, विहाय = विहाय लक्ष्मीपति लक्ष्म कामुकम्. विहा = स्वर्ग. विहायस् = १) आकाश. २) पक्षी. हा (ओहाक्) = त्याग करणें, सोडणें, वगळणें, नाकारणें. वि + हा = फेकणें, नष्ट होणें.]

**अन्वय :** नरः यथा जीर्णानि वासांसि विहाय नवानि अपराणि गृह्णाति तथा देही शरीराणि जीर्णानि विहाय नवानि अन्यानि (शरीराणि) संयाति ।

**अर्थ :** मनुष्य जसें जुनीं वस्त्रें टाकून नवीन दुसरीं घेतो, तसें देही (आत्मा) शरीरें जीर्ण तीं टाकून नवीन दुसरीं (शरीरें) घेतो **(२२).**

**जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे । मग नूतन वेढिजें ।**
**तसें देहांतरातें स्वीकारिजे । चैतन्यनाथें ॥ १४४ ॥**

जीर्ण वस्त्र सांडिजे = जुनें फाटकें वस्त्र टाकून दिलें जातें. मग नूतन वेढिजें = मग नवें नेसावें (गुंडाळावें). देहांतरातें = (देह = शरीर. अंतर = जवळचें, बाहेरचें, निराळें, दुसरें. देहांतर = अन्य जन्म). स्वीकारिजे = दुसरें शरीर स्वीकारावे (= घेणें, स्वीकार, अंगिकार, संमति, लग्न) होतें. चैतन्यनाथें = आत्म्यानें (चैतन्यनाथ = आत्मा. चैतन्य = जीव, प्राण, मन, चित्त, ज्ञान, परमात्मा, प्रकृति, माया. नाथ = स्वामी, रक्षक, नवरा, वेसण)-(१४४)

जीर्ण वस्त्र टाकून देऊन मग नवें वेढावें, तसें देह अंतरातें, दुसऱ्या देहास, देहातें चैतन्यनाथें स्वीकारणें होतें-(१४४)

**नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः ।**
**न चैनं क्लेदयन्त्यापो न शोषयति मारुतः ॥ २३ ॥**
**अच्छेद्योऽयमदाह्योऽयमक्लेद्योऽशोष्य एव च ।**
**नित्यः सर्वगतः स्थाणुरचलोऽयं सनातनः ॥ २४ ॥**

[न एनम् (= आत्म्याला) शस्त्राणि छिन्दन्ति (छिद् = (समासांत) कापणारा, नाश करणारा, (ग) छेद, भाजक). न एनम् पावकः दहति (दहन = जाळणारें, विनाशक, अग्नि, जाळणें, डागणें.) च न एनम् आपः क्लेदयन्ति (क्लेद = ओलावा, स्राव. क्लेदनम् = ओलें करणें, पाझरणें). न एनम् मारुतः शोषयति (शोष = सुकणें, आटणें, क्षीणता, क्षयरोग, शोषण्याची शक्ति, पित्त).]

**अन्वय :** एनम् शस्त्राणि न छिन्दन्ति । एनम् पावकः न दहति । च एनम् आपः न क्लेदयति । एनम् मारुतः न शोषयति ।

**अर्थ :** ह्या आत्म्याला शस्त्रें छेदीत नाहींत. ह्या आत्म्याला अग्नि, पावक जाळीत (दहति न) नाहीं. तसेंच ह्या आत्म्याला पाणी ओलें करीत नाहीं, पाझरवीत नाहीं. तसेंच ह्या आत्म्याला वायु शो(क)षीत नाहीं (सुकवीत नाहीं)-**(२३).**

[अच्छेद्यः अयम् = छेदला का तोडला जाणारा असा आत्मा हा नाहीं. अदाह्यः अयम् = नच जाळतां येणारा असा हा आत्मा आहे. अक्लेद्यः अयम् = पाण्यानें नच भिजणारा, पाझरणारा असा हा आत्मा आहे. एव च अशोष्यः = तसेंच वाऱ्यानें नच शोषिला जाणरा का शुष्क न होणारा असा हा आत्मा आहे. नित्यः अयं, सर्वगतः अयं, स्थाणु अयं, अचलः अयं, सनातनः अयं; म्हणून निर्विकार असा हा आत्मा नित्य एकरूप आहे, असा हा आत्मा सर्वगत सर्वव्यापक आहे, असा हा आत्मा स्थाणु-स्थिर आहे, असा हा आत्मा अचल-नच हालणारा आहे, असा हा आत्मा सनातन-अनादिसिद्ध असा आहे.]

**अन्वय :** अच्छेद्यः अयम् । अदाह्यः अयम् । अक्लेद्यः अयम् । च एव । अशोष्यः अयम् नित्यः । अयं सर्वगतः । अयं स्थाणु । अयं अचलः । अयं सनातनः ।

**अर्थ :** हा आत्मा छेदला नच जाणारा (तोडतां नच येणारा) असा आहे. हा आत्मा जाळतां नच येणारा, असा आहे. हा आत्मा पाण्यानें पाझरणारा नच, असा आहे. तसेंच हा आत्मा वाऱ्यानें शुष्क नच होणारा, (सुकविला नच जाणारा) असा आहे. असा हा विकाररहित–निर्विकार, निस्पृह, उदासीन, परमात्मा असल्यामुळें, हा नित्य एकरूप (सतत स्वभावसिद्ध), (सर्वगत) सर्वव्यापक, (स्थाणु) वृक्षखोडाप्रमाणें, स्थिर–निश्चल, स्थावर–स्थिर, निश्चल, कायम, अबाधित ब्रह्म, (सनातन) अनादिसिद्ध आहे–अढळ, शाश्वत,–स्वयंभू आहे–(२४).

**अनादि नित्यसिद्धु । निरुपाधि विषदु ।**
**म्हणौनि शस्त्रादिकीं छेदु । न घडे यया ॥ १४५ ॥**
**हा प्रळयोदकें नाप्लवे । अग्निदाहो न संभवे ।**
**येथ महाशोष न प्रसवे । मारुताचा ॥ १४६ ॥**
**अर्जुना हा नित्यु । अचळ हा शाश्वतु ।**
**सर्वत्र सदोदितु । परिपूर्ण हा ॥ १४७ ॥**

अनादि = उत्पत्तिरहित,–आदि हाच एक जसा. नित्यसिद्धु = नित्य असणारा. निरुपाधि = माया-आवरणरहित. विषदु = (विशुद्ध = निर्मळ, निष्पाप, शुद्ध. विशद्–शुक्ल = [श्वेतः, विशदः, श्येतः, पाण्डरः (अमर०)]). शस्त्रादिकीं छेदु न घडे यया = भाग, भंग, शेवट, सीमा, कापणें, तोडणें, होत नाहीं याचें–(१४५). प्रळयोदकें नाप्लवे = प्रळयकाळींच्या उदकानें हा बुडत नाहीं (बुडविला जात नाहीं). अग्निदाहो न संभवे (= जन्म, उत्पत्ति, हेतु, कारण) शक्यता, संभव. दाह = लाही होणें, लाल होणें, जाळणें. अग्निदाह = अग्नीनें जाळणें. महाशोष न प्रभवे = (क्षयः शोषः यक्ष्मा ३ क्षयरोगस्य शरीर ।) पराक्रम, प्रभाव. मारुताचा = (समीरः, मारुतः, मरुत्, जगत्प्राणः, नभस्वान्–अमर०) (भास्वान्–विवस्वान्–नभस्वान्–वायू) –(१४६). नित्य = शाश्वत ध्रुव नित्य सदातन सनातन ५ नित्यस्य । अचळ = गिरिः, ग्रावा, अचलः; शैलः,– (पर्वतसामान्य). शाश्वत = ध्रुव, नित्य. सर्वत्र = सर्व ठिकाणीं. सदोदित = नेहमीं ख्यात, नेहमीं प्रफुल्लित, नेहमीं जागा झालेला. परिपूर्ण = अभोग, परिपूर्णता–(सर्वोपचार परिपूर्णतायः)–(१४७).

हा परमात्मा अनादि असून नित्यसिद्ध आहे–हा निरुपाधिक आहे–हा विशुद्ध आहे, म्हणजे शस्त्र आदींनीं यास छेद देतां येत नाहीं–ह्याचें छेदणें, भेदणें, होत–घडत नाहीं–(१४५)

हा प्रळयाच्या उदकानें (नाप्लवे) बुडत नाहीं, अग्निदाहो यास संभवत नाहीं, येथें मारुताचा महाशोषहि नच प्रसवाचा–प्रभवाचा होणारा–वायु याला शुष्क करूं शकत नाहीं–(१४६)

अर्जुना ! हा नित्य, अचळ, शाश्वत, सर्वत्र, सदोदित, परिपूर्ण हा–(१४७)

**अव्यक्तोऽयमचिन्त्योऽयमविकार्योऽयमुच्यते ।**
**तस्मादेवं विदित्वैनं नानुशोचितुमर्हसि ॥ २५ ॥**

[अव्यक्तं अयम् उच्यते (= हा आत्मा) = व्यक्त करितां न येणारा, (सां) प्रधान, स्पष्टावयवरहित, अस्पष्ट, अज्ञात, अदृश्य, इंद्रियांना अगोचर. अचिन्त्यं अयम् उच्यते (= हा आत्मा) = कल्पनातीत (कृष्ण । पारा । ब्रह्म). अविकार्यः अयम् (= हा आत्मा) अविक्रिय = ब्रह्म = विकार्य म्हणजे जो अहंकार (वे०) त्यारहित. उच्यते = म्हटला आहे. तस्मात् एवं एनं विदित्वा = म्हणून ह्याकरितां ह्या आत्म्याला असा असा आहे हें जाणून, अनुभवून, मानून. (विदा = बुद्धि, ज्ञान). अनुशोचितुम् = (शुच् अनु = शोक करणें, समदुःखी होणें). अर्हसि = (योग्य असणें, पात्र असणें, अधिकारी असणें, जबाबदार असणें) उचित.]

**अन्वय :** अव्यक्तः अयम् आत्मा उच्यते । अचिन्त्यः अयम् आत्मा उच्यते । अविकार्यः अयम् आत्मा उच्यते । तस्मात् । (आत्मानम्) एनं एवं विदित्वा । न अर्हसि । अनुशोचितुं ।

**अर्थ :** हा आत्मा इंद्रियांना अगोचर, हा आत्मा कल्पनातीत, हा आत्मा विकारशून्य, अहंकाररहित–निरहंकार असा आहे, हें अनुभवून–जाणून ऐस, व मग तुला शोक करणें का समदुःखी असणें हें तुजला अपात्रतेचें का अयोग्यतेचें होणें, हें नच करील–(२५).

**हा तर्काचिये दृष्टी । गोचर नव्हे किरिटी ।**
**ध्यानाचिये भेटि । उत्कंठा वाहे ॥ १४८ ॥**

**हा सदा दुर्लभ मना । आप नव्हे साधना ।**
**निस्सीम हा अर्जुना । पुरुषोत्तम ॥ १४९ ॥**

**हा गुणत्रय रहितु । व्यक्तिस अतितु ।**
**अनादि अविक्रितु । सर्वरूपु ॥ १५० ॥**

**अर्जुना ऐसा हा जाणावा । हा सकळात्मक देखावा ।**
**मग सहजें शोक आघवा । हरेल तुझा ॥ १५१ ॥**

(हा आत्मा) तर्काचिये दृष्टी = तर्कशास्त्राच्या दृष्टीनें–आत्मा तर्काच्या दृष्टीला दिसत नाही. गोचर नव्हे = प्रत्यक्ष दिसणारा नाहीं. [ध्यान भेटी याचिये उत्कंठा वाहे = ध्यान त्याजला भेटावयास उत्सुक आहे.] ध्यान = योग्याचें जें ध्यान. भेटी = भेटीसाठीं. उत्कंठा = उत्सुकता. वाहे = बाळगून आहे–(१४८). सदा = नेहमीं. मना = संकल्पविकल्प अंतःकरणवृत्तीस, कल्पनेस, विचारास. दुर्लभ = दुष्प्राप, विरळ, उत्कृष्ट. साधना = साधनानें. आप = प्राप्त होणारा. निस्सीम = सीमारहित, अपार–(१४९). गुणत्रय (= सत्त्व रज तम इत्यादि त्रिगुण जे त्यांनीं) रहित (= सोडलेला, वर्जित) एकांत (रहित + आत्मन् = शून्यात्मा). व्यक्तीस अतीत = आकाराच्या पलीकडचा (व्यक्ति = लिंग, आकार, स्वरूप, भेद). अनादि = आरंभ उत्पत्ति इत्यादिरहित ईश्वर. अविक्रितु = अविकृत = विकाररहित, विकार न पावणारा : अविकृति = (सां.) प्रकृति. सर्वरूप = सगळें, पूर्ण, शिव, विष्णु, लक्ष्मण, स्वरूप, सौंदर्य, मूळधर्म, स्वभाव–(१५०). ऐसा हा आत्मा जाणावा व मग सकळात्मक देखावा = हा देखावा सर्व आत्मक (आत्मिक) स्वकीय–स्वतःचा, स्वतःसंबंधीं, स्वाधीन, जिवंत. सहज = (१) आपोआपच. (२) समानोदर्यः, सोदर्यः, सगर्भ्यः, सहजः इति ४ एकोदरस्य भ्रातुः । शोक = दुःख, खेद. आघवा = सर्व. हरेल तुझा = नाहींसा होईल–(१५१).

हा पर (आत्मा) तर्काच्या दृष्टीला सांपडत नाहीं, दिसत नाहीं, गोचर होत नाहीं–येथें तर्कास मुळींच प्रतिष्ठा नाहीं,–ध्यान त्याच्या भेटीसाठीं नेहमीं उत्कंठित होऊन असतें–ध्यान याला भेटण्यास उत्सुक आहे–(१४८)

हा (परमात्मा) मनास दुर्लभ असा आहे, हा साधनानें प्राप्त होणारा नव्हे, हा अपार असा सीमारहित–हे अर्जुना, पुरुषोत्तम–(१४९)

हा गुणत्रयरहित आहे, व्यक्तीला अतीत म्हणजे आकाराच्या पलीकडचा असा आहे, हा अनादि आहे, हा अविक्रित आहे–(१५०)

अर्जुना, असा हा जाणावा; हा सकळात्मक आहे असा देखावा व मग सहजपणेंच कीं तुझा शोक नाहींसा होईल–(१५१)

**अथ चैनं नित्यजातं नित्यं वा मन्यसे मृतम् ।**
**तथापि त्वं महाबाहो नैनं शोचितुमर्हसि ॥ २६ ॥**

[अथ = इतक्यावरहि. च = आणि. एनं = ह्या आत्म्याला. नित्यजात = नेहमींच, नित्य जन्मणारा. नित्य = नेहमींच. वा = अथवा. मृतम् = मरणारा, मरणाधीन.-(प्रत्यहं याचिते मृतमिति)-.मृत = मेलेला, निष्फळ, भिक्षा, भस्म केलेला, धातु, मरण. मृतंड = सूर्य. मृतोद्भव = समुद्र. मृतमत्त = कोल्हा. मृतसंजीवनी = १) विद्याविशेष. २) गोरक्ष. तथापि = तरीहि देखील. महाबाहो = अर्जुना. त्वं = तुंवा, तूं. न एनं (आत्मानम्) = आत्म्यासंबंधीं. अर्हसि = उचित नाहीं. शोचितुं = शोक करणें.]

**अन्वय :** महाबाहो, अथ एनम् आत्मानम् नित्यजातं मन्यसे-तथापि त्वं एनम् आत्मानम् न शोचितुमर्हसि, च अथ एनम् आत्मानम् नित्यं मन्यसे-तथापि त्वं एनं आत्मानम् न शोचितुमर्हसि, अथ एनम् आत्मानम् मृतम् मन्यसे-तथापि त्वं एनम् आत्मानम् न शोचितुमर्हसि- ।

**अर्थ :** इतक्यावरहि हे महाबाहो, कदाचित् हा आत्मा नित्यतेचा असा नेहमींच जन्मणारा मानलास- हा आत्मा नित्य, नेहमींच मरणारा का मरणाधीन, नेहमींच याचना करणारा (का मेलेला का) नेहमीं भिक्षा मागणारा-तरी त्याबद्दल शोक करणें उचित नाहीं, तुला शोभत नाहीं-(२६).

**अथवा ऐसा हा नेणसि । तूं अंतवंतची हे मानिसी ।**
**तन्हि शोचुं न पवसि । पांडुकुमरा ॥ १५२ ॥**
**जे आदि स्थिति आंतु । हा निरंतर असे नित्यु ।**
**जैसा प्रवाहो अनस्युतु । गंगाजळाचा ॥ १५३ ॥**
**तें आदि नाहिं खंडलें । समुद्रिं तरि असे मिनलें ।**
**आणि जातच्चि मध्यें उगलें । दिसें जैसें ॥ १५४ ॥**
**यें तिन्हि तयापरि । सरसिंची सदा अवधारिं ।**
**भुतांसि कवणें अवसरिं । ठाकति ना ॥ १५५ ॥**
**म्हणौनि हे आघवें । (एथ) तुज नलगे शोचावें ।**
**जे च्छितिची हे स्वभावें । अनादि ऐसि ॥ १५६ ॥**
**नातरि हें अर्जुना । नयेच्चि तुझिया मना ।**
**तें देखोनि लोक अधिना । जन्मक्षया ॥ १५७ ॥**
**तन्हि येथें कांहिं । तुज शोकासि कारण नाहिं ।**
**जे जन्म मृत्यू हें पाहिं । अपरिहार ॥ १५८ ॥**

ऐसा हा आत्मा नेणसि ( = जाणत नाहींस) = आत्मा असा असा आहे, हें नेणून त्याजला तूं. (हे) हा अंतवंत मानिसी = हा अंतवंत आहे असें मानिलें तरी. तन्हि न पवसि शोचुं = तरी त्याबाबत शोक करणे अयोग्य आहे-(१५२). जे कां आदि = उत्पत्ति. जे कां स्थिति = स्थिति. जे कां अंतु = लय, यामुळें हा नित्य = नेहमीं, नित्य, निरंतर असाच. गंगाजळाचा प्रवाहो ( = गंगेचा ओघ) अनस्युतु( = अखंड) = गंगेच्या अखंड ओघाप्रमाणें आहे-(१५३). आदि-उत्पत्तिचे ते नाहीं खंडलें = तुटलें, मोडलें, नाशलें, भंगलें, निवाड्याचें झालें. समुद्रिं तरि मिनलें = मिळालें आहे व समुद्रीं जातांजातांच, वाहत्या प्रवाहांत मध्यंतरीच कीं उगवलेलें असें दिसत आहे-(१५४). यें तिन्हि-इये तिन्हि-हीं तिन्हीं = उत्पत्ति, स्थिति, लय. तयापरि = त्याप्रमाणें. सरसिंची-सरसीच = सारखीच. सदा = नेहमींच. अवधारिं-अवधारी = ऐकून घे. कीं-भूतांसी = भूतांना. कवणें-कवणी = कोणत्याहि. अवसरिं-अवसरी = समयीं. ठाकति-ठाकती ना = बंध करवत नाहींत, भूतांना

सोडीत नाहींत,–भूतांचे नेहमींच्या नेहमींच कीं उत्पत्तिस्थिति–लयाचें होणें होऊन असतें–साध्य–उत्पत्तिस्थिति-लय हीं सदा साध्यच कीं भूतांचें होऊन असतें जें तें होतच राहातें–(१५५). म्हणौनि–म्हणोनि. आघवें = सर्व, पूर्ण, शिव व विष्णु. जे ह्याबद्दल तुज नलगे शोचावें–(शुच् = शोक करणें, पश्चात्ताप पावणें, समदुःखी होणें). च्छितिची–स्थितिची (रचना, अवस्था, अविच्छिन्नता, शिस्त, आचार, मर्यादा, सत्त्वगुण) = सृष्टीचा क्रम, प्रवृत्तीचा ओघ. स्वभावें = प्रकृति, मूळ गुण, सहज धर्म. अनादि = उत्पत्तिरहित. ऐसि–ऐसी = अशी ही–(१५६). नातरि = अथवा. नयेचि तुझिया मना = तुझ्या मनाला आवडत नाहीं. तें देखोनि जन्मक्षया अधीना = लोक जन्ममरणाच्या आधीनतेचे आहेत हें पाहून–(१५७). तरी एथें तुज काहीं–येथ तर तुजला कांहींहि ह्यामुळें. शोकासि कारण नाहीं = शोकाचें, पश्चात्तापाचें कारण होणें नाही. जे जन्म मृत्यू हें पाहिं–हे जन्म मृत्यु पाहिं = जन्मणें व मरणें हें जाण कीं–जन्म मृत्यु हे–अपरिहार = टाळतां न येण्यासारखे–(१५८).

अथवा असा हा नच जाणून जाणत नाहींस. वर अंतवंतच हें आहे असें, हे पांडुकुमरा, मानतोस जरी तरीसुद्धां शोकास नच पावशील–हा नाशवंत आहे असें मानलें तरी शोक करणें अयोग्य आहे–(१५२)

जी आदिस्थिति व अंत जरी तरी हा तर अखंड असा निरंतर नित्य आहे–जसा का गंगेचा ओघ अखंड असा नित्यतेचा. उत्पत्ति, स्थिति, लय हे नित्य निरंतर गंगेच्या–गंगाजळाच्या अखंड ओघाप्रमाणें चाललें आहे–(१५३)

जें का आदि तें खंडलें नाहीं, समुद्रास तर मिळालेलें आहे, आणि जात जातचिमध्येंच हें जसें दिसतें तसें–उगवलें आहे–उरलें आहे–(१५४)

हे तिन्ही आदिपणा, स्थितित्व व अंतता त्याप्रमाणें–त्यापरीनें एकसारखी एकच जशी का सदा समज–ह्या भूतांना–भूतसृष्टीसहि केव्हांहि सोडीत नाहींत, बंद करवत नाहींत–(१५५)

म्हणून याजसाठी अवघे सर्व असे येथें तुजला हें शोचावें तें–हें दुःख, पीडा, बाधा, व्यथा, खेद असें मानण्याचें व्हावें तें–मानणें तें कां व्हावें–तुजला ह्यासंबंधी शोक करणें तें मग व्हावें? जी का ही स्थितीच मुळी ही स्वभावे अनादि अशी टाळतां नच येण्यासारखी–(१५६)

अथवा हे अर्जुना, हें तुझ्या मनास येत नाहीं–ही अनादि स्वभावेंकरूनच कीं–आणि म्हणूनच असें आहे हें पाहूनच कीं–हे लोक तर जन्म व क्षय ह्याच्या आधीन असेच होऊन आहेत–(१५७)

तरीसुद्धां येथे तुजला शोक करण्यास कांहींहि कारणच मुळीं (संभवत) नाहीं–तुझ्या शोकास, दुःखास (वाईट वाटून घेणें जें त्यास) कारण तें कसचें तें, तें का तें; येथें असें पाहा कीं, हे जन्म मृत्यू तर अपरिहार म्हणजे नच टाळतां येण्यासारखेच असेच होत कीं–(१५८)

*** जातस्य हि ध्रुवो मृत्युर्ध्रुवं जन्म मृतस्य च ।**
**तस्मादपरिहार्येऽर्थे न त्वं शोचितुमर्हसि ॥ २७ ॥**

[जातस्य = जन्मलेल्यास. हि = कारण, केव्हांहि. ध्रुवः = निश्चित, खरोखरच आहे. मृत्युः = मरण असणारच. ध्रुवम् = हें खरेंच कीं. जन्म = जन्मणें हें. मृतस्य = मृताला, मेलेल्यास. च = आणि. तस्मात् = म्हणून. अपरिहार्ये = टळण्या का टाळण्यासारखे नाहीं. अर्थे = त्यासंबंधीं. त्वं शोचितुं न अर्हसि = तुझें येथें (त्यासंबंधीं) शोक करणें योग्य नाहीं. (मन्युः, शोकः, शुक् इति ३ शोकस्य।)]

**अन्वय :** जातस्य हि ध्रुवः मृत्युः । मृतस्य जन्म ध्रुवः । च । तस्मात । अर्थे अपरिहार्ये । त्वं न अर्हसि शोचितुम् ।

*[**टीप :** आत्म्याचें (जन्ममरणानें) असणें (असें तुझ्या कल्पनेचें) तें कांहीं तुझ्या शोक केल्यानें (करण्यानें) टळणारें नव्हें–मग व्यर्थ कां संतापास येत आहेस तें–]

**अर्थ :** कारण जन्मलेल्यास मरण केव्हांहि असणारच; तसेंच मेलेल्याचें पुन्हां जन्मणें हेंही निश्चित आहेच-म्हणून जें टळण्या (टाळण्या) सारखें नाहीं, त्याबद्दल शोक करणें तुजला योग्य नाहीं-(२७).

**उपजे तें नाशें । नाशलें तें पुनरपि दिसे ।**
**हें घटिकायंत्र जैसें । परिभ्रमे गा ॥ १५९ ॥**

**नातरि उदोअस्तु अपैसे । अखंडित होत जात जैसे ।**
**हें जन्ममरण तैसें । अनिवार जगीं ॥ १६० ॥**

**महाप्रळय अवसरें । हे त्रैलोकहि संव्हरे ।**
**म्हणौनि हा न परिहरे । आदि अंत ॥ १६१ ॥**

**तूं जरी हे यैसे मानिसी । तरी खेद कां करिसि ।**
**काये जाणतचि नेणसि । धनुर्धरा ॥ १६२ ॥**

**येथें आणिकही येक पार्था । तुज बहुतिं परी पाहातां ।**
**दुःख करावया सर्वथा । विषो नाहिं ॥ १६३ ॥**

उपजे तें नाशें=उगवतें तें नासतें-जन्मतें तें मरतें-. नाशलें तें पुनरपि दिसे = नासतें तें पुन्हां दिसतें-उगवतें. (जैसें) घटिकायंत्र=वाळूचें घड्याळ. (असें) हें परिभ्रमें गा=असें हें-असें का रहाटगाडगें का घड्याळच एक. परिघाचे=घिरट्या घालणारें, गस्तीचें असें-(१५९). अपैसे उदोअस्तु=सहज आपोआप उदय व अस्त. अखंडित होत जात जैसे = मध्यें भंग न होतां एकसारखें होत जात असतात. तैसें जगिं जन्ममरण अनिवार हें = तसें ह्या जगीं उगवणें व नास(श)णें, जन्मणें व मरणें हें दूर नच केलें जाणारें-निषेधाचें नच होणारें-(१६०). महाप्रळय-महाप्रळयाच्या. अवसरें=वेळेस. (त्रैलोकहि) त्रैलोक्यहि संहरे = त्रैलोक्य संहरतें, नाश पावतें. म्हणौनि हा आदि अंत=उत्पत्ति व लय, जन्म मृत्यु. न परिहरे = दूर करणें नाहीं, निरसन होणें नाहीं-(१६१). तूं जरी (ऐसें हे) यैसे हे मानिसी=आदि अंत दूर होणार नाहीं असें जरी येथें मानलेंस तरी. खेद कां करिसि=येथें खेद तो कसचा! काय म्हणून तो व्हावा का करावा हे धनुर्धरा. काये जाणतचि नेणसि=हें सर्व तूं जाणत असूनहि नेणतेंपणच पांघरून आहेस तें कां?-(१६२). येथें आणिकही (एक) येक पार्था = इथें आणीकही एक विशेष गोष्ट आहे जी जाणली असतां-तुज बहुतिं परी पार्था = तुझें दुःख करणें तें विशेषाविशेषतेनें पाहिलें असतां तें. दुःख करावया सर्वथा विषो नाहिं = दुःख करणें कांहींहि सुद्धां विषय, हेतू का कारण नाहींच केव्हांहि (विषयः आश्रयः इति २ आश्रयस्य। यस्य मत्स्यादेर्यो जलादिर्ज्ञातो नित्यसेवितस्तस्य तत्र विषयः। शब्दादिकाः। शब्दस्पर्शरूपरसगंधाश्च विषयाः।)-(१६३).

उपजे तें नाशें, नाशलें पुनरपि दिसें-असें हें घटिकायंत्रच रहाटगाडगें कीं जसें का भ्रमत आहे, भ्रमण करीत आहे-(१५९)

अथवा उदय व अस्त आपोआपच कीं अखंडपणें होत जात आहेत जसे, त्याप्रमाणें जगीं जन्ममरण हें अनिवार.... (१६०)

महाप्रळयाच्या वेळेस हें त्रैलोक्य संहरतें, या कारणास्तव हा आदि व अंत हा टाळतां येण्यासारखा नाहीं-(१६१)

तूं जर कां असें हें खरें मानीत आहेस, तर मग येथें खेद तो कसचा न् काय-तो करण्याचें तें काय म्हणून-काय असें जाणत असतांनाहि नेणतेंपण पांघरीत आहेस, हे धनुर्धरा-(१६२)

येथें आणखी कांहीं येक, हे पार्था, तुजला बहुत प्रकारें पाहूं आलें तर पाहा कीं, तुजला दुःख करावया सर्वथा कांहीं विषय कारणच (हेतु, कारण, बीज) मुळीं नाहीं-(१६३)

**अव्यक्तादीनि भूतानि व्यक्तमध्यानि भारत ।**
**अव्यक्तनिधनान्येव तत्र का परिदेवना ॥ २८ ॥**

[अव्यक्तादीनि = अव्यक्त. आदीनि = अव्यक्ततेनें असणारी, अव्यक्त व्यक्त अव्यक्त. भूतानि = भूतें. भारत = पार्था, भारता. व्यक्त मध्यानि = मध्येंच–अव्यक्त व्यक्त अव्यक्त–व्यक्त झालेलीं; मध्य व्यक्ततेचीं. (प्राज्ञे स्फुटेऽपि व्यक्त.)–(न्याय्ये उचिते अपि शब्दादवलग्ने च मध्यम्–). अव्यक्त निधनानि एव = (मृत्युः, मरणम्, निधनः इति मरणस्य. कुलनाशयोर्निधनं अजितश्चाव्यक्तश्चेति। विष्णौ-शंकरे वर्तेते।). तत्र परिदेवना का = दुःख करणें तें कां.]

**अन्वय :** भारत, अव्यक्त आदीनि भूतानि। (मध्यानि व्यक्त)। भूतानि व्यक्तमध्यानि। व्यक्त मध्यानि भूतानि। निधनानि एव अव्यक्त। निधनानि अव्यक्तानि एव। तत्र। परिदेवना का।

**अर्थ :** (१) अव्यक्त आदीची भूतें असल्यामुळें तीं मध्यें व्यक्त व शेवटीं अव्यक्त अशीं तेथें दुःख कसचें! (जन्मलेल्यास मरण आहेच–मेलेल्यास पुन्हां जन्मणें आहेच–असें जें कांहीं निश्चित, टाळतां का टळतां–न येण्यासारखें जें–) हे भारता, अर्जुना, पार्था (जन्ममरणयुक्त का मरणजन्मयुक्त असें जें कांहीं ह्या भूतांचें असणें का होणें–) अजित, अव्यक्त, शरीर इंद्रियरूपानें नच दिसणारी असतात–(विष्णु-शंकर) इत्यादींनीं–इत्यादींचीं होऊन भूतें हीं असतात; जातां जातां मध्येंच–जन्मल्यापासून मरणापर्यंतच्या काळांत–मधल्या स्थितींत तीं दृश्य–व्यक्त असा–तीं व्यक्त होतात, व व्यक्त; दृश्य झाल्यानंतर त्यांना केव्हांहि अव्यक्त निधनाचे–भूतनाश हा–शरीर इंद्रियरूपानें न दिसणारीं तीं केव्हांहि–पंचमहाभूतांत प्रविष्ट होतात–होणें आहेच आहे केव्हांहि–म्हणून येथ कसचें तें व कां तें शोक करणें–परिदेवन बरें!

(२) अर्जुना, देहादिक वस्तुमात्र (भूतानि) प्रथम शरीर इंद्रियरूपानें न दिसणारीं (अव्यक्त) असतात–अदृष्ट अशा ब्रह्मापासून जन्मास येणारी असतात–मध्यें म्हणजे जन्मापासून मरणापर्यंतच्या मधल्या स्थितींत व्यक्त–दृश्य–दर्शनपूर्वक अनुभवाला येणारी–असतात. अशी तीं अव्यक्त–नच दिसणारी तीं–अव्यक्त स्थितीलाच जातात, म्हणजे नच दिसणारीं होतात–केव्हांहि पंचमहाभूतामध्येंच प्रविष्ट होणारीं केव्हांहि–मग तेथें शोक तो काय म्हणून, कां, कसचा तो?–(२८).

**जे समस्तें यियें भूतें। जन्माआदि अमुर्तें।**
**मग पातलीं व्यक्तितें। जन्मलीया ॥ १६४ ॥**

**तियें क्षयासि जेथें जाती। तेथें अनेनि भ्रांत नव्हति।**
**देखें पूर्वच्छितिची येति। आपलीये ॥ १६५ ॥**

**येर मध्यें जें प्रतिभासे। तें निद्रिता स्वप्न जैसें।**
**तैसा आकारू हा मायावशें। सत्स्वरूपीं ॥ १६६ ॥**

**नातरि पवनें स्पर्शलें निर। पढियासे तरंगाकार।**
**कां परापेक्षां अळंकार। व्यक्ति कनकिं ॥ १६७ ॥**

**तैसें सकळ हें मुर्त। जाण पां माया करित।**
**जैसें आकाशिं बिंबत। अभ्रपटळ ॥ १६८ ॥**

**तैसें आदिचि (जें) नाहिं। तयालागीं तूं रुदसि काई।**
**तूं अविट तें पाहिं। चैतन्य येक ॥ १६९ ॥**

**तयाचि आर्तिचि भोगित। विषयिं तजीले संत।**
**जयालागीं विरक्त। वनवासिये॥ १७०॥**

**दृष्टी सूनि जयातें। ब्रह्मचर्यादि व्रतें।**
**मुनिश्वर तपातें। आचरताति॥ १७१॥**

समस्तें भूतें = सर्वंच्या सर्व, देहादिक, वस्तुमात्र जें पंचमहाभूतांचें केलें. जन्माआदि अमुर्ते = अव्यक्त स्थितींत असलेलीं. अव्यक्त = जन्माच्या अगोदर, नच देहधारी अशीं. मग जन्मलीया व्यक्तितें पातलीं = जन्मल्यावर व्यक्तीस येणारीं, देहधारीपणानें सगुण अशीं दिसणारीं–आकाराला आलीं–(१६४). जेथें तीं क्षयास (निधनास) जातात = पंचमहाभूतांतच जेव्हां तीं प्रविष्ट होतात. अनेनि भ्रांत नव्हति = तेथें–पंचभूतीं प्रविष्ट होण्यानें–अन्यपणाचीं–निराळीं, दुसरेपणाचीं (आन–अन्य) झाल्यानें भ्रांत होत नाहींत. आपलीये पूर्वस्थितीचि (पूर्वच्छितिची) येती = आपल्या पूर्वस्थितीसच–दृश्य व्यक्त–आपल्याच पूर्वींच्या दर्शनपूर्वकतेनें अनुभवाला येणारीं होतात–स्थितीस येणारीं होतात–(१६५). येथें आता येता येता मध्येंच जें कांहीं दुसरें व्यक्त–दृश्यपणानें आपल्याच पूर्वींच्या अनुभवाला पाहाणारीं–येणारीं तीं तेथें जें कांहीं प्रतिभासतें–भासतें–दिसतें ते झोपीं गेलेल्यास स्वप्न पडावें तसें होतें–तसा हा आकार = दृश्य–वस्तु, जग मायावशेंकरून सतस्वरूपाचे ठायींचा, आत्मस्वरूपाचे ठायीं, आत्म्यावरच होणारा–(१६६).

नातरि = अथवा. पवनें = वाऱ्यानें. स्पर्शिल = स्पर्श्य, इंद्रियार्थ विषय. नीर = पाणी. पढियासे तरंगाकार = लाटांच्या रूपानें. पढियासे = दिसतो, भासतो. पर + अपेक्षा = दुसऱ्याच्या इच्छेनें होणारे. अलंकार तेथें कनकी = स्पष्ट दिसणाऱ्या सुवर्णावरच कीं तो अलंकाराचा. व्यक्ति = प्रगटपणा जसा–(१६७). सकळ हें मुर्त = हें सर्व साकार जें कांहीं. अभ्रपट = ढगांचा पडदा (जसा आकाशाचे ठायीं बिंबतो तसे) –(१६८). आदिचि = मुळींच. रुदसि = रडसी. अविट = नच नाश पावणारे–विटणारी ती–. चैतन्य = ज्ञानकलारूपी चैतन्य. पाहा = तेथेंच दृष्टि ठेव–(१६९). तयाचि आर्तिचि भोगित = ज्या चैतन्याची ज्ञानकला जन्मल्यावर, ज्याच्या प्राप्तीची इच्छा होतांच–(भोगल्यावर). विषयीं त्यजिले संत = (विषय हे मनुष्याला आपोआपच सोडतात) संत ते विषयांनीं आपोआपच सोडलेले होतात व मगच विरक्त ( = वैराग्य) संपन्नांनीं वनवास पत्करला होतो-(१७०). ज्या चैतन्यकलेचे ठायींची दृष्टि करून, तें ध्येय पुढें ठेवून = दृष्टी सूनि जयातें; ब्रह्मचर्यादि व्रतें = ब्रह्मचर्य आदिकरून जीं कांहीं व्रतें; मुनिश्वर = मौनी, तपस्वी, योगी, समर्थ, स्वामी. (मुनी = अगस्त्य, पाणिनी, गौतमबुद्ध, इ०). आचरताति = वर्तन–नियमाचे करतात–(१७१).

जी हीं समस्त भूतें जन्मण्याअगोदर अव्यक्त स्थितींत असलेलीं (अमूर्तें) व मगच जन्मल्यामुळें व्यक्तीस–आकाराला आलीं, पातलीं, पावलीं–(१६४)

तीं जेथ क्षयास जातात तेथें निश्चयानें निराळीं, अन्य, भिन्न अशीं नव्हत–न होतां आपल्या पूर्वस्थितीला येतात, येती–(१६५)

दुसरें जें मध्यंतरी भासमान होणें तें झोंपीं गेलेल्यास जसें स्वप्न पडावें तसें होय–त्याप्रमाणें सत्स्वरूपावर आकार हा मायावशेंकरून कीं–(१६६)

अथवा वाऱ्यानें, पवनानें पाणी स्पर्शलें, तें तरंगाकार भासतें, अथवा असें पाहा कीं, अलंकार हे–दुसऱ्याच्या इच्छेनें दिसणाऱ्या सुवर्णाच्या जागीं अलंकाररूपानें सुवर्णच आकाराला आलेलें–(१६७)

तसें सकळ हें आकारास आलेलें (मूर्त) तें मायाच करते असें जाण, जसें आकाशाचे ठायीं मेघाचें अभ्रपटल बिंबतें तसें–(१६८)

त्याप्रमाणें आदिचि जें नाहीं, तयालागी तूं (रडसी) रडतोस काय, तूं अविट–नाश न पावणारे जें चैतन्य तेथें दृष्टि ठेव–तें चैतन्यच एक पाहा–(१६९)

ज्या चैतन्याच्या प्रातीची इच्छा उत्पन्न होतांच (भोगी) विषयांनीं संत ते त्यजिले–संत विषयी त्यजिले होतात–व ह्याचसाठीं कीं वनवासी ते विरक्त असे होऊन असतात–(१७०)

जे ध्येय पुढें ठेवून, व्रतें ब्रह्मचर्य आदिकरून आचरतात मुनीश्वर तेच–(१७१)

**आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनं-**
**माश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।**
**आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति**
**श्रुत्वाऽप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २९ ॥**

[आश्चर्यवत् = आश्चर्य वाटल्याप्रमाणें = तोंड उघडें ठेवून. पश्यति = पाहातो. कश्चित् = कोणी. एनम् = आत्म्याला. आश्चर्यवत् = आश्चर्याच्या भावनेनें. वदति = वर्णितो. तथा = त्याचप्रमाणें. एव + च + अन्यः = दुसरा कोणी च एवं अन्यः = त्याचप्रमाणें दुसरा कोणी. शृणोति = वर्णन आश्चर्ययुक्त होऊन ऐकतो. श्रुत्वा अपि एनम् = ह्या आत्म्याला ऐकूनसुद्धां. कश्चित् न वेद = कोणीच जाणलें नाहीं.]

**अन्वय :** कश्चित् एनम् आश्चर्यवत् पश्यति । तथा अन्यः आश्चर्यवत् वदति एव । च । एनम् । आश्चर्यवत् अन्यः शृणोति । अपि श्रुत्वा । एनम् । न कश्चित् वेद ।

**अर्थ :** कोणी ह्या आत्म्याला आश्चर्य वाटल्यासारखें तोंड उघडें ठेवून पाहतो–त्याचप्रमाणें दुसरे कोणी ह्या आत्म्याला आश्चर्याच्या भावनेनें वर्णितो, तसेंच दुसरा कोणी आत्म्याच्या आश्चर्ययुक्ततेच्या वर्णनाला आश्चर्यानेंच ऐकतो–आणि (ह्या आत्म्यासंबंधीं) सावधानतेनें–चित्त जाग्यावर ठेवून, ऐकून सुद्धां आद्याप ह्या आत्म्याला कोणीच जाणिलें नाहीं–[आत्मज्ञान अनुभव दुर्लभ आश्चर्याचीच ती गोष्ट मानिली होते]–(२९).

**येक अंतरिं निश्चळ । जें न्याहाळींता केवळ ।**
**विसरले सकळ । संसारजात ॥ १७२ ॥**

**येका गुणानुवाद करितां । उपरति होउनि चित्ता ।**
**निरवधी तल्लीनता । निरंतर ॥ १७३ ॥**

**येक ऐकतांचि निवाले । ते देहभाविं सांडिलें ।**
**येक अनुभवें पातले । तद्रुपता ॥ १७४ ॥**

**जैसें सरितांचे वोघ समस्त । समुद्रामाजीं मीळत ।**
**परी माघोते न समात । परतले नाहिं ॥ १७५ ॥**

**तैसीया योगीश्वरांचिया मति । मीळणीसवें येक वाटति ।**
**परि जे विचारूनि पुनरावृत्ति । भजतिच ना ॥ १७६ ॥**

निश्चळ = चलनरहित, स्थिर, एकाग्र चित्तानें ज्याकडे पाहतां पाहतां. एक = कोणी एक. निहाळितां केवळ = केवळ स्वरूप पाहात असतां. सकळ संसारजात विसरले = संसारासंबंधींची खटपट विसरले. [संसारजात = जन्ममरणप्रवाह, कारणभूत. ऐहिक जीवित, (सां०) विश्व. संसारिन् = जीवात्मा, प्राणि] (१७२). गुणानुवाद (गुण + अनुवाद) = मूळधर्म सद्गुणांचा पुनरुच्चार जाहीर करणें जें. उपरति = अनुताप, विषय-निवृत्ति. निरवधि = निस्सीम, अखंड. निरंतर = नित्य, सतत, अव्याहत. तल्लीनता = निमग्नता, गढलेंपण. गढून जाणें जें–(१७३). एक ऐकताचि निवाले ( = शांत झाले). ते देहभावि = मीपणानें, देहभावनेनें, देह

आसक्ति. देह आत्मा मानणें तें त्यजिलें; सांडिलें (= त्यजिलें). एक अनुभवें (= उपभोग) इंद्रियद्वारा होणारें जें ज्ञान त्यानें. पातले = पावले. तद्रूपता = तदाकारता, तन्मयता, तल्लीनता-(१७४). सरितांचे (= नद्यांचे) ओघ (= प्रवाह) समस्त (= सर्व) = सर्व नद्यांचे ओघ प्रवाह. न समात (= समुद्रांत न मावतां) माघौते (= माघारे) परतले नाहीं = पण समुद्रांत सामावत नाहींत म्हणून नद्यांचे ओघ कांहीं परतले नाहींत-(१७५). योगीश्वरांचिया मति = योग करणारे समर्थ सत्ता चालविणारांच्या मति बुद्धि उद्देशावर. एकवाटती-एकवटती = उठाव घेऊन असतात. मिळणीसवें = मिळतांच. विचारूनि = तत्त्वनिर्णयानें-दूरदर्शीपणा-युक्तायुक्त विचार. जे पुनरावृत्ति = पुनर्जन्म. भजतीचि ना = सेवित नाहींत, पावत नाहींत-(१७६).

एक अंतःकरणामध्यें निश्चळ एकाग्र असें जें चैतन्य न्याहाळणें झाल्यानें केवळ एकाग्र चित्तानें पाहातां-पाहातच सकळ संसारजात विसरले-(१७२)

एक त्याच्या गुणाचे अनुवाद करतांकरतांच कीं, त्याच्या चित्तामध्यें अनुताप-उपरति होऊन तात्काळ अखंड तल्लीनता पावतात-(१७३)

एक त्यासंबंधीं (श्रवण करतांच) ऐकतांच कीं निवाले ते देहभावानें सांडले-सोडले गेले; एक ते अनुभवावरच कीं तद्रूपता पावले-तद्रूपतेस पोहोंचले-(१७४)

समस्त नद्यांचे ओघ समुद्रास-समुद्रामध्यें मिळतात, पण समुद्रांत सामावत नाहींत म्हणून काहीं ते नद्यांचे ओघ परतले नाहींत-(१७५)

तशा ह्या योगीश्वरांच्या मति-बुद्धि, (मिळणीसवें)-ब्रह्मीं मिळतांक्षणींच एकवटतात-ब्रह्मचिंतनानें तद्रूप होतात-पण जे ब्रह्मविचाराचे झालेले, ते पुनर्जन्माचे होत नाहींत-(१७६)

**देही नित्यमवध्योऽयं देहे सर्वस्य भारत ।**
**तस्मात्सर्वाणि भूतानि न त्वं शोचितुमर्हसि ॥ ३० ॥**

[देही = आत्मा. नित्यं = नेहमीं. अवध्यः = न च शीर्षच्छेद्यः. अयम् = हा आत्मा. देहे = सर्वस्य = अशेषस्य, समस्तस्य, समग्रस्य. भारत = पार्था. तस्मात् = त्याकरितां. सर्वाणि = सर्व. भूतानि = पदार्थमात्र. न त्वं शोचितुं = त्यासंबंधीं दुःख करणें; अर्हसि = तुज शोभत नाहीं; योग्य नाहीं.]

**अन्वय :** भारत, अयं देही सर्वस्य देहे नित्यम् अवध्यः । तस्मात् । सर्वाणि भूतानि शोचितुम् । त्वं न अर्हसि ।

**अर्थ :** हे भारतकुलोत्पन्न पार्था, हा आत्मा निरवयव, सर्व देहांमधील-सर्वांच्या देहांमध्यें असणारा नित्य, नच शीर्षछेद होण्यासारखा, कधींहि न मारतां येण्यासारखा आणि म्हणून सर्व पदार्थमात्रासंबंधीं-एकंदर चराचर भूतमात्रासंबंधीं तुंवा दुःख करणें, तुंवा शोक करणें तें तुला योग्य नाहीं-शोक करण्यास तूं योग्य नव्हेस-(देहाबरोबर आत्मा मरतो असें भ्रमानें समजून तूं शोकाकुल होऊं नकोस!)-(३०).

**तें सर्वत्र सर्वेहि देहिं । जया करिताहिं घात नाहिं ।**
**तें विश्वात्मक तूं पाहिं । चैतन्य एक ॥ १७७ ॥**

**ययाचेनि स्वभावें । हें होत जात आघवें ।**
**तरी सांगा काय शोचावें । येथें तुंवा ॥ १७८ ॥**

**यऱ्हवीं तऱ्हि पार्था । तुज कां नेणों न मने चित्ता ।**
**परि किडाळ हें शोचीतां । बहुतांपरि ॥ १७९ ॥**

जे = चैतन्य. सर्वत्र = सर्वाठायीं. सर्वेही = (सर्वी) सर्वेच्या सर्व. देही = देहामध्यें आत्मा एक जसा. जया करिताहि = ज्यास केला असतांहि. घात नाहीं = वध नाहीं, नाश नाहीं. तें विश्वात्मक = तें जगद्रूप–सर्व विश्वांत सर्व भूतांत भरून राहिलेलें. तूं पाहिं चैतन्य एक = एक चैतन्य, ज्ञानकला ते तूं जाण–(१७७). ययाचेनि–इयाचेनि स्वभावें = या चैतन्याच्या सहजपणाच्या स्वाभाविकतेवरच, स्वभावेंकरूनच कीं. हें आघवें होत जात = हें सर्व होतें जातें. तरी येथें काय तुंवा शोचावें सांग = तरी ह्या येथें काय त्वां शोक करावास सांग?–(१७८). यऱ्हवि पार्था तऱ्हि = हे पार्था, सहज पाहिलें तर. कां नेणों तुज न मने चित्ता = तुझ्या चित्ताला का मानवत–मनवत नाहीं, हें मला समजेना. परि किडाळ ( = गौण, हिणकस, कमीपणाचें). हें शोचीतां ( = दुष्ट, करुणास्पद). बहुतांपरि = वैपुल्य (बहुता) आधिक्यतेवर, आधिक्यतेनें, विस्तारावरच कीं टाकिलें गेल्यानें–(१७९).

जें सर्वत्र आहे, जें सर्वेहि देहामध्यें आहे, ज्यास घात केला तरी होत नाहीं, ज्याचा घात करण्याचा प्रयत्न केला असतां ज्याचा घात (नाश) होत नाहीं, असें तें विश्वात्मक–सर्व विश्वांत, सर्व भूतमात्रांत भरून राहिलेलें चैतन्य एक तें पाहा–(१७७)

यया चैतन्याच्या स्वभावेंकरून कीं, आघवें सर्व होतें जातें. तरी सांग कीं, येथें तुंवा शोचावें तें काय–कसचें?–(१७८)

येऱ्हवीं हे पार्था, तुज चित्ता का न मने, नेणो, पण हें शोक–दुःख करणें तें असे वाईट–कमीपणाचें बहुतापरी कीं, अनेक तऱ्हांनी दिसणारें–(१७९)

## कर्तव्याची आवश्यकता — (१८०–२२५) :

**स्वधर्ममपि चावेक्ष्य न विकम्पितुमर्हसि ।**
**धर्म्याद्धि युद्धाच्छ्रेयोऽन्यत्क्षत्रियस्य न विद्यते ॥ ३१ ॥**

[ स्वधर्मम् अपि = क्षत्रियधर्म देखील. च आवेक्ष = लक्षांत घेऊन. विकम्पितुम् न अर्हसि = कांपरें भरल्याप्रमाणें होऊन असणें हें तुला योग्य नाहीं धर्म्यात् हि युद्धात् श्रेयः = स्वधर्मानुसार = युद्धापेक्षां कल्याणकारक. क्षत्रियस्य अन्यत् न विद्यते = क्षत्रियांस–शस्त्रधारीला कांहींहि दुसरें नसतें ]

**अन्वय :** अपि स्वधर्मम् आवेक्ष । च । न अर्हसि विकम्पितुम् । धर्म्यात् युद्धात् हि । अन्यत श्रेयः क्षत्रियस्य । न विद्यते ।

**अर्थ :** आणि आपला क्षत्रियधर्म–स्वधर्म पाहिला असतां, लक्षात घेतला असता–तुला कांपरें तें का भरावें तें–तुला येथून जाणें कंपित होऊन तें योग्य नाहीं. कारण धर्म्य–स्वधर्मानुसार केलेल्या–युद्धापेक्षां दुसरे कांहीं अधिक श्रेयम् असें क्षत्रियांस नाहीं–(दयेनें, भयानें क्षत्रिय-कर्तव्य हें केव्हांहि सोडतांच येत नाही)–(३१).

**तूं अर्जुनि कां न विचारिसि । कायें हें चिंतित आहासि ।**
**स्वधर्म विसरलासि । तरावें जेणें ॥ १८० ॥**
**या कौरवां भलतें जालें । अथवा तुजची कांहिं पातलें ।**
**कां युगची हें बुडालें । जऱ्ही येथें ॥ १८१ ॥**
**तऱ्हि स्वधर्म येकु आहे । तो सर्वथा त्याज्य नोहे ।**
**मग तरिजेल काय पाहें । कृपाळुपणें ॥ १८२ ॥**
**अर्जुना तुझें चित्त । जऱ्ही जालें द्रविभुत ।**
**तऱ्हि हें अनुचित । संग्रामसमयिं ॥ १८३ ॥**

**अगा गोक्षीर जन्हि जाले । तऱ्ही पथ्यासि नाहिं घेतलें ।**
**ऐसेनिही विष होय सूदलें । नवज्वरिं देतां ॥ १८४ ॥**
**तैसें आनिं आन करितां । नाश होईल हिता ।**
**म्हणौनि तूं आतां । सावधु होईं ॥ १८५ ॥**

अझुणि का–अझुनि न विचारिसी = अद्यापवरहि तूं हें विचारांत घेत नाहीस. हें काये चिंतित आहासि ( =आहेस )=भलतेंच काय तें चिंतनाचें, समजुतीचें करीत आहेस. जेणें तरावें–तरिजे–स्वधर्म विसरलासि= ज्यायोगें तरावें तो आपला निज क्षत्रियधर्म तूं विसरला आहेस–(१८०). भलतें जालें–जाहलें = वेडेंवाकडें कोणतेंहि अमंगळ झालें–कौरवांचें अथवा तुझें. तुजची कांहिं पातलें=प्राप्त झालें–पोहोंचलें, मिळालें, पूर्वजन्माचें कर्मफळ. का–कीं–युगची बुडालें जन्हि–जऱ्ही–येथें–एथ = युगच इथें बुडालें, लयाचें झालें तरीहि–(१८१). येकु–एक स्वधर्मु=एक निजधर्म. त्याज्य नोहे=त्याग करणें योग्य नव्हे–त्याग करण्यास योग्य नाही. तरी कृपाळुपणें काय पाहें तरिजेल = जर का त्यागाचा केलास, तर मग दयावंत, दयाशील का कृपाळु होण्यावर कसचें न काय तें तरण्याचें तें–[ दयालुः कारुणिकः कृपालुः सूरतः इति ४ दयाशीलस्य। (अमर० )](१८२).

चित्त द्रविभुत जालें–जाहालें=चित्त, मन पाझरलें; लक्ष वितळलें; अनिश्चितपण रसरसलें. संग्राम-समयिं हें अनुचित=लढाईचे वेळीं हें अयोग्य होय–असें मन पाझरणें होणें उचित नाहीं–(१८३). अगा गोक्षीर जन्हि जाले = पहा कीं जरी गाईचें दूध असलें. पथ्यासि घेतलें नाहीं = तरी ते पथ्यास ( ज्वरामध्ये ) घेतलेलें नाहीं. नवज्वरिं देतां–ऐसेनिही–सूदले विष होय = विषमज्वरामध्यें–नवज्वरामध्यें तें घातलें, दिलें असतां, जरी तें गाईचें असें उत्तम दूध तरी तें विषच कीं तापामुळें बनतें–(१८४). आनिं आन करितां = भलत्यानें भलतेंच केलें–क्षत्रियांनीं ब्राह्मणांचें किंवा ब्राह्मणांनीं शूद्रांचें कर्म केलें तर–स्वहिताचा नाश होईल=(स्वहिताच्या) हिताचा–उपयुक्ततेचा, योग्यतेचा, हितकर असें होणें जें त्याचा नाश होईल. ( स्वहस्त=हस्ताक्षर, पुरावा ). म्हणौनि आतां तूं सावधु होईं=तरी तूं आतां "लक्ष देणारा"–सावध–दक्ष असा होऊन ऐस. (आनान= भिन्नभिन्न, निरनिराळें )–(१८५).

तूं अजूनहि कां बरें हें विचारास घेत नाहींस ! काय असें हें चिंतण्याचें करीत आहेस ! ज्यायोगें तरावें, तो स्वधर्म विसरला आहेस कीं–(१८०)

ह्या कौरवांना भलतें झालें–ह्या कौरवांचें किंवा तुझें कांहीं वेडेंवाकडें, अमंगळ झालें अथवा येथें हें युग जरी बुडालें–(१८१)

तरी एक स्वधर्मच काय तो आहे, जो सर्वथा त्यज–त्याज्य नव्हेच–येथें कृपाळुपणाचें होणें झालें तर, मग तरणें, उद्धरणें, उद्धरून जाणें, होईल काय, सांग पाहूं–(१८२)

तुझें चित्त अर्जुना, जर का स्नेहाला वश झालें–तरीपण असें तें स्नेहाला वश होणें हें संग्रामसमयीं उचित नाहीं, योग्य नाहीं–(१८३)

असें पाहा कीं, गाईचें दूध जरी झालें, तरीपण तें कांही पथ्यास घेतलें नाही; व असें असूनहि जर तें नवज्वरामध्यें दिलें, तर दूध नव्हे विषच घातलें–दिलें असें होईल–(१८४)

तसें भलतें भलत्या ठायीं–भलत्यानें भलतेंच केलें–क्षत्रियांनीं ब्राह्मणांचें किंवा ब्राह्मणांनी शूद्रांचें कर्म केलें तर–भरमसाट केलें असतां हिताचा नाश होईल, याकरितां आतां तूं सावध हो–(१८६)

**वायांचि व्याकुळ काई । आपुला निजधर्मु पाहिं ।**
**जो आचरतां बाधु नाहिं । कोणीहि काळिं ॥ १८६ ॥**

**जैसे मार्गेंच चालतां । अपाय न पवे सर्वथा ।**
**कां दिपाधारें वर्ततां । नाडखळिजे ॥ १८७ ॥**

**तयापरि पार्था । स्वधर्में राहाटतां ।**
**सकळकामपरिपूर्णता । सहजें होये ॥ १८८ ॥**

**म्हणौनि यालागीं पाहिं । तुम्हां क्षत्रीयां आणीक कांहिं ।**
**संग्रामावांचुनि नाहिं । उचित जाणें ॥ १८९ ॥**

**निष्कपटा होआवें । उसीणा घाई जुंझावें ।**
**हें असो कायि सांगावें । प्रतक्षावरि ॥ १९० ॥**

वायांचि = व्याकुळ काई = व्यर्थ खिन्न कां होतोस–व्यर्थच म्लान होणे तें कशास? ( म्लान = कोमेजणें, थकणें, खिन्न होणें, अशक्त होणें ). आचरितां जो कोणीहि काळि बाधुं नाहिं = आचरल्यास, वागविल्यास, प्रमाणें वागल्यास, आश्रयिल्यास,–संसर्ग ठेवल्यास, जो कधींहि हानीचा होणारा नव्हेच नव्हे, सहेतुकतेचा (=दोषाचा) होणारा नव्हे. बाधुं = हानि, प्रत्यवाय, दोष, पाप; पिडणें, छळणें, विरोध करणें, हांकून लावणें, हल्ला, प्रहार करणें–(१८६). मार्गेंच चालतां सर्वथा अपाय–अपायो न पवे = रस्त्यानेंच चालल्यास केव्हाहि हानी होणार नाहीं, पोहोंचणार नाहीं. अपायो = हानी. दिपाधारें वर्ततां = दिव्याच्या आश्रयानें वर्तन–वर्तणूक केल्यास. नाडखळिजे = अडखळत नाहीं–(१८७). तयापरि ( = त्याप्रमाणें ) स्वधर्में ( = स्वधर्मानें ) राहाटतां ( = वर्तणूक केली असतां ) = स्ववर्णोचित कर्तव्यानें. सहज = सख्खा भाऊ, जातिस्वभाव, स्वाभाविक, जन्मसिद्ध. सकळ = ( समग्रं, सकलं, पूर्ण, अखंडम् ). कामं = ( इष्टं, यथेप्सितम् , कामम् , प्रकामम् । ). परिपूर्णता = भरलेला, तृप्त. सकळकामपरिपूर्णता होये = मनोरथाचा सिद्ध–(१८८).

म्हणौनि यालागीं पाहिं = म्हणून याकरितां जाण कीं. तुम्हां क्षत्रीयां कांहिं आणीक उचित संग्रामावांचुनि नाहिं जाणें = क्षत्रियांना–तुम्हांस–योग्य अशा संग्रामाशिवाय आणीक दुसरें असें कांहींहि उचित असें नाहींच नाहीं–(१८९). निष्कपटा होआवें = (शठं प्रति शाठ्यं–कपट = लबाडी. कपटिकः = लुच्चा, ठक. (–कपटः, व्याजः, दम्भः, उपधिः, छद्म, कैतवम् , कुसृतिः, निकृतिः, शाठ्यम् इति ९ शाठ्यस्य– ). उसीणा घाई जुंझावें = शत्रूनें घाव मारला असतां, परत घाव मारून मोठ्या वीरश्रीनें घे घे म्हणत लढावें. हें (असें) असो (प्रत्यक्षा) प्रतक्षावरि सांगावें कायि = तुला माहित असलेल्या अशा ह्या उघड गोष्टीबद्दल आणखी तें काय सांगावयाचें ?–(१९०).

व्यर्थ का खिन्न होतोस–वाया व्याकुळ काई–आपला निजधर्म येथें पाहा, जो आचरला असतां कवणेहि काळीं बाध–हानी म्हणून होणारी नाहीं–(१८६)

रस्त्यानें-मार्गानें चाललं तर केव्हांहि अपाय होणारा नव्हे; दिव्याच्या आधारानें चालले तर अडखळणें नाहीं–अडखळून पडणें नाहीं–(१८७)

त्यापरी हे पार्था, स्वधर्मानें वागतां, वर्ततां सकळ मनोरथसिद्धि सहजच होणारी–(१८८)

याकरितां आणि म्हणून असें पाहा कीं–असें जाण कीं–तुम्हां क्षत्रियाना संग्रामावांचून आणीक कांहीं उचित नाहीं–(१८९)

निष्कपट व्हावें, उसण्या घाईनें डाव घ्यावा, डाव द्यावा, असे शत्रूनें डाव–घाव मारिला असतां, परत घाव मारून, मोठ्या वीरश्रीनें "घे घे" म्हणत लढावें, झुंजावें; तुला माहीतच असलेल्या ह्या उघड गोष्टीबद्दल सांगावयाचें तें काय ?–(१९०)

**यदृच्छया चोपपन्नं स्वर्गद्वारमपावृतम् ।**
**सुखिनः क्षत्रियाः पार्थ लभन्ते युद्धमीदृशम् ॥ ३२ ॥**

[यदृच्छया = इच्छा केल्यावांचून–कुरापत काढल्यावांचून. (यत्–ऋच्छया "यदृच्छा" = स्वच्छंदीपणा, सहजपणा.–यदृच्छा, स्वैरिता इति २ स्वच्छंदतायाः हेतुशून्या आस्या स्थितिर्विलक्षणम् स्यात् । स्वतंत्रः, अपावृत्तः, स्वैरी, स्वच्छंदः, निरवग्रह;, इति ५ स्वच्छंदस्य । पद् + उप = जवळ जाणें, मिळणें, प्राप्त होणें, शक्य असणें, योग्य असणें, शोभणें, उत्पन्न करणें, घडवून आणणें, जवळ आणणें, देणें, मिळवणें, तयार करणें, सिद्ध करणें, प्रतिपादणें. अपावृतम् = उघडून देणारें, परत फिरणें, निवृत्त होणें. च = आणि. उपपन्नम् = प्राप्त झालेलें. स्वर्गद्वारम् = स्वर्गाचें द्वार. सुखिनः = दैवशाली. सहज अनायासेंच क्षत्रिय–सहज अनायासेंच युद्ध. क्षत्रियाः = क्षत्रियांनाच. पार्थ = हे अर्जुना. लभन्ते = लाभतें. युद्धम् = युद्ध. ईदृशम् = आजच्यासारखें असें हें–(उद् + पत् = वर उडणें, चालून जाणें, बाहेर पडणें, उद्भवणें). उपपति = जार–मुख्याद् अन्यस्य भर्तुः । उपपन्न = जवळ आलेलें, लब्ध, संपन्न, सहित, योग्य, संभाव्य, शक्य, सिद्ध केलेला, सत्य, संमत, अर्पित, बरा केलेला. उपपात = संकट, नाश. उपपातकं = गौण पातक. अपावृत = उघडें, मोकळें, झाकलेलें, स्वैर, अमर्याद. अपावृत्त = परतवलेला, पराङ्मुख, पराभूत, भूमीवर लोळणें, बाजूला मरणें– ].

**अन्वय :** पार्थ । च । यदृच्छया उपपन्नम् । स्वर्गद्वारम् । अपावृतम् । युद्धम् ईदृशम् । क्षत्रियाः सुखिनः । लभन्ते ।

**अर्थ :** हे पार्था, आणि सहज हें इच्छेनेंच, इच्छा केल्यावांचूनच प्राप्त झालेलें, (आणि) स्वर्गाचें द्वार उघडें–मोकळें करणारें–उघडून देणारें, स्वैर, अमर्याद युद्ध हें आजच्यासारखें सहज अनायासेंच–क्षत्रिय सहज युद्ध–अनायासेंच, दैवशाली अशा, सहज अनायासेंच कीं–सुखिनः अनायासेंच क्षत्रियांनाच लाभतें–**(३२).**

**अर्जुना जुंझ देख आतांचें । हें हो कां काज दैव तुमचे ।**
**किं निधान सकळ धर्माचें । प्रगटलें असें ॥ १९१ ॥**

**हा संग्रामु काय म्हणिपे । किं स्वर्गुचि येणें रूपें ।**
**मूर्त कां प्रतापें । उदो केला ॥ १९२ ॥**

**नातरि गुणाचेनि पतिकारें । अर्तीचेनि पडिभरें ।**
**हे किर्तिचि स्वयंवरें । आली तुज ॥ १९३ ॥**

**क्षेत्री बहुत (पुण्य) किजे । तें जुंझ यैसें लाहिजे ।**
**जैसें मार्गि जातां आडळीजे । चिंतामणि(सी) ॥ १९४ ॥**

**नातरि जांभया पसरिजे मुख । तेथें अवचटें पडे पीयुष ।**
**तैसा हा संग्राम देख । पातला असे ॥ १९५ ॥**

अर्जुना जुंझ देख आतांचें = पार्था, जुंझणें आजचें पाहा. हें हो (कां जें) कां काज दैव तुमचें = हें तुमचें काज दैव होवो, दैवाचें कार्य, दैवाचें काम–(काज = काम, कार्य, काय. कामकाज = शब्दा बाजारहाटाप्रमाणें, जेवणेंखाणें, धीर, गंभीर). किं निधान ( = ठेवा, सार) सकळ धर्माचें = सकळ धर्माचें निधानच ( = खजिना, सांठा, आगर, स्थान, ठेव, ठेवण). प्रगटलें असें = प्रकट, उघड, स्पष्ट, जाहीर झालें आहे–(१९१). संग्राम ( = लढाई) काय म्हणिपे = ही लढाई म्हणावी तर अहो! स्वर्गुचि = देवांचें वसतिस्थान, निर्मळ सुख. रूपे = स्वरूप, लक्षण, अनुरूप, साजेसें, जसेंच्या तसेंच. मूर्त = दृश्य, आकाराचें, मूर्तिमंत, सत्य, कठीण. प्रतापें = तेज, वैभव, प्रभाव, शौर्य–कांति, चकाकी. उदय = वर आला, समृद्ध, उत्कर्ष, सिद्धि, प्रभाव–(१९२).

नातरि गुणाचेनि पतिकारें ( =गुणाचा अनुभव लौकिक ऐकून). अर्तीचेनि ( = दुःख, पीडा, नाश, आजार ) पडिभार ( =आसक्तीनें, प्रेमाच्या आधिक्यानें). किर्तिचि ( =यश, कीर्ति, कृपा, विस्तार, तेज, राजवाडा). स्वयंवरें=स्वतः पति वरणें (स्त्री.) स्वयंवर करणारी, (स्वयंवरा, पतिंवरा, वर्या इति स्वेच्छया पतिवरणोद्युक्तायाः ॥)-(१९३) क्षत्रियें-क्षात्री बहुत ( = बहुता, बहुत्वं, वैपुल्य (पुण्य) कीजे. तै झुंज ( = लढाई ) यैसें लाहिजे (प्राप्त होतें, प्राप्त व्हावें). जैसें मार्गि जातां आडळीजे ( = सहज प्राप्त व्हावा- अकस्मात आढळावा). चिंतामणि-चिंतामणि(सी)=इच्छित फळ देणारा मणि, मण्याला-(१९४). जांभया= जृम्भः जृम्भणम् इति २ जृाम्भकायाः। अवचटें = अकस्मात्. पडे पीयुष-पियूष-पियूख = (अभिनवं पयः पीयूषः स्यात्. पीयूषम्, अमृतम्, सुधा इति ३ अमृतस्य।) तैसा हा संग्राम (युद्ध, समर, रण, कलह, विग्रह, संग्राम, आजिः ॥) देख पातला असे=तसें हें समर प्राप्त झालें आहे-(१९५).

अर्जुना, आतांचें झुंज हें (कारणस्य कारण) काज दैव तुमचें हो, अथवा सार ठेवा का निधानच एक क्षात्रधर्माचें सकळ असें प्रकटलें आहे-(१९१)

हा संग्राम कसचा! हा स्वर्गच येत आहे ह्या रूपानें : तुमच्या प्रतापानें हा मूर्तिमंत भाग्योदय पुढें आणला आहे-(१९२)

अथवा गुणाचा अनुभव लौकिक ऐकून, आर्तीच्या प्रेमाच्या आधिक्यानें, आसक्तीनें ही कीर्तीच स्वयंवरासाठीं तुजजवळ आली आहे-(१९३)

क्षत्रियानें पुण्य करावें, केलें व्हावें, तरच असलें हें दिव्य झुंज प्राप्त होतें, जसें का मार्गानें जात असतांना चिंतामणि सहज प्राप्त व्हावा-(१९४)

अथवा जांभई आली, मुख पसरलें, तेथें एकाएकीं पियूषच-अमृतच मुखांत पडावें, तसा हा संग्राम पाहा-पातला आहे-(१९५)

**अथ चेत्त्वमिमं धर्म्यं संग्रामं न करिष्यसि ।**
**ततः स्वधर्मं कीर्तिं च हित्वा पापमवाप्स्यसि ॥ ३३ ॥**

[अथ चेत्=शक्यावरहि जर. त्वं=तूं. इमम्=हें. धर्म्यं=स्वधर्मविहित, कर्तव्यरूप. संग्रामम्= युद्ध न करिष्यसि=जर करणार नाहींस. ततः=तर. स्वधर्मम्=स्वधर्मास. कीर्तिम् च=आणि पूर्वसंपादित कीर्तीस. हित्वा=घालवून. पापम् अवाप्स्यसि=पाप मात्र जोडशील.]

**अन्वय :** च । अथ । इमं धर्म्यं संग्रामम् । त्वं । चेत् । न करिष्यसि । ततः । हित्वा । स्वधर्मम् कीर्तिं । च । पापम् अवाप्स्यसि ।

**अर्थ :** आणि इतक्यावरहि हें धर्म्य, स्वधर्मविहित, कर्तव्यरूप युद्ध तूं जर का करणार नाहींस, तर (ततः) स्वधर्म तसेंच पूर्व अर्जित कीर्ति यांना मुकून (घालवून देऊन) पाप मात्र जोडशील-(३३).

**आतां ऐसा हा अव्हेरिजे । मग नाथिलें शोचुं बैसीजे ।**
**तरि आपण आहाणा होईजे । आपणपेयां ॥ १९६ ॥**

**पूर्वजांचें जोडलें । आपणचि होय धाडिलें ।**
**जरि आजि शस्त्र सांडिलें । रणीं इये ॥ १९७ ॥**

**(तरि) असति कीर्ती जाईल । जगचि अभिशाप देईल ।**
**आणि गींवसित पावतिल । माहादोष ॥ १९८ ॥**

**जैसि भर्तारेंहिन वनिता । उपहति पावे सर्वेथा ।**
**मग तैसि दशा जीविता । स्वधर्मेंविण ॥ १९९ ॥**

**नातरि रणिं शव सांडिजे । तें चौमेरिं गीधिं विदारिजे ।**
**तैसें स्वधर्मेंहिन अभीभविजे । माहादोषिं ॥ २०० ॥**

अव्हेरिजे=(आतां हा ऐसा) टाकावा. नाथिलें=लटकेंच, नसलेलें जे, नसतेंच. (आथिलें–असलेलें. आथि अस्ति अस्–असणें. आथि–आहे. आथिला–संपन्न). शोचुं बैसीजे=करुणास्पदतेचें, दुष्ट. आपण आहाणा (=हानि करणारा, घातक) होईजे = आपण घातक व्हावें–होतें–होईल. आपणपेयां = आपणाला स्वतःला. –(१९६). पूर्वजाचें जोडलें=पूर्वजांनीं मिळविलेलें. आपणचि होय धाडिलें=गमाविलें, गमावलें, आपणच. जरी आजि शस्त्र रणीं इये सांडिलें=जरी का आज ह्या संग्रामामध्यें शस्त्र सांडलेस, टाकलेंस तर–शस्त्र हें मांडल्यालवंडल्यावरि गेलें तर–इये=ह्या. रणीं इये=ह्या रणभूमीवर–(१९७).

असति कीर्ती जाईल=असलेली यशकीर्ति, कृपा नाहींशी होईल. जगचि अभिशाप(=शाप=आरोप, आळ, निंदा) देईल=हें जग तुला निंदेचें करील. गींवसित पावतील माहादोष=दोष महान् असे तुजला हुडकून तुझे मागें लागतील–तुजपर्यंत पोहोंचतील–(१९८). जैसि भर्तारेंहिन वनिता=जशी पतिविरहित स्त्री. उपहति पावे सर्वेथा=सर्वथैव अपमान पावते. मग तैसि दशा जीविता स्वधर्मेंविण=तशी स्वधर्मविहित कर्तव्याशिवाय असलेल्या जीविताची होते–(१९९). रणिं शव सांडिजे=समरांगणाचे ठिकाणीं शव सांडून–त्याची नीट व्यवस्था नच लावून जर चालतें झालें. चौमेरिं गीधिं=चहूंकडून गिधाडांनी विदारिलें होतें–व्हावें जसें. (विदार=फोडणें, चिरणें, फाडणें, युद्ध. दृ+वि=हल्ला केला जातो). स्वधर्मेंहिन अभीभविजे= स्वधर्मविहित, कर्तव्यरहित जो त्यास जिंकतात. माहादोषिं=महादोष ते-(२००).

आतां असा हा अव्हेरावा व नसलेलें लटकेंच दुःखी व्हावें–शोचूं बैसावें, शोक करीत बसावें, तरी मग आपणच आपली हानी केली–आपणच आपणास हानी करणारा झाला, घातक झाला असें होईल.–(१९६).

पूर्वजांचे जोडलेलें तें आपणचि कीं (धाडिलें) गमाविलें असें होईल, जर का आज ह्या रणांगणीं शस्त्र सांडलेंस तर –(१९७).

असती कीर्ति जाईल, जग आरोप शाप आळ निंदा करील, आणि महादोष हुडकीत येतील–(१९८)

जशी भर्तारेहीन वनिता निस्तेज केल्यामुळें सर्वेथा अपमान पावते, मग स्वधर्माशिवाय तसी जीविताची दशा जाण–(१९९)

अथवा रणी शव सांडावे, ते चहूंबाजूंनीं गिधि विदारावे–विदारिजे, तैसें महादोषी स्वधर्महीनातें अभिभविजे होतें–पीडा होते, जेरीस आणणें होतें–तिरस्कार, अपमानलेला होतो–(२००)

**अकीर्तिं चापि भूतानि कथयिष्यन्ति तेऽव्ययाम् ।**
**संभावितस्य चाकीर्तिर्मरणादतिरिच्यते ॥ ३४ ॥**

[च=आणि. अपि=देखील. अकीर्ति=फजिती, अप्रतिष्ठा, अपकीर्ति. भूतानि=सर्व लोक. कथयिष्यन्ति=सांगत राहतील. ते=तुझी. अव्ययम्=अक्षय्य. संभावितस्य=प्रतिष्ठित पुरुषाची. च=कीं, आणि. अकीर्ति=अपकीर्ति, फजिती, अप्रतिष्ठा. मरणात् अतिरिच्यते=मरणापेक्षांहि अधिक संतापदायक असते.]

**अन्वय:** भूतानि । च । ते । अव्ययाम् अकीर्तिं अपि । कथयिष्यन्ति । च । मरणात् अकीर्ति अतिरिच्यते संभावितस्य ।

**अर्थ :** आणि तुझी अपकीर्ति, फजिति–अप्रतिष्ठा देखील सर्व लोक सांगत बसतील व हें जाण कीं, प्रतिष्ठित पुरुषास अपकीर्ति, फजिती मरणापेक्षांहि अधिक संतापदायक होय–(३४).

**म्हणउनि स्वधर्म (हा) सांडिसील । तरि पापा वरिपडा होसिल ।**
**आणि अपेश तें न वचेल । कल्पांतवरि ॥ २०१ ॥**

**जाणतेन तंवचि वरि जीयावें । जंव अपकिर्ति आंगा न पवे ।**
**आणि सांग पां कैंवि निगावें । येथुनियां ॥ २०२ ॥**

**तूं निर्मच्छर सदयता । येथुनि निगसि किर माघौता ।**
**परि ते गति समस्तां । न मनेल ययां ॥ २०३ ॥**

**हें चहुंकडुन वेढितिल । बाण वरिं घेतिल ।**
**येथें पार्था न सुटिजैल । कृपाळूपणें ॥ २०४ ॥**

**ऐसेनिहि प्राणसंकटें । जरि विपायें पां निगणें घटे ।**
**तरिं तें जीयालें हि वोखटें । मरणाहुनि ॥ २०५ ॥**

स्वधर्म सांडिसील = स्वधर्माप्रमाणें विहित कर्तव्य सोडशील, टाकून देशील, सांडशील. पापा वरिपडा ( = प्राप्त) होशील = पापांत पडशील, पापास पावशील. अपेश तें न वचेल ( = दूर होणार नाहीं). कल्पांतवरि = प्रलयकालपर्यंतहि–(२०१). जाणतेन = जाणत्यानें, ज्ञात्यानें. तंवचि = तंववरच. जियावें = जगावें. जंव अपकिर्ति आंगा न पवे = जंववर अपकीर्ति अंगास आली नाहीं–पावली नाहीं, अंगापर्यंत पोहोंचली नाहीं; जाणत्यानें अपकीर्तीचा स्पर्श झाला नाहीं तोवरच जगावें. आणि सांग पां कैंवि ( =कसें) निगावें ( =निघावें). येथुनियां–एथोनियां = रणांगणामधून–(२०२). निर्मच्छर (निर्मत्सर) (सदयता) = कनवाळूपणानें, मत्सररहित, दयार्द्र अंतःकरणानें व निर्वैरपणानें. किर माघौता निगसि (निघसील) = तूं निश्चयानें (किर) माघारीं निघालास–निघशील. परि ते गति समस्तां ( = ही गति–दयामूलक पलायन) न मनेल ययां ( = मानणें, पटणें,–आवडणारें नच ह्यांना होईल) = ही गोष्ट ह्यांना खरी वाटणार नाहीं–पटणार नाहीं, माघारी निघालास निर्वैरपणानें–(२०३). हें चहुंकडुन वेढितिल–कवळितील = हे चहुबाजूनीं वेढतील. बाण वरिं घेतिल = बाणांचा भडिमार करितील. येथें पार्था न सुटिजैल = तेथें (येथें) पार्था, सुटका नच होईल–नीतिबंधनांतून पार होणें नच होईल–उलट जास्तच तेथें फसणें होईल. कृपाळूपणें = दयार्द्रतेचें होऊन–(२०४). ऐसेनिहि = अशा तऱ्हेचा. प्राणसंकटें = जीवावर प्रसंग आला तरीसुद्धां. जरि विपायें पां निगणें (निघणें) घटे = कदाचित् त्यांतून निघशील–त्या प्रसंगांतून कदाचित् निघण्याचें होईल. तरि तें जीयाले = जगणें, वाचणे. वोखटें = वाईटच होय. मरणाहुनि = मरणापेक्षांसुद्धां–(२०५).

कारैतां स्वधर्म हा सांडशील, तर पापांत पडशील–तुजला पाप होईल, पाप लागेल व अपेशातें कल्पांतवरीहि नच वचेल, जाईल, टळेल, चुकविलें नच होईल–(२०१)

जाणत्यानें तंववरच जागावें जंव अपकीर्तीचा स्पर्श झाला नाही–अपकीर्तीचा स्पर्श झाला नाहीं तंववरच जाणत्यानें जगावें (सुभाषित)–आतां सांग बरें कसें तें येथून परत फिरावें–निघावें तें?–(२०२)

तूं निर्मत्सर सदयता येथून माघारी निगसील, पण ते गति गोष्ट ह्या सगळ्या योद्धयांना पटणार नाहीं–दयार्द्र अंतःकरणानें व निर्वैरपणानें तूं येथून माघारीं परत निघालास ही गोष्ट यांना खरी वाटणार नाहीं; द्वेषरहित होऊन कृपेनें येथून परत खचित गेलास तरी, ती परत मागें फिरण्याची रीति सगळ्या योद्धयांना मान्य होणार नाहीं–(२०३)

हे चहुंबाजूंनीं कवळितील, बाणांचा भडिमार करितील; तेथें मग हे पार्था, कृपाळुपणाचें होऊन सुटणें नच होईल .... (२०४)

अशाहि प्राणसंकटांतून जरी कदाचित चुकून माघारीं निघणें घडलें, तरीपण तें तर मरणापेक्षाहि जास्त खोटें-वोखटें होईलच कीं .... (२०५)

**भयाद्रणादुपरतं मंस्यन्ते त्वां महारथाः ।**
**येषां च त्वं बहुमतो भूत्वा यास्यसि लाघवम् ॥ ३५ ॥**

[भयात् = आम्हाला भ्यायल्यामुळें. रणात् = युद्धांतून. उपरतम् = परत फिरला-पळाला असें समजतील. मंस्यन्ते = समजतील. (सं + मन् = तुच्छ मानणें, अवलंबणें, अपमान करितील, तिरस्कार करितील). त्वाम् = तुला. महारथाः = दुर्योधन, कर्ण इत्यादि योद्धे. येषाम् = ज्या वीरांच्या. च = आणि. त्वम् = तोच, तूं आतां. बहुमतः (-अतिशय सन्मानित-) = बहुमानाला. भूत्वा = प्राप्त झालेला आहेस. लाघवम् यास्यसि = तुच्छतेला पात्र होशील-लघुत्वाला पात्र झाल्यामुळें ते तुझा तिरस्कार करतील ]

**अन्वय :** भयात् रणात् उपरतम् । त्वां । महारथाः । मंस्यन्ते । येषा च त्वम् बहुमतः भूत्वा असि । सः । त्वम् लाघवम् यास्यसि ।

**अर्थ :** कौरवांना-दुर्योधन, कर्ण इत्यादींना भ्यायल्यामुळें रणामधून पळालास, तर सर्व शूर योद्धे केवळ आम्हांला भ्यायल्यामुळें अर्जुन रणामधून-युद्धामधून परत फिरला, पळून गेला, पळाला, असें समजतील-आणि ज्या वीरांच्या बहुमानाला पात्र झालेला आजपर्यंत (जो) तूं तो आतां त्यांच्या तुच्छतेला, तिरस्काराला पात्र होशील-(३५).

**तुं आणिक हि येक न विचारिसि । येथें संभ्रमें झुंझों आलासि ।**
**आणि सकणवपणें निगालासि । माघौता जरि ॥ २०६ ॥**
**तरि तुझें तें अर्जुना । या वैरियां दुर्जनां ।**
**कां प्रत्यया येईल मना । सांगें मज ॥ २०७ ॥**

तूं आणिक ही एक न विचारिसि = आणीक एक गोष्ट लक्षांत घे कीं. येथें (एथ) संभ्रमें = समारंभानें, तयारीनें, मोठ्या उत्साहानें. झुंझो (झुंजो) आलासि = युद्ध करण्यास आलेला. आणि सकणवपणें निगालासि (निघालासि) = (कृपाळु) ममताळूपणानें, दयाळू होऊन निघालास. माघौता (मागुता) जरि = माघारा जरी-(२०६). तरि तुझें तें = दयालुत्व-कृपाळुपण हें. या वैरियां दुर्जनां = दुर्जन वैरी जे त्यांना. का प्रत्यया = कसल्या त्या अनुभवाला, खात्रीला, अधीनतेला. येईल मना = येईल-पाहील बरें. सांगें मज = मजला सांग पाहूं-(२०७).

आणीक कांहींहि तूं विचारास घेत नाहींस-इथें संभ्रमें-मोठ्या उत्साहानें झुंजण्यास-लढण्यास आला आहेस; तसेंच वर दयाळूपणानें माघारीं परत जरी निघालास, गेलास-(२०६)

तरी तुझें तें तसें करणें हे अर्जुना, ह्या दुर्जन वैऱ्यांच्या अनुभवास, विश्वासास, खात्रीस, कल्पनेस, प्रत्ययास तेथें काय बरें येईल तें .... (२०७)

**अवाच्यवादांश्च बहून् वदिष्यन्ति तवाहिताः ।**
**निंदन्तस्तव सामर्थ्यं ततो दुःखतरं नु किम् ॥ ३६ ॥**

[अवाच्यवादान् (= बोलूं नये ते निंदाजनक शब्द). च = आणखी ते (तुजसंबंधीं). बहून = पुष्कळच. वदिष्यन्ति = बोलतील. तव = तुझें. अहिताः = शत्रू. निंदन्तः = निंदा करणारे होऊन, तव सामर्थ्यम् = तुझ्या पराक्रमाची. ततः = त्याहून. किम् = काय आहे. दुःखतरम् = अधिक दुःखदायक, अधिक संतापजनक.]

**अन्वय :** अवाच्यवादान् च तव अहिताः बहून् वदिष्यन्ति । तव सामर्थ्यम् निंदन्तः ततः नु किम् दुःखतरम् ।

**अर्थ :** तुझे शत्रु तुझ्या पराक्रमाची निंदा करणारे होतील; आणखी ते बोलूं नये ते निंदाव्यंजक शब्द–निंदेचे शब्द–तुजसंबंधीं पुष्कळच बोलतील; यापेक्षां अधिक दुःखदायक काय आहे तें?–(३६).

**हे म्हणती गेला रे गेला । अर्जुन आम्हां विहाला ।**
**हा सांगें बोल उरला । निका कायि ॥ २०८ ॥**

**लोक सायासेंकरूनि बहुतें । कां वेंचिति आपुलिं जीवितें ।**
**परि वाढविति कीर्तीतें । धनुर्धरा ॥ २०९ ॥**

**ते तुज अनयसें । अनकळित जोडिलें असें ।**
**हें अद्वितीय जैसें । गगन आहे ॥ २१० ॥**

**तेसि किर्ति निःसिम । तुझां ठाईं निरोपम ।**
**तुझे गुण उत्तम । तिहिं लोकिं ॥ २११ ॥**

**दिगांतींचे भूपति । भाट होऊनि वाखाणिति ।**
**जे आयिकीलीया दचकति । कृतांतादिक ॥ २१२ ॥**

**(ऐक) यैसि महिमा घनवट । गंगा जैसी चोखट ।**
**जया देखीं जगीं सुभट । व्हांट जाले ॥ २१३ ॥**

गेला रे गेला = गेला, पळाला, दूर झाला, निघून गेला. बिहाला आम्हां अर्जुन = भ्याला अर्जुन आम्हांस. सांगें बोल (= टपका) उरला निका कायि = उणें बोलणें निंदेचे तें काय खरा–चांगला म्हणावा–(२०८). का वेंचिति–वेचिती = खर्चितात. आपुलिं जीवितें = जीवंतपणा, प्राण, जगणें, जीवात्मा, जीवंत होणें जें, आपलेंपण. परि–परी. किर्तिते–कीर्तीतें. (कीर्ति = यश, लौकिक)–(२०९). अनयसें–अनायासें. अनकळित ( = अक्लेश, सहज, अनायासें). जीवित जोडिलें–जोडिली ( = कीर्ति ) असें = तुला ही कीर्ति सहज मिळालेली आहे. अद्वितीये (अद्वितीय) = विनजोड, सर्वश्रेष्ठ ब्रह्म. जैसें गगन आहे = आकाश, (ग.) शून्य जसें आहे. [ गगनसद् = देव. गगन(ने)चर = पक्षी, आकाशस्थ ज्योति, राशिचक्र ]–(२१०). निःसिम (निस्सीम) किर्ति = अतिशय, अमर्याद यश. तुझां ठाईं निरोपम (–निरूपम = तुलना–उपमारहित ) = तुलनारहित अशी तुजजवळ. तिहिं लोकिं गुण ( = मूळधर्म, आवृत्ति, श्रेष्ठत्व, आधिक्य–दिव्याची वात) उत्तम तुझे = तुझे गुण तिहीं लोकीं उत्तम–सर्वात चांगले–श्रेष्ठ–(२११).

दिगांतींचे–दिगंतीचे भूपति. [ दिगंत = दिशेच्या टोंकावरचा प्रदेश, क्षितिज (जग, दिग्चक्र) (दिश् + अंत), दिगंतर (दिश् + अंतर) = जागा, प्रदेश, दूरचा प्रदेश. दिश + (आंत) आंतर = आशय, वृत्तांत. दिगंतरीचे = देशांतरीचे, आकाश–प्रदेशसीमा, दिग्विभाग = दिशा, प्रांत. ] भाट = स्तुतिव्रतच स्तुतिपाठक होऊनि वाखाणिति. दचकति = भितात. कृतांतादिक = यमादिक. कृतांत = यम, दैव, शनि. (कृतात्मा = जितेंद्रिय, शुद्धचित्ताचा ). [ दिगांतीचे = दिगांतु, पाहुणा आगंतुक, घुसडलेला पाठ. ( दिश् + आगंतु ) बाह्य, वाट चुकलेला, यदृच्छागत आलेला. दिगंतींचे = देशांतरीचे–(दिग् + आंत) = क्षितिजाचे पलीकडील प्रांतीं. दिश् + अंत = दिगंत. दिशा = दिशः ककुभः काष्टाः आशाः हरितः इति ५ दिशाम् । ]–(२१२). (ऐक) यैसी महिमा ( = माहात्म्य, उत्कर्ष, उत्कृष्टपणा) घनवट ( = गहन). घन = मेघ, दाट, हातोडा. गंगा जैसी (तैसी) चोखवट ( = चांगली, निर्मळ, चोख). व्हांट–वांट( = तटस्थ, स्तब्ध, चकित) जाले–जाहले–(२१३).

ते म्हणत आहेत-अहो अर्जुना, तो तर परत माघारीं गेला, अर्जुन आम्हांला भ्यायला-असा त्याचा उरलेला बोल तो काय खरा नच होईल काय?-(२०८)

महत् सायास करून लोक आपली जीवितें वेंचतात-पण हे धनुर्धरा, ते आपल्या कीर्तीस, यशास, कृपेस, तेजास वाढवितात- (२०९)

ते यश, कीर्ति, कृपा अनायासेंच कीं, क्लेशाशिवायच कीं, जोडिली आहे-लाभली आहे; बिनजोड एकटें सर्वश्रेष्ठ ब्रह्म अद्वितीयतेचे तें-जसें गगन तसें कीं.... (२१०)

तैसी कीर्ति (सीमेचें पूर्ण उल्लंघन जेथें) निस्सीम, निरूपम, अशी तुझ्या ठायींची-तुझे गुण तिन्हीं लोकीं उत्तम-(२११)

दिगंतीचे भूपति भाट होऊन वाखाणिती-जें एकिल्यास कृतांत आदिकरून सर्व दचकतात....(२१२)

ऐक कीं-अशी घनवट गहन महिमा, गंगा तशी चोखट निर्मळ, जिच्या देखीनें सुभट योद्धे जगीं वांट चकीत, स्तब्ध-(२१३)

**ते पौरुष तुझें अद्भुत । आईकोनियां हे समस्त ।**
**जाले असती विरक्त । जीवीतेंसि ॥ २१४ ॥**

**जैसे सिंहाचिया हांका । युगांत होये मदमुखा ।**
**तैसा कौरवां असेखा । धाक तुझा ॥ २१५ ॥**

**जैसे पर्वत वज्रातें । नातरि सर्प गरुडातें ।**
**तैसे अर्जुना हे तूंतें । मानिति सदा ॥ २१६ ॥**

**तें अगाधपण जाईल । मग हिणावो अंगा येईल ।**
**जरि माघौता निगसिल । न जुंझता ॥ २१७ ॥**

**आणि हे पळतां पळों नेदिति । धरूनि अवकळा करिति ।**
**न गणित कुटी बोलति । आइकतां तुज ॥ २१८ ॥**

**मग ते वेळें हियें फुटावें । आतां लाठेपणें कां न जुंझावें ।**
**हें जिंतिले तरि भोगावें । पृथ्वीतळ ॥ २१९ ॥**

पौरुष (पौरुष्य)=शौर्य, उद्योग, पराक्रम. अद्भुत् = आश्चर्यकारक, चमत्कारिक, एक रस. समस्त (=मस्त = डोकें, शिखर) अशेष, सर्व, सकल, समग्र्, विश्व. जीवितेंसी = जीवंत केलेलेपणासहित = जीवनासहित. विरक्त = वैराग्ययुक्त, उदासीन, निस्पृह (निराश)-(२१४). सिंहाचिया हांका = सिंहाची हांक. मदमुखा युगांत होये=उन्मत्त मत्त हत्तीला प्रलयकाळ. तसा असेखा (अशेखा) कौरवां धाक तुझा = कौरवां सर्वांना तुझा धाक-(२१५). वज्र=पविः, स्वरुः, शम्बः, दम्भोलिः. पर्वत=अद्रिः, गोत्रः, गिरिः, ग्रावा, अचलः, शैलः. गरुड = सुपर्ण, खगेश्वर, तार्क्ष्य. सर्प = अहिः, व्यालः, कुण्डली, फणी, पन्नगः, उरगः. अर्जुना हे तूंतें (अर्जुनातें हे कौरव) = कौरव अर्जुनास (मानतात). सदा मानिति=मान देतात -(२१६). अगाधपण = गंभीरता. जाईल = नाहीशी होईल. हिणावो = हीनत्व, कमीपणा, नीचपणा. अंगा येईल=अंगीं लागेल. जरि न जुंझता माघौता निगसिल = नच लढतां पाठ दाखविशील-(२१७). पळतां पळों नेदिति=पळूं लागलास तर नच पळूं देतील. धरूनि अवकळा(= फजिती) करिति. आइकतां तुज न गणित कुटी = (निंदा, अपवादात्मक वाईट गोष्टी) बोलतील-(२१८). ते वेळें हियें (=हृदय) फुटावें. आतां लाठेपणें (= शूरपणानें, शौर्यानें) कां न जुंझावें. जिंतिले तरि भोगावें पृथ्वीतळ (महीतळ, पृथ्वीचें राज्य)-(२१९).

तुझें तें अद्‌भुत पौरुष ऐकून, समस्त हे जीवीतेंसी अति विरक्त झाले आहेत–(२१४)

सिंहाच्या हाकांनीं मत्त हत्तीला–युगाचा अंत होत आहे–युगांत वाटतो, तसा अशेष सर्वहि कौरवांना तुझा धाक आहे–(२१५)

पर्वत वज्रास, सर्प गरुडास, तसे हे तुजला अर्जुना, सदा मानतात–(२१६)

असलें तें मोठेपण जाईल व मग हीनत्वच एक अंगास येईल की–जरी का न झुंजतांच माघारीं परत निघसील, फिरशील तर.... (२१७)

आणि आतां तर हे तुज पळतां पळो नेदितील, तुज धरून तुझी फजिती करितील, अगणित अशी बोलणीं तीं वाईट गोष्टींचीं–निंदेची तीं बोलतील–तुज (परत जाणे) तुझें तें ऐकिल्यास–(२१८)

मग तेव्हां जें हृदयानें फुटावें, त्यापेक्षां आतांच कीं शौर्यानें–लाठेपणानें–का बरें नच झुंजावें तें!–झुंज जिंकल्यास सर्व महीतळहि भोगावें–उपभोगावें असें होईल–(२१९)

**हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्।**
**तस्मादुत्तिष्ठ कौन्तेय युद्धाय कृतनिश्चयः ॥ ३७ ॥**

[कौन्तेय = कुंतीपुत्रा, पार्था. वा हतः प्राप्स्यसि स्वर्गं = युद्धांत मेलास तर स्वर्गाला जाशील. वा जित्वा महीम् भोक्ष्यसे = अथवा जय मिळाला तर पृथ्वीचें राज्य भोगशील. कृतनिश्चयः युद्धाय उत्तिष्ठ = दृढ निश्चयानें युद्धाला उभा हो–(तुला पापाची भीति नाहीं–कारण.... ३८ श्लोक पाहा)–]

**अन्वय :** कौन्तेय। प्राप्स्यसि स्वर्गम् हतः वा। भोक्ष्यसे महीम् जित्वा वा। तस्मात। कृतनिश्चयः। उत्तिष्ठ युद्धाय।

**अर्थ :** हे कुंतिपुत्रा पार्था, स्वर्गी जाशील युद्धांत मरण पावलास तर–पृथ्वीतल भोगशील युद्धांत जिंकलेस तर–करितां दृढ निश्चय करून उभा हो ... युद्धास– (३७).

**नातरि रणिं येथ। जुंझता वेंचिलें जीवित।**
**तरि स्वर्गसुख अनकळित। पावसिल ॥ २२० ॥**

**म्हणोनि यीयें गोठि। विचार न करि किरीटि।**
**आतां धनुष्य घेउनि उठीं। जुंझे वेगा ॥ २२१ ॥**

**देखें स्वधर्म (हा) आचरतां। दोष नाशे असता।**
**तुज भ्रांति हे कवण चित्ता। येथें पातकांचि ॥ २२२ ॥**

**सांगे प्लवेंचि काये बुडिजे। किं मार्गे जातां अडखळीजे।**
**परि विपायें चालों नेणिजे। तरि तेंही घडे ॥ २२३ ॥**

**अमृतें तरीच मरिजे। जरि विषसीं सेविजे।**
**स्वधर्में दोष पाविजें। हेतुकपणें ॥ २२४ ॥**

**म्हणौनि तुज पार्था। हेतु सांडूनि सर्वथा।**
**तुज क्षात्रवृत्ती जुंझतां। पाप नाहीं ॥ २२५ ॥**

रणिं जुंझता जीवित वेंचिलें = कामास आलें, खर्चले गेलें. अनकळित = उपद्रवरहित असें स्वर्गसुख पावसिल = स्वर्गाचें सौख्य पावता होशील–(२२०). यीयें गोठि विचार न करि = ह्या गोष्टीचा मुळींच विचार करूं नकोस. किरीटि = अर्जुना. धनुष्य घेउनि उठीं वेगा जुंझे = हातीं धनुष्य घेऊन ऊठ व वेगानें लढण्याचें

कर (२२१). स्वधर्म आचरतां (असतां)=असलेला मूळचा. दोष नाशे=स्वधर्मयज्ञ आचरल्यानें दोष नाहींसा होतो. चित्ता तुज पातकाची भ्रांति कवण हे=कसली ही संभ्रम-भ्रांति तुजला पापाची ती-(२२२). प्लवेंचि ( =नौकेनें) काय बुडिजे=नावेनें काय बुडावें होतें? मार्गे जातां अडखळीजे=सरळ मार्गानें गेलें तर काय अडखळणें होईल? आपटणें होईल? ठेंच लागणें होईल?-परि विपायें चालो नेणिजे तरि तेंही घडे=पण कदाचित् चालणें कसें ते नच जाणेल, तर तेंहि घडणें शक्य आहे (२२३). अमृतें मरिजे तरीच जरि विषसी सेविजे = अमृतसेवन मरणास कारण होईल केव्हां तर जर का तें विषासह सेविलें तर. जो हेतुकपणें=फलाशापूर्वक कर्म केल्यानें-सकामतेनें, फलाच्या हेतूवर-फलाच्या आशेमुळें कर्म केल्यानें स्वधर्मे दोष पाविजे=स्वधर्मींहि दोष, पाप पावणें होतें-(२२४) पार्था तुज हेतु सांडूनि ( = निर्हेतुक बुद्धि ठेवून ) क्षात्रवृत्ती ( = क्षत्रियधर्मानें) जुंझतां सर्वथा पाप नाहीं = हे पार्था, फलाशा सोडून क्षत्रियधर्मानें युद्ध केल्यास सर्वथा केव्हांहि पाप, दोष नाहीं (२२५).

अथवा येथे ह्या रणामध्यें जुंझतां जीवित जरी वेंचलें गेलें-खर्च झालें-तरी अनायासें (अनकळित) आशा क्लेशरहित अशा स्वर्गसुखास पावशील-(२२०)

म्हणून ह्या गोष्टीचा विचार करीत बसूं नको. आतां धनुष्य घेऊन वेगानें झुंजण्याचें कर-उभा हो-ऊठ-खडा हो-(२२१)

जाण की हा स्वधर्म आचरत असतां, असता दोष नाशे, नाहींसा होतो-तुला कसली ती चंचलता, चूक, भूल, भ्रांती ह्या पातका-पापासंबंधींची ती-(२२२)

साग की, प्लवे म्हणजे नावेनें बुडविणें होईल काय?-अथवा रस्त्यानें गेलें तर अडखळणें होईल काय?-पण चालणें कसें ते माहीत नाही तर मात्र कदाचित् तसें होईल-तसें घडेल-(२२३)

अमृतानें तरीच मरणें होईल जरी का विषाबरोबर सेविलें तर-तसा उद्देशानें, हेतूकपणें, फलाशापूर्वक स्वधर्मी ह्या कर्म केल्यानें दोष पाविजे-(२२४)

म्हणून हे पार्था-सर्वथैव उद्देश हेतु सोडून, सांडून, क्षात्रवृत्तीनें झुंजल्यास तुजला पाप लागणार नाही-(२२५)

**सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ ।**
**ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि ॥ ३८ ॥**

[सुखदुःखे = सुखदुःख. समे कृत्वा = सारखीं समजून-इंद्रियगुणांमुळें होणारीं-तेथें विकारवशतेमुळें रागद्वेष, लोभ, मोह, (कामक्रोध) इत्यादि हीं द्वंद्वे तींत नच फसतां-ते सारखे समजून. समौ लाभालाभौ = लाभ व हानी. समौ जयाजयौ=जय व अपजय. ततः =नंतरच. युज्यस्व युद्धाय=युद्धाला का युद्धाला सिद्ध हो. एवम्=समचित्तामुळें. पापम् न अवाप्स्यसि = पाप लागणार नाही-पापस्पर्श होणार नाही-(कर्तव्य विकाररहित समब्रह्म समदृष्टि ठेवून केल्यानें पाप लागणार नाही) (समः, तुल्यः, सदृक्षः, सदृशः, सदृक्, साधारणः, समान इति ७ समातरस्य।)]

**अन्वय :** समे कृत्वा सुखदुःखे। समौ कृत्वा लाभालाभौ। समौ कृत्वा जयाजयौ। ततः। युज्यस्व युद्धाय। एवम्। न अवाप्स्यसि पापम्।

**अर्थ:** सुखदुःखें सारखी समजून, लाभ अलाभ-हानी सारखीं करून, जय अपजय हीं दोन्हीं सारखींच समजून, (ततः) तदनंतर युद्ध करण्यास उभा (रहा) हो, तसा सिद्ध झालास तर (एवं) [या प्रकारच्या ब्रह्म समचित्तानें-समदृष्टि ठेवून-काम-क्रोध-राग-द्वेषाचे विकारवश न होतां युद्ध करशील] तला पाप लागणार नाहीं -तेथें पापाचा स्पर्शही होणार नाहीं-(३८).

**सुखीं संतोषा न यावें । दुःखीं विषादा (नवजावे) न भजावें ।**
**आणि लाभालाभ न धरावे । मनामाजीं ॥ २२६ ॥**

**येथ विजयेपण होईल । कां सर्वथा देह जाईल ।**
**हें आधिंची कांहिं पुढिल । चिंतावे ना ॥ २२७ ॥**

**आतां आपणयां उचिता । स्वधर्मातेचि राहाटतां ।**
**जें पावे तें निवांता । साहोनि जावें ॥ २२८ ॥**

**ऐसिया मनें होआवें । तरि दोष न घडे स्वभावें ।**
**म्हणउनि आतां जुंझावें । निभ्रांत तुवां ॥ २२९ ॥**

सुखीं संतोषा न यावें = (सुखदुःखद्वंद्व-सहिष्णुता) सुखी सुख झालें तरी संतोषास येऊं नये–सुख देणाऱ्या आनंदानें खूष होऊं नये–तृप्तता मानूं नये. दुःखीं विषादा न भजावें = कष्टामुळें दुःखामुळें अनुत्साह–शोक-खेद मानूं नये, विषादास मनोभंगास–मानभंगास (नवजावे) न भजावें. लाभालाभ न धरावे मनामाजीं = लाभ–प्राप्ति, अलाभ-अप्राप्ति–नुकसान, मनीं धरूं नयेत–प्राप्ति नुकसानाला–त्यांना महत्त्व देऊं नये (२२६). येथ (एथ) = रणांगणीं. विजयेपण होईल का सर्वथा देह जाईल = विजय होईल अथवा देह सर्वथैव जाईल. हें पुढिल आधिंची कांहिं चिंतावे ना ( = चिंतूं नये) = हें पुढें जें कांहीं होणारें तें अगोदर चिंतूं नये–विचारास घेऊं नये (२२७). आपणयां = आपल्याला. उचिता (स्वधर्मि) स्वधर्मातेचि राहाटतां = व्यवहारांत वागत असतां. जें पावे तें निवांता ( = निमूटपणे, मुकाट्यानें, स्वस्थपणानें) साहोनि जावें = जें पावेल–मिळेल तें साहावें–(२२८). ऐसिया मनें होआवें = अशा दृढ–स्थिर मनानें असावें; मनाचें व्हावें. तरि दोष न घडे स्वभावें = तेथें सहज मग नच अपराध, चूक का दोष घडेल. म्हणउनि (म्हणोनि) आतां झुंजावे निभ्रांत तुवां = म्हणून आतां तुवां भ्रमाचें नच होतां–भ्रांत न होतां–निःशंकपणें झुंजण्याचें करावेंस–(२२९).

**सुखदुःखद्वंद्व-सहिष्णुता** (२२६–२२९)—

सुखीं सुख झालें असता संतोषास येऊं नये; दुःखी दुःख झालें असतां विषादास (नवजावे) न भजावें व लाभ अलाभ हीं मनीं–मनामध्यें धरूं नयेत. (२२६)

येथें विजयपण होईल का देहच हा सर्वथैव जाईल हें पुढील कांहींहि अगोदर चिंतूं नये. (२२७)

आपणांस उचित–योग्य अशा स्वधर्मानें राहाटतां, वर्ततां जें जें कांहीं पावेल–मिळेल तें मुकाट्यानें, निवांतपणें, स्वस्थपणानें साहून असावें–साहून जावें. (२२८)

ऐसिया मनाचें व्हावें–अशा मनानें असावें-तरी स्वभावेंकरूनच कीं दोष न घडेल (न लागेल) म्हणून आतां निभ्रांतपणेंच कीं तुवां जुंझण्याचें करावेंच करावें–(२२९)

**एषा तेऽभिहिता सांख्ये बुद्धिर्योगे त्विमां शृणु ।**
**बुद्ध्या युक्तो यया पार्थ कर्मबन्धं प्रहास्यसि ॥ ३९ ॥**

[ [एषा = इच्छा (स वा एष श्रुतिः)] ते ( = तुला) = ही ज्ञानयोगाची इच्छा तुला. अभिहिता = ठरविलेली, बांधलेली, वर ठेविलेली, सांगितली, बोललेली, भाषण, संबोधिलेला. सांख्ये = ज्ञानयोगामधील बुद्धि बुद्धि = ज्ञान, विचार, अंतःकरणशक्ति. बुद्धिमत् = शहाणा. सांख्य = सांख्ययोग. योग = भेटणें, ऐक्य; जीवात्मा व परमात्मा यांचा संयोग; ध्यान, चित्तानुरोध, कपट, परिणाम. तु इमाम् = परंतु आतां पुढें जी सांगणार आहे ती बुद्धि. शृणु = ऐक. बुद्ध्या युक्तः = बुद्धीनें, बुद्धि ज्ञानानें संपन्न झाल्यावर. यया = ह्या बुद्धीनें. पार्थ = अर्जुना. कर्मबन्ध = कर्मामुळें पुनर्जन्म होणें. कर्म हाच बंध, बंधन, देह, ठेव, करार,

म्हणजे अडथळा किंवा विघ्न. बन्ध्=बांधणें. अभिहित=नांव, शब्द, भाषण अभिहित्व=विधान, आधार, प्रमाण. अभिहित अन्वयवाद=शब्दांना स्वतंत्र अर्थ असतो व शब्दांचे स्वतंत्र अर्थ केल्यावर वाक्याचा अर्थ होतो असें नैयायिकांचें मत. प्रहास्यसि=टाकशील, वगळणें, नाकारणें, सोडणें, (फेंकणें, नष्ट होणें) [हा (ओहाक्)+प्र]. प्रहस् = उपहास, थट्टा, टर उडविणें, हंसणें, ताण करणें, थट्टा करणें. प्रहास् = मोठ्यानें हंसणें, विकास. प्रहसन्=थट्टा, व्यंगोक्ति, हास्यरसप्रधान रूपक.]

**अन्वय :** सांख्ये बुद्धि। एषा। ते अभिहिता। तु। योगे। इमाम् शृणु। पार्थ। यया बुद्धया युक्तः। कर्मबन्धं। प्रहास्यसि।

**अर्थ :** आतांपर्यंत इच्छा तुला सांख्यबुद्धीची सांगितली : पण आतां ही योगबुद्धी ऐक : पार्था, ह्या बुद्धीनें तूं युक्त म्हणजे संपन्न झालास तर कर्मबंध–कर्मामुळें पुनर्जन्म होणें जें–तो फेंकून देशील–कर्मबंध तुझा नष्ट होईल (३९).

**हे सांख्यस्थिति संकळित। सांगितली तुज येथ।**
**आतां बुद्धियोग निश्चित। अवधारीं पां॥ २३०॥**

**जया बुद्धियुक्तता। जालिया पार्था।**
**कर्मबंध सर्वथा। बाधूं न पावे॥ २३१॥**

**जैसें वज्रकवच लेइजे। मग शस्त्रांचा वर्षाव साहिजे।**
**परी जेतेंसीं उरिजे। अचुंबित॥ २३२॥**

सांख्यस्थिति=ज्ञानयोग=ज्ञानाच्या द्वारें ब्रह्मप्राप्ति करून घेण्याचा उपाय. मुकुलित=संक्षिप्त=मुकुलांनी युक्त, अर्धे मिटलेलें, संकुचित. मुकुल=किंचित उमललेली फुलांची कळी; आत्मा, देह. मुकुली कृ=मिटणें. बुद्धियोग निश्चित (=ठरविलेला, निर्धाराचा) निष्काम कर्मयोग आचरण्यास अवश्य लागणारी बुद्धि–(पाहा–अ. १०, श्लोक १०, ओवी १३०)–बुद्धियोगिविस्तृत (पा. भे.) (२३०). जया–जिया बुद्धियुक्तता (=समबंध–ब्रह्मबुद्धि) जालिया=निःसंग कर्मानुष्ठानज्ञानसंपन्न बुद्धियोग–प्राप्त झाल्यास. कर्मबंध बाधूं न पावे सर्वथा=कर्मामुळें जन्मणें मरणेंरूपी बंध सर्वथैव बाधा करणारा होणार नाहीं (२३१). वज्रकवच(=वज्राचें चिलखत) (लेइजे) शस्त्रांचा वर्षाव (=वृष्टि) साहिजे (=सहज सहन केला होतो). वज्र=(१) स्वरु, पवि, अशनि इति। (२) सी हुण्डः, वज्रः, स्नुक्, स्नुही, गुडा, समन्तदुग्धा इति ६ वज्रद्रुमस्य। (शेरनिवडुंग) (३) हीरके मणिभेदे पवौ भिदुरे च वज्रः। (४) वज्रम् कुलिशम्। (इंद्राचें वज्र, कुऱ्हाड). तनुत्रम्, वर्म, दंशनम्, उरश्छदः, कङ्कटकः, जगरः, कवचः इति ७ कवचस्य।. परी जेतेंसीं (=जेतृत्व, जय::९–२१७) उरिजे अचुंबित=अतर्क्यतेनें जयरूप उरावें–विजयी व्हावें–(२३२).

## ज्ञानमार्ग (९१–२२९) : कर्ममार्ग (२३०–२४१)

अशी ही इथें तुजला संक्षिप्तपणें सांगितलेली ज्ञानयोगाची स्थिति होय–आतां यावर निश्चितपणाचा असा बुद्धियोग तो ऐकण्याचें कर–(२३०)

ज्या बुद्धियुक्ततेचें होणें झालें असतां हे पार्था, कर्मबंध तो केव्हांहि सर्वथैव नच बाधा करणारा, बांधणारा कीं–बाधा पावणारा–(२३१)

जसें अभंग चिलखत–वज्रकवच अंगीं चढवावें, त्यावें व मगच शस्त्रांचा वर्षाव साहावा, सहन करावा–वरी जयच कीं, जेतृत्वच कीं, एक अचुंबित–घाय न लागतां असें उरावेंच कीं–(२३२)

**नेहाभिक्रमनाशोऽस्ति प्रत्यवायो न विद्यते ।**
**स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात् ॥ ४० ॥**

[इह = येथें आतां, ह्या कर्मयोगांत, ह्या लोकांत. अभिक्रम = आरंभ केलेल्या कर्माचा, आरंभलेल्या कृत्याचा. नाशः = निष्फलत्व, ध्वंस, मरण, पळून जाणें जें. अस्ति न = होत नाहीं. प्रत्यवाय = नाहींसें होणें, पाप, गोंधळ, नुकसान, अडथळा विरुद्धाचरण, दोष, आशाभंग. विघ्न, वैगुण्य, दोष, कष्ट, प्रयास. (विघ्न। ईष। नायक। नाशन। राज। = गणपति. विघ्न = वाहन, उंदिर. ईष = कांता, दूर्वा) न विद्यते = प्राप्त होत नाहीं, असत नाहीं. जाणणें नाहीं स्वल्पम् अपि = थोडेंसे जरी, फार थोडें जरी. अस्य धर्मस्य = ईश्वर उपासना, निष्काम विहित कर्मरूपी धर्माचे. त्रायते = (त्रै) - संरक्षण करते. महतः भयात् = फार मोठ्या भयापासून-मोठ्या भीति-अरिष्टा-पासून ]

**अन्वय :** इह न अस्ति अभिक्रमनाशः। इह प्रत्यवायः न विद्यते। अपि स्वल्पम्। अस्य धर्मस्य। महतः भयात्। त्रायते।

**अर्थ :** ह्या लोकीं येथं आता आरंभलेलें कृत्य (कर्म) त्याचा नाश (निष्फलत्व) होत नाहीं– ह्या लोकीं येथें आतां विरुद्धाचरण, आशाभंग, दोष, इत्यादी जाणणे नाहीं; थोडेसेंहि जरी आचरण ह्या विहित कर्मरूपी धर्माचें, तें मोठ्या भयापासून अनुष्ठान करणाऱ्याचें, कर्त्याचें रक्षण करतें (४०)

**तैसें अहिक तरि न नाशे। आमोक्ष तो उरला असे।**
**जेथ पूर्वानुक्रम दिसे। चोखाळतु ॥ २३३ ॥**

**कर्माधारें राहाटिजे। परि कर्मफळ न निरिक्षिजे।**
**जैसा मन्त्रज्ञा न (मन्त्रज्ञानें न) बाधिजे। भूत बाधा ॥ २३४ ॥**

**तयापरि जे सुबुद्धि। आपुलालिया निरवधि।**
**हा असताचि उपाधि। आकळूं न शके ॥ २३५ ॥**

**जेथें न संचरे पुण्यपाप। जें सूक्ष्म अति निष्कंप।**
**गुणत्रयादि लेप। न लगति जेथ ॥ २३६ ॥**

**अर्जुना ते पुण्यवशें। जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे।**
**तरी अशेष हे नाशे। संसारभय ॥ २३७ ॥**

ऐहिक न नाशे-नशे = ह्या लोकींचें सुरु असलेलें ऐहिक, इहलोकसंबंधीचें तें प्रपंच नासत नाहीं. मोक्ष उरला असे = मोक्ष राखून ठेविला आहे, जसें का–असा शिलकीचा. पूर्वानुक्रम चोखाळतु जेथ दिसे = तेथें पहिल्या पूर्वकर्माचा क्रम स्पष्ट दिसतो. ह्या बुद्धियोगात पूर्वानुक्रम म्हणजे सांख्ययोग स्पष्ट दिसतो (२३३). कर्माधारें राहाटिजे = कर्माच्या आधारानें वर्तावें. परि कर्मफळ न निरिक्षिजे = कर्मापासून होणाऱ्या फळाला न पाहावें जैसा मन्त्रज्ञा न (मन्त्रज्ञानें न)–मंत्रज्ञ–भूतबाधा न बाधिजे = मंत्र जाणणारा पंचाक्षरी–देवऋषी–भूतबाधा पावत नाहीं जसा–(२३४). तयापरि सुबुद्धि (= सीमेचा परमात्माच जी) आपु (= प्राप्त) जालिया निरवधि (= निःशेष) = सुबुद्धि उपाधीस आवरून धरते–ती उपाधि वरचढ होत नाहीं. हा उपाधि (= धर्मविचार, पदवी, लबाडी) असताचि आकळूं न शके = जाणणें नाहीं–असलेली आटोपणें नाहीं, उपाधि आटोपली होत नाहीं–ही उपाधि अडवणारी होत नाहीं–(२३५).

जेथें पुण्यपाप न संचरे (= शिरत नाहीं) = जेथें पुण्य अथवा पाप लागत नाहीं. जे निष्कंप = निश्चल) अतिसूक्ष्म = जें अतिसूक्ष्म असून निश्चल आहे. गुणत्रयादि लेप (= चित्तांतील आकृति) न

लगति जेथ ( =लागत नाहींत) = जेथें तिन्ही गुणांचा लेप मुळींच लागत नाहीं (२३६). पुण्यवशें ( =पुण्याईनें ) ते ( =सुबुद्धि, आत्मज्ञान, ईश्वरप्रसाद-प्राप्ति ) जरी अल्पचि हृदयीं बुद्धि प्रकाशे = थोडेंसें जरी हृदयामध्यें बुद्धीनें प्रकाशलें तरी. तरी अशेष हे नाशे संसारभय [ = (सां) विश्व, ऐहिक जीवित, जन्ममरण प्रवाह ] भय ( =भीति, संकट ) = अशेष सर्व संसारभय नाहींसें होतें, नासतें. (संसारगुरु = मदन, जगद्गुरु. संसारमार्ग = योनि )-(२३७).

तसें ह्या लोकींचें ऐहिक सुरु जें तें नाश पावत नाहीं; वर मोक्ष तो राखून ठेविलेला आहेच; तेथें पूर्वकर्माचा क्रम स्पष्ट दिसत आहे-(२३३)

कर्माच्या आधारानें राहाटावें, वर्तावें, पण कर्मफळ पाहूं नये-जसा, पंचाक्षरी जो-भूतबाधा त्यास बाधा करीत नाहीं-(२३४)

त्या परीनें जी सुबुद्धि प्राप्त झाली तर त्वरित हा असलेला उपाधि त्यास आकळूं शकत नाहीं-(२३५)

जेथें पुण्यपाप संचरत नाहीं, जें सूक्ष्म व अति निष्कंप, जेथें गुणत्रय लेप न लगति-(२३६)

अर्जुना, ते पुण्यवशेंकरून जरी का अल्प असेंच हृदयाच्या ठिकाणीं बुद्धि ती प्रकाशील, तर अशेषही सर्वमयात्मक संसारभय तें नासेल-(२३७)

**व्यवसायात्मिका बुद्धिरेकेह कुरुनन्दन ।**
**बहुशाखा ह्यनन्ताश्च बुद्धयोऽव्यवसायिनाम् ॥ ४१ ॥**

[ कुरुनन्दन = कौरवकुल उपन्न अर्जुना. व्यवसायात्मिका = निश्चयाचें बळ असलेली [ व्यवसाय = युक्ति, बढाई, उद्योग, निश्चय, करामत, अनुष्ठान, कृत्य, वर्तन, धंदा, व्यापार. व्यवसायीन् = क्रियावान् , आचरणारा, दृढनिश्चयी, उद्योगी, तत्पर, ( तत्पर, प्रसितः, आसक्तः-इति ३ तत्परस्य । ) आत्मिका = स्वकीया. आत्मकीय = ( आत्मीय ) = स्वतःचेसंबंधीं, स्वाधीन, जीवंत ]. बुद्धि = योगबुद्धि, अवश्य लागणारी बुद्धि. (बुद्धि = जाणणें, मति, ज्ञानशक्ति, विवेक, विचार, कल्पना, समजूत, जाणीव, हेतु, युक्ति, उपाय, (वे.) निश्चयरूप अंतःकरण-वृत्ति ). एका = ही मात्र प्रमाणभूत एक. इह = ह्या लोकीं. बहुशाखा = अनेक फांटे फुटलेल्या. बहु = पुष्कळ, मोठा, अतिशय. शाखा = खांदी, बाहु, भाग, रेखा, पक्ष, तट, पारंबी, वेदाचा पोटभाग. हि = अशा. अनंता = अनंत असतात; अंतरहित, आकाश, अनंतत्व, मोक्ष, परब्रह्म, निस्सीम, अपार. अनंती = स्त्रियांचे डावे हातांत बांधण्याची रेशमी दोरी. च = आणि. बुद्धयः = बुद्धि. अव्यवसायिनाम् = ज्यांचा निश्चयी स्वभाव नाहीं अशा अविवेकियांच्या.]

**अन्वयः** कुरुनन्दन इह व्यवसायात्मिका बुद्धि एका (प्रमाणभूता) अव्यवसायिनाम् च बुद्धयः बहुशाखा अनन्ता हि ।

**अर्थ :** हे कौरवकुल उत्पन्न अर्जुना, ह्या लोकीं (ह्या निष्काम कर्मयोगामध्यें) स्वकीया अशी आत्मिका -निश्चयाचें बळ असलेली योगबुद्धि-( व्यवसाया आत्मिका ) निश्चयरूप अंतकरणवृत्ति हीच मात्र एक प्रमाणभूता आहे; आणि अव्यवसायिन् जे-ज्यांचा निश्चयी, निर्णयी स्वभाव नाहीं-अशा अविचारी, भ्रमलेले जे त्या अविवेकियांच्या बुद्धि अनेकविध, अनेक फांटे फुटलेल्या अशा ( अनेकविध ) असून त्या अनंत असतात-(४१).

**जैसि दीपकळिका धाकुटि । परी बहु तेजातें प्रकटि ।**
**तैसि सद्‌बुद्धि हे थेंकुटी (धाकुटी) । म्हणो नये ॥ २३८ ॥**

**पार्था बहुतिं परि । हे अपेक्षिजे विचारशुरिं ।**
**जे दुर्लभ चराचरिं । सद्वासना ॥ २३९ ॥**

**आणिकासारिखा बहुवस। जैसा न जोडे परिस।**
**का अमृताचा लेश। दैवगुणें ॥ २४० ॥**

**तैसी दुर्लभ सद्बुद्धि। जीये परमात्माचि अवधी।**
**जैसा गंगेसि उदधि। निरंतर ॥ २४१ ॥**

**तैसी ईश्वरावांचुनि कांहिं। जीये आणिक लाणिं नाहिं।**
**ते येकिच बुद्धि पाहिं। अर्जुना जगीं (जनीं) ॥ २४२ ॥**

**येर ते दुर्मति। जे बहुधा असे विकरति।**
**जेथें निरंतर रमति। अविवेकिये ॥ २४३ ॥**

**म्हणौनि तया पार्था। स्वर्गसंसार नरकावस्था।**
**आत्मसुख सर्वेथा। दृष्ट नाहिं ॥ २४४ ॥**

दीपकळिका ( =कळी). दीप् = प्रकाशणें. दीप = दिवा, चित्रक वनस्पति (दीपः प्रदीपः इति दीपस्य।). दीपकलिका = दिव्याची ज्योत. कलिक = कळि, विण्याची खुंटी, शरपुंखा (व.), लांब पायाचा पक्षीविशेष. धाकुटि = धाकटी, लहान, अपुरे, नम्र. बहु–बहुता ( = पुष्कळ) तेजातें [कांती, बळ, वीर्य, प्रताप, उष्णता, तीक्ष्णता, सोनें, कीर्ति, अग्नि (पु.), चकाकी, उजेड.] प्रकटि ( =उदय पावणें, उघड दिसणें, दाखविणें) = प्रकाशाला व्यक्त करते, स्पष्ट करते. सत् = ब्रह्मवाचक शब्द; सत्य, चांगलें, खरें; स्थावरजंगम वस्तु; सजीव निर्जिव सृष्टि; पृथ्वी, आप, तेज, मूर्त, व्यक्त. थेंकुटी = अल्प, लहान, ठेंगणी (२३८). बहुतिं परि = फार, पुष्कळ, अनेक, बहुतप्रकारानें–रीतीनें. हे अपेक्षिजे (=इच्छावे) विचारशुरिं = वाट पाहाणें, इच्छा करणें जे विचार शूर पुरुषांनीं; श्रेष्ठ विचारी पुरुषांनीं प्रश्न करणे. (विचार = प्रश्न, कल्पना, विवेक). जे दुर्लभ ( = लाभणें कठीण) वासना = इच्छा, मनाची प्रवृत्ति, विस्तार, इच्छेचे निरनिराळे प्रकार (२३९).

आणिका (आणिक = आणि; दुसरे, इतर, निराळे, इतर दगडादिकाप्रमाणें) सारिखा बहुवस (=पुष्कळ) = पुष्कळ प्रकारें, अतिशय, फार. जैसा न जोडे (=मिळत नाहीं). परिस = लोखंडाचें सोनें करणारा काल्पनिक दगड. गुरूचें नातें दाखविणारे–लोहा परिसु उद्देशानें–१८–१६२८. का अमृताचा लेश ( = थेंब, अंश) दैवगुणें (=नशीबानें) (२४०). सद्बुद्धि दुर्लभ (=जोडणें, लाभणें कठीण). जीये परमात्माचि (=परम आत्माची = उत्तम, श्रेष्ठ, पवित्र परमात्मारूपी शिव). अवधी ( = वेळ, मर्यादा, शेवट, साहचर्य, निस्सीम, अफाट, अमर्याद, अधिक वेळ, पर्यवसान, सीमा). गंगेसि उदधि ( = समुद्र) निरंतर = नेहमी, सतत, निरंतर असणारा–(२४१). ईश्वरावांचुनि जीये ( =जिला) आणिक कांहि लाणि (=शेवट, मर्यादा, अखेरचें निवासस्थान. लाहाणें = आश्रयस्थान, लाभ) नाहि ते येकिच बुद्धि पाहिं अर्जुना जगी–(२४२). येर (=दुसरे जे स्वर्गादि सुख व भोग यांत निमग्न होणारी) ते दुर्मती ( = कठीण, वाईट, अनिष्ट मति) मति = बुद्धि, विचार, कल्पना. बहुधा असे विकरति ( = विकार पावणारी; क्षोभ होणें, पसरवणें, बदललेल्या रूपांत दिसणें, फोड करणें). जेथें (विकरत) निरंतर रमति अविवेकिये (=अविचारी) (२४३). तया पार्था स्वर्गसंसार नरकावस्था = स्वर्ग व संसार यांचे संदर्भ नरक प्रपंच पसारा विस्तार. (स्वर्ग संसारी आस्था : पा. भे.) नरक = यमलोकातील यातना भोगण्याचें स्थळ. अवस्था = स्थिति, आवड, जागृति, स्वप्न, अवस्था, तरुणी. आत्मसुख ( =स्वरूपानंद) सर्वेथा दृष्ट ( =दिसणारें, दिसलेलें, उघड, स्पष्ट). अदृष्ट = न दिसणारें, जन्मकर्म नशीब, परलोक. सुख सर्व विश्वांत असणाऱ्या चेतन तत्त्वाचें–जीवात्म्याचें, भूतमात्रांत असणारें चेतन तत्त्व त्याचें–आत्मानुभव आला नाहीं तोवर आत्मसुख नच दिसणारें (२४४).

दिव्याची ज्योत लहान, पण पुष्कळसें तेज प्रकट करते, तसी ही सद्बुद्धि थेकुटी-लहान-म्हणतां येत नाहीं-(२३८)

पार्था, बहुत प्रकारांनीं ही, विचारशूर जे त्यांनीं अपेक्षावी-जे का ह्या चराचरीं सद्वासना दुर्लभ कीं म्हणून-(२३९)

इतर पुष्कळ दगडासारखा जसा का परिस हा जोडला जात नाहीं, का अमृताचा लेश का होईना पण दैवगुणेंच कीं-(२४०)

—तशी सद्बुद्धि दुर्लभ जिचें पर्यवसान म्हणजे परमात्माच होणें जें, जशी गंगा निरंतर उदधीच म्हणावी ना !-(२४१)

—तैसें ईश्वराशिवाय दुसरें कांहीं आणीक परमसाध्य नाही, ती ही एकच बुद्धि अर्जुना, ह्या जगीं (जनीं) पाहा-(२४२)

दुर्मती—दुसरे दुर्मती ती, जी का अनेक प्रकारें विकार पावलेली, पावणारी दुर्बुद्धि (-विकर करणारी-), तेथेच अविवेकी नेहमींच्या नेहमीं रमतात-रमणारे होत-(२४३)

म्हणोनि हे पार्था, त्यांना स्वर्ग संसार नरक अवस्था असणाऱ्यांनीं-(आत्मसुख म्हणजे अनिष्टच एक असें मानणाऱ्यांनीं-) आत्मसुख तें केव्हांहि नच जाणलेलें का पाहिलेलें असें-(२४४)

**यामिमां पुष्पितां वाचं प्रवदन्त्यविपश्चितः ।**
**वेदवादरताः पार्थ नान्यदस्तीति वादिनः ॥ ४२ ॥**

[पार्थ=अर्जुना. याम्=ज्या. इमाम्=ह्या. पुष्पिताम्=फुललेल्या वृक्षाप्रमाणें मोहक-(पळस जसा सर्व पुष्पेंच). (पुष्पिता=विटाळशी). वाचम्=वाणीस. प्रवदन्ति = बोलतात, जाहीर करतात, सांगतात. अविपश्चितः = अल्पबुद्धीचे, फलाभिलाषी कर्मठ विपश्चितः = पंडित, विद्वान्, शहाणा,च्या उलट अविपश्चितः. (परोक्षविषया वै वेदाः =वेदाचा अर्थ बाहेरून दिसतो तसा नसतो). वेदवादरताः =वेदाच्या बाह्य शब्दार्थांमध्यें मग्न झालेले. न अन्यत् अस्ति = (भोग भोगण्यास) दुसरें साधन नाहीं. इति = असें. वादिनः = ठांसून सांगणारे-वाद करणारे पंडित.

**अन्वय :** पार्थ । याम् पुष्पितां वाचं इमाम् । अविपश्चितः प्रवदन्ति । अविपश्चितः-वेदवादरताः - न अन्यत् अस्ति इति वादिनः ।

**अर्थ :** हे पार्था, ज्या ह्या वेदवचनांच्या मोहक वाणीला कर्कठ बोलतात, बोलत असतात-ते म्हणतात, भोग भोगण्यास दुसरें साधन नाहीं-असे वाद करणारे पंडित स्वर्गप्राप्ति करून देणारे वेदच होत, असें म्हणतात-(४२).

[**निष्काम कर्मयोगामध्यें-व्यवसायात्मिक बुद्धि**—निश्चयाचें बळ असलेली योगबुद्धि हीच एक प्रमाणभूत आहे-परंतु ज्याचा निश्चयी स्वभाव नाहीं अशा अविवेकी पुरुषाच्या बुद्धि अनेक फांटे फुटलेल्या -त्याची कायमची अशी निश्चयात्मक एक बुद्धि-हेतु अनेकविध असल्यामुळें-नसते.]

आतां काम्य कर्मच एक-कर्माचें फलच अभिलाषपणें जें-तेथें ह्या काम्य कर्मावरच कीं स्वर्गप्राप्ति होणारी -कर्माचें फलच एक इच्छावें-अभिलाषाचें करावेंच, करणें जें तेथें-वेदवादरताः-वेदाच्या नुसत्या बाह्य शब्दार्थामध्येंच मग्न असणारे-असलेले आणि काम्य कर्माशिवाय स्वर्गप्राप्ति करून देणारे असे वेदांशिवाय दुसरें कोणतेंच का कांहींच साधन नाहीं असें ठांसून सांगणारे अल्पबुद्धीचे अविपश्चितः-फलाभिलाषी कर्मठ पुरुष-ते

हीं जीं वेदवचनें तीं मोठ्या मोहक म्हणजे पूर्ण विकसित अशा मनोहर वाणीनें–शब्द, भाषण, वचन, करारानें–एकाद्या फुलांनीं फुललेल्या वृक्षाप्रमाणें–तीं वेदवचनेंरूपी मोहक वाणी बोलत असतात. काम्य कर्मच एक महत्त्वाचें का कर्मफल अभिलाषणें हेंच मोठें साधन स्वर्गप्राप्तीचें असें त्यांचें निश्चयानें सांगणें–बोलणें तें–.

**वेदाधारें बोलती । केवळ कर्म प्रतिष्ठीति ।**
**परि कर्मफळीं आसक्ति । धरूनियां ॥ २४५ ॥**
**म्हणति संसारिं जन्मिजे । यज्ञादिक कर्म कीजे ।**
**मग स्वर्गसुख भोगीजे । मनोहर ॥ २४६ ॥**
**येथें हे वाचुनि कांहिं । आणिक सर्वथा सुखचि नाहिं ।**
**यैसें अर्जुना बोलति पाहिं । दुर्बुद्धि ते ॥ २४७ ॥**

वेदाधारें बोलती = श्रुतिज्ञान आश्रयस्थान याचे आधारानें बोलतात. केवळ कर्म प्रतिष्ठीति = कर्ममात्र, कर्मफक्त ख्यातीचें–गौरवाचें करतात–कर्मच एक निश्चित करतात. परि कर्मफळीं आसक्ति धरूनियां = कर्मफळाची आसक्ति–ती भोगेच्छाच एक फळाची करून–भोगेच्छा एक–तल्लीनतेनें व्हावी असें फळ मनीं धरतात–(२४५). म्हणति संसारिं जन्मिजे = प्रपंचामध्यें जन्मावें यज्ञादिक कर्म कीजे = यज्ञयागादिक कर्में करावींत. मग स्वर्गसुख भोगीजे मनोहर = मगच सुंदर, चित्ताकर्षक, मनाला हरण करणारें असें स्वर्गसुख भोगावें, देवलोकचे तें, पुण्यवंताचें तें, आनंददायक सुख दैव अनुभव घ्यावा–(२४६). ह्याच एका स्वर्गसुखावांचून येथें आणीक कांहीं सर्वथा सुख नाहीं–असें अर्जुना, दुर्बुद्धि ते बोलतात पाहा–(२४७).

वेदाचा आधार घेऊन बोलतात, (केवळ कर्म प्रतिष्ठीति) कर्मठपणाच स्थापितात, पण कर्मफळाचे ठायीं आसक्ति ठेवून–धरून कीं–(२४५)

ते म्हणतात, संसारीं जन्मावें, यज्ञ आदिकरून कर्म करावें, व मगच मनोहर असें स्वर्गसुख भोगावें....(२४६)

येथें ह्या स्वर्गसुखावांचून दुसरें कांहींहि आणीक सर्वथैव सुखच नाहीं असें हे अर्जुना, ते अविचारी–अज्ञान–दुर्बुद्धि पाहा बोलतात–(२४७)

**कामात्मानः स्वर्गपरा जन्मकर्मफलप्रदाम् ।**
**क्रियाविशेषबहुलां भोगैश्वर्यगतिं प्रति ॥ ४३ ॥**

[ काम आत्मनः = काम्य कर्म–अनेक मनोरथांमध्यें गढलेले. स्वर्गपरा = स्वर्गप्राप्ति हीच पुरुषार्थाची परमावधि मानणारे कर्मठ पुरुष जन्मकर्मफलप्रदाम् = उत्तम जन्मप्राप्ति होणें हेंच कर्माचें फल, अशा अर्थाचीं भाषणें करतात. क्रियाविशेषबहुलां = अनेक विशिष्ट यज्ञानुष्ठानें करावींत अशी भाषा ते बोलतात. भोगैश्वर्यगतिं प्रति = भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं–म्हणून–क्रिया = प्रायश्चित्त, अभ्यास करणें, समाप्ति. विशेष = असामान्य गुण, अधिक प्रकार. बहुला = दाट, पुष्कळ, कृष्ण पक्ष. ]

**अन्वय :** काम आत्मनः । स्वर्गपरा । जन्मकर्मफलप्रदाम् । क्रियाविशेषबहुलां । भोगैश्वर्यगतिं प्रति ।

**अर्थ :** मदन इच्छा भोगवस्तु तेथेंच मूळस्वभाव मनबुद्धि स्वतःस लावणारा-आत्मकामः = तेथेंच स्वतःचें हित पाहणारा–स्वर्ग (देवलोक) जो तेथेंच आसक्त, तेथेंच मोक्ष समजणारा, व हीच पुरुषार्थ परमावधि असा लंपट तल्लीन संसर्ग आसंग आसक्ति एका भोगेच्छेंतच कर्माचें फळ–कर्मफलप्रदाम् जन्म–कर्मफल तें उत्तम जन्म देणारें (दानच एक)–अशा अर्थाचीं बोलणीं– भाषणें करणारे, ज्यामध्यें अधिक प्रकार –विशेष क्रिया करणें–बहुला, पुष्कळ अशा क्रिया आहेत, असे अनुष्ठान यज्ञ, विशिष्ट यज्ञ व अनुष्ठानें करावींत, असें ते बोलतात–कशास तर भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं–(४३).

[ काम्य कर्म–काम आत्मनः –स्वर्गप्राप्ति हीच पुरुषार्थ परमावधि, उत्तम जन्मप्राप्ति हेंच कर्माचें फल–अशा अर्थाचीं भाषणें ते करितात–भोग व ऐश्वर्य यांच्या प्राप्तीसाठीं विशिष्ट यज्ञ अनुष्ठानें करावींत– ]

**देखें कामना अभीभूत । होउनि कर्म आचरत ।**
**ते केवळ भोगीं चित्त । देउनियां ॥ २४८ ॥**
**क्रियाविशेषें बहुतें । न लोपिति विधीतें ।**
**निपुण होउनि धर्मातें । अनुष्ठिती ॥ २४९ ॥**

देखे कामना = कामाच्या स्वाधीन सहेतूकपणें होऊन, अभीभूत होऊन, कर्म आचरीत, ते केवळ भोगी उपभोगामध्यें चित्त अंतःकरण देऊनियां–(२४८). क्रिया (= अभ्यास करणें, प्रायश्चित्त). विशेष (= असामान्य गुण). बहुतें (= विपुल) = अनेक प्रकारचीं विधीयुक्त अनुष्ठानें. विधीतें (= कर्तव्य प्रयोगादिकांना. विधि = (ब्रह्मदेव, क्रम, अनुष्ठान, नियम, उपाय) न लोपिति ( = टाळिती. लाप = संभाषण). निपुण (= पूर्ण, प्रवीण, कुशल) होऊनि धर्मातें ( = शास्त्रोक्त आचार, कर्तव्य, पुण्य ) अनुष्ठितात, आचरतात ( = कार्यारंभ सिद्धता, होम, जप, इत्यादि कर्में )– (२४९).

पाहा कीं, स्वर्गसुख भोगण्याच्या इच्छेला वश होऊन कर्में आचरतात जे, ते तर केवळ (उपभोगाच्या का भोगाच्या ठायींच ) भोगी चित्त देऊन कीं–(२४८)

विधिविधानाचा लोप न होऊं देतां–विधिपूर्वक अनेक प्रकारचीं सकाम कर्में निपुण–प्रवीण असे कर्मामध्यें कार्यारंभ सिद्धता होऊन जप, होम, इत्यादि कर्में करतात–(२४९)

**भोगैश्वर्यप्रसक्तानां तयापहृतचेतसाम् ।**
**व्यवसायात्मिका बुद्धिः समाधौ न विधीयते ॥ ४४ ॥**

[ भोगैश्वर्यप्रसक्तानाम् = भोग व ऐश्वर्य यांमध्यें विशेष दंग असलेले. तया अपहृत चेतसाम् = वेदवाणीनें चित्त मोहून गेलें त्यांना. व्यवसायात्मिका बुद्धि = निश्चयात्मक बुद्धि सांपडत नाहीं. समाधौ न विधीयते = ईश्वरपरायणतेच्या सेवा-नियम-उपायापर्यंत क्रमाची होत नाहीं–अंतःकरणांत पोहोंचत नाहीं–प्राप्त होत नाहीं. [ समाधा = ईश्वरपरायणता, निष्पत्ति (समाधान). समाधि = व्रत, मौन, चित्ताची एकाग्रता, शंकेचा परिहार फेडणें. विधी = अनुष्ठान, क्रम, नियम, उपाय, शास्त्र दैवाचीं होत नाहींत. जर वैराग्य स्थिर झालें तर–पण तसें वैराग्य स्थिर होतच नाहीं. ] ]

**अन्वयः** तया अपहृत चेतसाम् । भोग ऐश्वर्य प्रसक्तानाम् । समाधौ । व्यवसायात्मिका बुद्धि । न विधीयते ।

**अर्थः** वेदवाणीनें चित्त मोहून गेलें आहे त्या भोग व ऐश्वर्य यांमध्यें विशेषतेनें दंग–आसक्त असलेल्यांना, अल्पमतींना निश्चयात्मक बुद्धि सांपडत नाहीं,–अतःकरणापर्यंत ती प्राप्ततेची होत नाहीं, त्याची बुद्धि समाधि विधीची होत नाहीं, सेवेची होत नाहीं (वस्तू जी ब्रह्म तेथपर्यंत त्याचा निश्चय करणारी बुद्धि–सांख्यबुद्धि अथवा योगबुद्धि पोहोंचत नाहीं–जाणतच मुळीं नाहीं ) (४४).

[ कर्मकांडप्रतिपादक वेदवाणीनें चित्त मोहून गेलें आहे–भोग व ऐश्वर्य यांमध्येंच विशेष दंग असलेल्या अल्पमति कर्मठांना व्यवसायात्मिका–निश्चयात्मक बुद्धि सांपडत नाहीं–प्राप्त होत नाहीं ]

**परि येकचि कुडें करिति । जे स्वर्गकाम मनिं धरिति ।**
**यज्ञपुरुष चुकति । भोक्ता जो ॥ २५० ॥**

**जैसा कर्पुराचा राशी किजे । मग अग्नि लाउनि दीजे ।**
**का मीष्टान्निं संचरविजे । काळकूट ॥ २५१ ॥**

**दैवें अमृतकुंभ जोडला । तो पायें हाणोनि उलंडिला ।**
**तैसा नाशिति धर्म निप(फ)जला । हेतुकपणें ॥ २५२ ॥**

**सायासें पुण्य अर्जिजे । मग संसार कां अपेक्षिजे ।**
**परी नेणति ते काय किजे । अप्राप्ते देखे ॥ २५३ ॥**

**जैसि रांधणि रससोय निकि । करूनियां मोले विकि ।**
**तैसा भोगासाठीं अविवेकी । धाडिती धर्म ॥ २५४ ॥**

**म्हणौनि हे पार्था । दुर्बुद्धि देख सर्वथा ।**
**तयां वेदवादरतां । मनिं वसे ॥ २५५ ॥**

परि येकचि कुडें (=वाईट) करिति=एक गोष्ट वाईट करतात. जे स्वर्गकाम (=देवलोक इच्छा-भोग्य वस्तु, मदन, स्वर्गेच्छा) मनि धरिति=अंतःकरणबुद्धींत विचारास घेतात-आदराचे करतात. भोक्ता=भोगणारा. जो यज्ञपुरुष=यज्ञ याग होम पुरुष-ईश्वराला-यज्ञौ वै विष्णु-. तो चुकतात=गमवितात, हरवितात-(२५०). कर्पुराचा राशी किजे, अग्नि लावुनि दीजे, मीष्टान्निं संचरविजे (=मिसळावें) काळकूट (=नांवाचें विष) = आत्मस्वरूप जे जाणण्यास योग्य ते नच जाणतां उगीच एक कापुराचा राशी करावा व त्यास आग लावून द्यावी-(२५१). अमृतकुंभ दैवें जोडला (=मिळवणें, जुळवणें, मिळणें). तो पायें हाणोनि उलंडिला (=उलथून पाडणें, उतास आला, कलंडला). तैसा नाशिति=नाहींसा करतात. निप(फ)जला=उत्पन्न झाला, घडला, घडविला, उत्पन्न केला. हेतुकपणें=सकामपणानें, उद्देशानें, अंतःकरणांतील भावना, हेतु.-(२५२).

सायासें=श्रमानें, कष्टानें. पुण्य=ईश्वरप्राप्तीसाठीं केलेलें सत्कार्य, सदाचार, नैतिक-धार्मिक गुण. संसार=प्रपंच, व्यवहार, प्रवाद. अपेक्षिजे=इच्छावा, जरूर वाटावा, संबंधाचा व्हावा. परी नेणति=न जाणणें, न समजणें, माहित नसणें. अप्राप्त(ते)=अज्ञानी, हतभागी. देखे=मान, पाहा, लेख, अनुभवास घे-(२५३). जैसि रांधणि=स्वयंपाक करणारी. रससोय=पाकनिष्पत्ति. निकि=चांगली. करूनियां मोले (=किंमत घेऊन) विकि. तैसा भोगासाठीं=भोगाकरितां-अनुभवासाठीं. अविवेकी=अविचारी. धाडिती. धर्म=धर्म गमावतात, टाकतात, घालवतात, पाठवतात-(२५४). दुर्बुद्धि=अनिष्ट, कठीण, वाईट बुद्धीचे. वेदवादरतां = वेदांतील फलार्थवादांत मग्न झालेले. मनि = चित्त, बुद्धि, विचार, तर्क, स्मृति. वसे = असते, राहते-(२५५).

पण एकच गोष्ट वाकडी करतात, जे का स्वर्गाची इच्छा मनीं धरून असतात-भोक्ता जो यज्ञपुरुष त्या ईश्वराला विसरतात, व स्वर्गफलाची इच्छा धरून कर्म करितात, एवढेंच यांत (कुडे म्हणजे) वाईट आहे-(२५०)

कसें तर, कापुराचा राशी करावा व मग त्यास अग्नि लावून द्यावा, का मिष्टान्नामध्यें विष मिसळावें (काळकूट संचरविजे) तसें होय- (२५१)

सुदैवानें अमृताचा कुंभ मिळाला तो पायें-लाथेनें-का हाणून-उलंडून टाकला, तसे फलहेतु धरून कर्म करण्यानें निफजलेला, उगवलेला, उपजलेला, उर्जावलेला, तो धर्म उत्पन्न झालेला यज्ञपुरुष ध्वंसित करतात, नासून टाकतात, नासतात-(२५२)

साहस सायासें-महाप्रयासानें पुण्य जोडायचें आणि तें स्वर्गसंसारांतील भोग मिळविण्यासाठीं खर्चायचें; पण-ज्याला ब्रह्मसुख मिळालें नाहीं तो अकृतार्थ (अप्राप्त) पुरुष, सुख-ज्ञान न लाभलेले ते नेणते असेच ते होत-इथें काय करावें बरें ?-(२५३)

जसें स्वयंपाकिणीनें चांगली पाकनिष्पत्ति करून पैसे घेऊन ती विकून टाकावी (मोले विकी), तसें अविवेकी, अयथार्थ ज्ञानी (–गोंधळलेला, भ्रमिष्ट) अविचारी, ते फक्त भोगासाठींच कीं उत्पन्न झालेला, उगवलेला धर्म ( =पुण्य, सदाचरण, मूळ स्वभाव, कर्तव्य) व्यर्थ दवडितात–(२५४)

याकरितां आणि म्हणून हे पार्था, त्या वेदांतील केवळ शब्दाला चिकटून राहणें जें–अर्थवादच घेऊन बसणाऱ्या पुरुषाच्या मनामध्यें दुर्बुद्धि सर्वथैव वसणारी अशी असे तें जाण–पाहा कीं. . . .(२५५)

**त्रैगुण्यविषया वेदा निस्त्रैगुण्यो भवार्जुन ।**
**निर्द्वन्द्वो नित्यसत्त्वस्थो निर्योगक्षेम आत्मवान् ॥ ४५ ॥**

[वेदा=वेद हे. त्रैगुण्यविषयाः = विषय जो त्रिगुणात्मक (संसार) तोच प्रकाशतात. निस्त्रैगुण्यः भव =तिन्हि गुण नच घेऊन निष्काम हो. निर्द्वन्द्वः = सुखदुःखरहित. नित्यसत्त्वस्थः = सात्त्विक भावनेचा. निर्योगक्षेम = योगक्षेमाची चिंता न करणारा. आत्मवान् = आत्मस्वरूप चिंतनाचा हो.]

**अन्वय :** अर्जुन। वेदा त्रैगुण्यविषया (तस्मात्)। निस्त्रैगुण्यः भव। निर्द्वन्द्वः भव। नित्यसत्त्वस्थः भव। निर्योगक्षेमः भव। आत्मवान् भव।

**अर्थ :** हे अर्जुन, वेद हे त्रिगुणात्मक विषयांचें प्रतिपादन करणारे होत; ते संसार-प्रकाशकच होत; आणि म्हणून तूं तिन्ही गुण त्यजून, निष्काम वृत्ति धारण करून निर्द्वन्द्व हो, सुखदुःखशून्य हो, नित्यसत्त्वस्थ हो–नेहमी सात्त्विक भावनेचा आश्रय कर. निर्योगक्षेम हो–योगक्षेमाची चिंता न करणारा हो आत्मवान हो–आत्मस्वरूपाचें चिंतन करणारा हो–(चित्तविक्षेप करणारी चिंता सोडून स्वस्वरूपांत लीन हो)–(४५).

[वेदांचा प्रतिपाद्य विषय सत्त्व रज तम ह्या त्रिगुणांनीं युक्त तो संसार-प्रकाशकच आहे, म्हणून निस्त्रैगुण्य–निष्काम वृत्ति धारण कर–तसाच निर्द्वंद्व–सुखदुःखादि द्वन्द्वशून्य हो, नित्यसत्त्वस्थ–नेहमी सात्त्विक भावनेचा आश्रय कर, निर्योगक्षेम–योगक्षेमचिंता न करणारा हो, आत्मवान्–आत्मस्वरूपाचें चिंतन करणारा हो.]

**तिहिं गुणिं आवृत । हे वेद जाणे निभ्रांत ।**
**म्हणौनि उपनिषदादि समस्त । सात्त्विक ते ॥ २५६ ॥**

**येर रजतमात्मक । जेथें निरोपिजे कर्मादिक ।**
**जे केवळ कर्मसुचक । धनुर्धरा ॥ २५७ ॥**

**म्हणौनि तुं जाण । हे सुखदुःखांसीची कारण ।**
**येथें झणिं अंतःकरण । रिघों देसि ॥ २५८ ॥**

**तुं गुणत्रयातें अव्हेरिं । मी माझें हें न करिं ।**
**येक आत्मसुख अंतरिं । विसंबु झणिं ॥ २५९ ॥**

आवृत=आच्छादित, वेष्टित, झांकलेले. निभ्रांत=भ्रांति उत्पन्न करणारे, भ्रांति-उत्पादक, भटकणारे, चुकणारे, घोटाळा घालणारे. सात्त्विक=खरें, स्वाभाविक, सद्गुणी, जोमदार, मानसिक, प्रामाणिक, सत्त्वगुणी (२५६). येर=अन्य. रजतमात्मक=(रजस्=धूळ, मनोविकार, पाप. तम=रात्र, काळोख, अंधार, तमोगुणी, आळस, प्रमाद, निद्रा)–(२५७). झणिं (=अंतःकरण) रिघो देसि [=शिरणें, प्रवेश करणें, आरंभ करणें, पुढें येणें (संदर्भानुसार)] = न जाणों, कदाचित् मन-अंतःकरण जाईल–पण तें जाऊं देऊं नको –(२५८). अव्हेरिं=टाकून दे, अनादरानें टाकणें. मी माझें हें न करिं=अहंममतेचा होऊं नको, देहबुद्धीचा होऊं नको. अंतरिं=अंतःकरणांत–आंतील अंतःकरणांत. विसंबु झणिं=विसंबू नको. आत्मसुख (=आत्मानंद, आनंद, समाधान, संवेदना, अनुकूल) अंतरीं विसंब (विश्राम दे, थांबव, विश्रांतीस घे) झणिं=आत्मसुखाचा विसर पडूं देऊं नको–(२५९).

सत्त्व रज तम ह्या तीन गुणांनीं आच्छादिलेले, झांकलेले, वेष्टिलेले, व्यप्त असेच ते वेद निःशंकपणें जाण आणि याजसाठीं उपनिषत् आदिकरून समस्त ते सत्त्वगुणयुक्त सात्त्विक होत-(२५६)

दुसरे जे रज व तम (-आत्मक-जे स्वतःचे हित पाहणारे-) त्यांनीं तर कर्म आदिकरूनच कीं ते निरूपणाचे केलेले (-अवलोकनास घेतलेले-विचार-मनन-वादविवाद-समजूत व शंकांनीं-) ते तर केवळ स्वर्गसूचक-देवलोक स्वर्गच सुचविणारे-हे धनुर्धरा होत-(२५७)

म्हणून तूं हें जाण, समजून घे कीं-हे रज तम केवळ सुखदुःखासच-सुखदुःखरूपी द्वन्द्वास कारण होणारे होत-करितां इथें तूं आपलें अंतःकरण-चित्त, मन-देऊं नको-(२५८)

तूं गुणत्रयाचा अव्हेर कर, मी, माझें-असें करूं नको; एक आत्मसुख अंतरामध्यें म्हणजे मनामध्यें विसरूं नको-आत्मसुखाचा मनास विसर पडूं देऊं नको-(प्राप्ततेचा हो, ब्रह्मसुख-अनुभवाचा हो, चैतन्यतत्त्व-ईश्वरी ज्ञान-स्वसुखाचा हो)-

**यावानर्थ उदपाने सर्वतः संप्लुतोदके ।**
**तावान्सर्वेषु वेदेषु ब्राह्मणस्य विजानतः ॥ ४६ ॥**

[यावान् ( = जेवढा केवढा), अर्थ ( = कार्यभाग उरकतां येतो), उदपाने ( =विहीर, विहिरीमध्यें; आड, लहानसा जलसंचय) = लहान जलसंचयांत जेवढा स्नानादि कार्यभाग उरकतां येतो-(अन्ध, प्रहिः, कूपः, उदपानम् इति ४ कूपस्य।). सर्वतः = चोहोंबाजूंनीं. संप्लुतः = तुडुंब भरलेल्या सरोवरांतहि. (प्लु+सं = एकत्र होणें, उसळणें, जलमय करणें). उदके = जलमय झालेल्या ठायीं. तावान् = तेवढा सर्व, तो कार्यभाग. सर्वेषु वेदेषु = वेदांमधील कर्मकांडामध्यें सांगितलेल्या कर्मानुष्ठानानें जी फलप्राप्ति ती सर्व. ब्राह्मणस्य विजानतः = ब्रह्मज्ञानी पुरुषाला समग्रत्वानें एकदम प्राप्त होते.]

**अन्वय :** उदपाने यावनर्थ। तावान् सर्वतः संप्लुतोदके। सर्वेषु वेदेषु। ब्राह्मणस्य विजानतः।

**अर्थ : (१)** विहिरीमध्यें जो स्नानपानादि कार्यभाग उरकतां येतो, तो सर्व चोहोंबाजूंनीं तुडुंब भरलेल्या सरोवरामध्येंहि होतो.

[सांगितलेल्या कर्मकांडात्मक सर्व वेदांमध्यें जी कर्मानुष्ठानानें फलप्राप्ति होते ती ब्रह्मज्ञानी पुरुषाला समग्रत्वानें एकदम प्राप्त होते-(ब्रह्मज्ञानीच्या आशीर्वादानें एकदम प्राप्त होते).]

(२) जो सर्व वेद कर्मकांडांत सांगितलेल्या कर्मानुष्ठानप्रकारें फलप्राप्तीचा होऊं शकतो तो सर्व ब्रह्मज्ञानी पुरुषाच्या कृपेनें-ब्रह्मज्ञानी पुरुषाला समग्रत्वाने एकदम प्राप्त होतो-(४६).

**जऱ्हि वेदें बहुत बोलिलें । विविध भेद सुचिले ।**
**तऱ्हि आपण हित आपलें । तेंचि घेणें ॥ २६० ॥**

**जैसा प्रगटलिया गभस्ति । अशेषहि मार्ग दिसति ।**
**तरि तेतुलेनिहि काये चालिजेति । सांगे मज ॥ २६१ ॥**

**का उदकमय सकळ । जऱ्हि जालें असे महीतळ ।**
**तऱ्हि आपण घेपे केवळ । आर्तिचिजोगें ॥ २६२ ॥**

**तैसे ज्ञानिये जे होति । ते वेदार्थातेंचि विवरिति ।**
**मग अपेक्षीत ते स्वीकारिति । शाश्वत जें ॥ २६३ ॥**

वेद = चार वेद इतर श्रुति. प्रमाण असणारें वचन–ज्ञान. बहुत = फार, पुष्कळ, अनेक. बोलले = (१) भाषा, मुद्दा, बोलणें. (२) बोल = शब्द, वचन, बोध, प्रश्न–उत्तर, विधान. विविध = अनेक. भेद = पुष्कळ भिन्न भिन्न गोष्टी. सुचिले = सुचविले (सूचक = चुगलखोर, सुचविणारा). तन्हि आपण हित = कल्याण, कल्याणकारक, तेवढें. आपलें तेंचि घेणें = अंगीकार करणें, स्वीकारणें (घेयावें–घेपें = ग्रहण करणें, घ्यावें)–(२६०). प्रगटलिया = उदय पावल्यावर, उघड दिसूं लागल्यावर, (सूर्य) दाखविल्यावर प्रकट = उघड, स्पष्ट, जाहीर. प्रकटन = जाहीर करणें. (किरणः, उस्रः, मयूखः, अंशुः, गभस्तिः, घृणिः, रश्मिः, भानुः, करः, मरीचीः, दीधितिः, इति ११ किरणस्य।) गभस्ति = सूर्य. अशेषहि = सर्व विश्व, अशेष, कृत्स्न, समस्त. मार्ग = रस्ता, प्रथा, साधन. तेतुलेनिहि = तितकेहि. काये चालिजेति (चालिजीतिल–काय चालिजति) = चालले जातात. सांगे मज = मजपुढें स्पष्ट कर, विवरण करून सांग–(२६१).

उदकमय = जलमय (उद = पाणी. उदक् = उत्तरेकडे, वर, नंतर. उदक = पाणी. उदंच् = वरचा, मागूनचा, उत्तरेकडिल). सकळ = सर्व, संपूर्ण, एकंदर. जालें असे महीतळ = प्रांत, पृथ्वी, जमीन, प्रदेश. (महीतळ–महीतल = पृथ्वी, जमीन. मही = पृष्ठभाग. तळ = तळ, बूड, खालचा भाग, आश्रय, सपाटी, आधार. तल = डाव्या हातानें वीणा वाजविणें; स्वरूप, स्वभाव, आधार, ताड, तरवारीची मूठ, वीत, हाताचा कोपरा, पुढचा भाग, चामड्याचा हातमोजा, अरण्य, हातापायाचा तळवा, चपराक, टाळी). आपण घेपे (= घ्यावें) केवळ (= निव्वळ, शुद्ध, फक्त). (आर्तिन्चि = आपल्या इच्छेपुरतें, उत्कट इच्छा, पीडा)– आर्तिचि जोगे = ज्याच्या लाभाच्या उत्कट इच्छेंतच आनंद. जोगे = योग्य, सारखा, स्वाधीन–(२६२). ज्ञानिये (= जाणणारे, शहाणे, ज्ञान असलेला.) जे होति = ते वेदार्थातें (= अर्थ = धर्मादि पुरुषार्थ, सत्यपणा, खात्री) विवरिती = विचार करतात, विस्तार करतात, स्पष्ट करून सांगतात मग अपेक्षीत (= इच्छित) ते स्वीकारिति शाश्वत (= नाश न पावणारें–अविनाशी ब्रह्मसुख जें; स्वर्ग, कायमचें शाश्वत तत्त्व–सतत असणारें तत्त्व) स्वीकारिति = अंगीकार करतात, धारण करतात–(२६३).

जरी वेदांनीं बोलिलेले तें बहुत विपुल असें, तसेंच त्यानी विविध–नाना प्रकारचे–असे भेद, पुष्कळ भिन्न गोष्टी, निराळेपणा, फरक, प्रकार, भिन्न भाव सुचविलेले–सूचिले–तरी आपण आपलें हिताचें असें–हिता-पुरतें जें–कल्याणाचें, योग्य असें फायद्याचें तेंच घ्यावें. . . . (२६०)

सूर्य उगवला जसा–अशेषहि–सर्व पूर्णपणे–मार्ग दिसूं लागले, पण तितक्या अनेक मार्गांनी काय पायांनी चालावें (भ्रमण) होतें, सांग बरें !– (२६१)

अथवा जरी का सकळ महीतळ उदकमय झालें तरी आपण (आर्तिन्चिजोगे) आपल्या इच्छेपुरतेंच, तहानेची पीडा–दुःख–घालविण्यापुरतेंच घेणें–घ्यावें–(२६२)

त्याप्रमाणें जे ज्ञानी–शहाणे–जे असतात, ते वेदांच्या अर्थासच, अभिप्रायासच, शब्दाच्या भावासच, प्रकारास विवरतात व मगच त्यांना आपलें इच्छित, जरुरी का अपेक्षित असें जें शाश्वत–अविनाशी ब्रह्मसुख तेंच स्वीकारतात (–कबूल करतात). . . . (२६३)

**कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन ।**
**मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि ॥ ४७ ॥**

[कर्मणि एव = केवळ कर्म करण्याकडेच. कर्म = धार्मिक कार्य, गुणधर्म. ते अधिकारः = तुझा अधिकार, देखरेख, नेमलेलें काम, हक्क, पात्रता, प्रयत्न, अनुष्ठान, काम करणें, सत्ता, अंमल, ग्रंथ भाग आहे. फलेषु = फलाविषयीं तुझा अधिकार. कदाचन = केव्हांहि. मा = नाहीं. मा भू = होऊं नकोस. कर्मफलहेतु = कर्माच्या फलाचा अभिलाष करणारा. ते संगः = तुझी प्रवृत्ति अकर्मणि = कर्म न करण्याकडे. मा अस्तु = नच असो.]

[अकर्मणि = नैष्कर्म्य स्थितीमध्यें, कांहीं कर्म न करितां. अकर्मन् = (१) पाप, गुन्हा. (२) निषिद्ध कर्म. (३) क्रियाराहित्य. (४) मोक्ष. कर्मणि = धर्मशास्त्रविहित कर्मामध्यें, जीवनासाठीं देहेंद्रियाच्या यच्चयावत् कर्मामध्यें (अ ४. श्लो. १८).]

**अन्वय :** ते अधिकारः । कर्मणि एव[१] । फलेषु कदाचन मा[२] । मा भूः । कर्मफलहेतुः[३] । मा अस्तु ते संगः अकर्मणि[४] ।

**अर्थ :** (१) नेमलेल्या कर्मामध्येंच तुझा हक्क (प्रयत्न) आहे (असावा). (२) कर्माच्या फलाविषयीं तूं केव्हांहि अधिकार दाखवूं नकोस–तेथें तुझा अधिकार नाहीं. (३) कर्मफल अभिलाष करणारा तूं नच व्हावेंस. (४) तुझी प्रवृत्ति कर्म न करण्याकडे असूं नये–(कर्म करीत रहा) (४७).

**म्हणौनि आयिकें गा पार्था । याचिपरि पाहातां ।**
**तुज उचीत होये आतां । स्वकर्म हे ॥ २६४ ॥**
**आम्हिं समस्तहि विचारिलें । तंव ऐसेंचि हे मना आले ।**
**जे न संडिजे तुंवा आपुलें । विहित कर्म ॥ २६५ ॥**
**परि कर्मफळिं आस न करावि । आणि कुकर्मि संगति न व्हावि ।**
**हे सत्क्रीयाचि आचरावि । हेतुविण ॥ २६६ ॥**

म्हणौनि = म्हणोनि. याचिपरि पाहातां = याप्रमाणें विचारास घेतलें तर आतां. स्वकर्म (= स्वतःचें का आत्म्याचें) तुज उचित (= योग्य) होय = तुला स्वकर्म हेंच योग्य होय–(२६४) समस्त = निखिल, अखिल, कृत्स्न. समस्तहि = सर्व कांहीं. विचारिलें = विचार केला, सर्व हें विचार करून पाहिलें. ऐसेंचि हे मना आले = अंतःकरणांतील ओढ व आवडीचें, भानाचें, इच्छेचें झालें. जे न संडिजे (= गमावूं नये, टाकूं नये, सोडूं नये). तुंवा आपुलें विहित कर्म (= कर्तव्यकर्म–शास्त्रानें सांगितलेलें तुझें कर्म–म्हणजे क्षात्रकर्म)–(२६५).

कर्मफळिं आस न करावि = कर्मजन्य फळाविषयीं आशय, अभिप्राय, आस्था (इच्छा), भविष्याविषयींची दिशा. [आस–(अस्) = घेणें, प्रकाशणें, असणें. अश् = व्यापणें, पोचणें, मिळविणें, पावणें, अनुभवणें). कुकर्मि (अकर्मी) = निषिद्ध कर्मी–काम्य कर्माची (संगत). संगति = संबंध, आसक्ति, सहवास. हे सत्क्रीयाचि = सत्कर्म = फलाशा सोडून केलेलें स्वकर्म. आचरावी = कर्तव्य समजून करणें, वागणें, नियमविधि पाळणें. हेतुविण = अंतःकरणांतील भावना, उद्देश, साधन कारणाशिवाय. [सटम = शेंडी, तुरा, जटा, आयाळ, ज्वाळा. सटं अंक = सिंह. अस् = घेणें, प्रकाशणें, जाणें. कुकर्मीं = निंद्य कर्मामध्यें–कामामध्यें. कुचर = १. पर्यटन करणारा, २. दुर्वर्तनी, चोर. कु = पृथ्वी, त्रिकोणाचा पाया, वाईट, निंद्य शब्द करणें. संगती = संयोग, भेट, सहवास, संगत, मैथुन, ज्ञान, योग्यपणा, पूर्वापार संबंध सत्क्रिया = पुण्य, आतिथ्य, भूषविणें, प्रायश्चित्त. हेतुविण = उद्देशाशिवाय. हेतुवाद = हेतूचा श्रद्धारहित शोध; शास्त्र, तर्कशास्त्र; वादविवाद, कपट]–(२६६).

याकरितां हे पार्था ऐक, असें पाहा कीं–याप्रमाणें पाहिलें–विचारास घेतले असतां तुला आतां उचित असें स्वकर्म हेंच होय–स्वकर्म म्हणजेच स्वधर्म हाच तुला आतां योग्य, ग्राह्य, उचित जाण–(२६४)

समस्तहि आम्हीं विचारिलें–विचार करून पाहिलें–तो असेंच हें मनास वाटलें–मनामध्यें मनाच्या पसंतीस आलें–कीं, जें का तुंवा आपलें विहित कर्म, शास्त्रानें सांगितलेलें तुझें कर्म म्हणजे क्षात्रधर्म–योग्य काम–नच (संडिजे) सांडावेंस, नच सोडावेंस, नच टाकावेंस....(२६५)

पण कर्मफळाची आस, इच्छा नच करावी–तसेंच अकर्मीं काम्य कर्माची–तसेंच कुकर्मीं–निंद्य कर्मास संमती–संगती होऊं नच यावी–एक सत्क्रियाची (फलाशा सोडून केलेलें स्वकर्म) ही हेतूशिवाय आचरण्याचें करावें. . . . (२६६)

**योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनंजय।**
**सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥ ४८ ॥**

[धनंजय = अर्जुन. संगं त्यक्त्वा = कर्मफळ इच्छा सोडून, देहबुद्धीचा–देहसंगं त्यक्त्वा = देहभाव त्यजावे, योगभाव सेवावे–नच होतां. संगम् = सोबत, सांधा, संवय, स्पर्श. योगस्थः = योगामध्यें स्थिर होऊन (योग म्हणजे भेटणें–ऐक्य). कर्माणि कुरु = परमेश्वराप्रीत्यर्थ कर्में कर–निष्काम बुद्धीनें विहित अशीं तीं. सिद्धि असिद्धिः (द्ध) यः = जय अपजय का संबंधानें. समो भूत्वा = समचित्त होऊन. समत्वं = चित्ताची समता व समाधान असणें. योगः = योग. उच्यते = समजला जातो. (जीवात्मा परमात्मा यांचा संयोग = योग चित्तानुरोध. अप्राप्तीची प्राप्ति. योग = चित्तसमता. समत्वस्थः = योगस्थः)

**अन्वय :** धनंजय! । संगं त्यक्त्वा । योगस्थः । कुरु कर्माणि । समो भूत्वा । सिद्धिय असिद्धयः । समत्वं योग उच्यते ।

**अर्थ :** (१) हे पार्था, देहसंग–देहबुद्धि टाकून, योगाचा होऊन, कर्म कर. त्रिगुणाचा नच होता समतोल गुणांचा होऊन–सम होऊन–समदृष्टियोग आचर- समत्व समचित्त म्हणजेच योग कीं. . . .

(२) अर्जुना, योगामध्यें स्थिर, कर्मफळाचा अभिलाष नाहीं, जय-अपजयासंबंधीं समचित्त, परमेश्वरा-प्रीत्यर्थ निष्काम बुद्धि, विहित कर्में करणारा–चित्ताची समता–सर्वकाळ समाधान असणें जें–हाच खरा योग मानला आहे–(४८).

**तु योगयुक्त होउनि । फळाशा संग सांडुनि ।**
**मग अर्जुना चित्त देउनी । करिं कर्में ॥ २६७ ॥**

**परिं आदरिलें कर्म दैवें । जरि समाप्तिते पावे ।**
**तऱ्हि विशेषे तेथें तोषावें । हेंहि नको ॥ २६८ ॥**

**कां निमित्यें कव्हणे येकें । ते सिद्धि न वचतां (चि) ठाके ।**
**परि तेथीचेनि अपरितोखें । क्षोभावें ना ॥ २६९ ॥**

**आचरितां सिद्धि गेलें । तरि काजाचि किरे आलें ।**
**परि ठेलियाहि सगुण जालें । यैसेंचि मानि ॥ २७० ॥**

**देखें जेतुलाले कर्म निफजे । तेतुलाले जरि आदिपुरुषिं अर्पिजे ।**
**तरि परिपूर्ण सहजें । जाहलें जाणें ॥ २७१ ॥**

**देखें सतासति कर्मिं । हे जें सरिसेपण मनोधर्मिं ।**
**तेचि योगस्थि(स्छि)ति उत्तमी । प्रशंसिजे ॥ २७२ ॥**

योगयुक्त होऊन कर्म कर = जीवात्मा परमात्मा यांचा संयोग जोडलेला असा होऊन. फळाशा–फळाचा संग टाकून कर्में कर = फळाशा–फळलाभाचा संग, सांधा, सोबत, संवय, स्पर्श टाकून–चित्त देऊन कर्में कर = मन, अंतःकरण, विचार तेथें देऊन; एकाग्र होऊन–(२६७). दैवें आदरिलें = दैवयोगावर भाग्यानेंच सत्कार करून का प्रेमानें आरंभिलेलें. समाप्तिते पावे = शेवटास गेलें, पूर्णता पावलें, समाधानाचें झाले.

विशेषे तोषावें हेंहि नको = असामान्यतेनें का अधिकतेनें संतोषावें असें करूं नको–असा होऊं नको–(२६८). निमित्यें येकें = कोणी एका निमित्तानें. सिद्धि न वचतां (चि) ठाके = अपूर्ण राहिलें. तेथीचेनि अपरितोखें क्षोभावें ना = तेथच्या असंतोषानें खिन्न होऊं नये–(२६९).

आचरितां सिद्धि गेलें = अनुष्ठानाचें केल्यानें पूर्णतेचें झालें. तरि काजाचि किरें (= निश्चयेंकरून) आलें = उपयोगास आलें, कामास आलें, कार्यास आलें, उपयोगाचें झालें. परि ठेलियाहि सगुण जालें यैसेंचि मानि = पण तें कर्म ठेलें–अपुरें राहिलें–तरी सगुण झालें, सफळ झालें असेंच मान (२७०). जेतुलाले = जेवढें. कर्म निफजे = उत्पन्न होतें. तेतुलाले = तेवढें. आदिपुरुषिं = ईश्वराचे ठिकाणीं. अर्पिजे–समर्पिजे = द्यावें, अर्पण करावें. तरि परिपूर्ण सहजें जाहलें जाणें = तरी सहजच परिपूर्ण, भरलेलें, तृप्त, संतुष्ट, खुष झालें समजावें (२७१).

सतासति कर्मि = भले बुरें कसलेंहि कर्म झालें तरी. सरिसेपण मनोधर्मि = मन सरसें म्हणजे समान ठेवणें. (सरिसें = रसाळ, ओलें, मोहक, प्रेमयुक्त, चवदार. मनस् = सदसद्विवेक बुद्धि, इच्छा, स्वभाव, ध्यान, शौर्य. धर्म = पुण्यकर्म–संप्रदाय–, प्रावीण्य, कर्तव्य, नीति, योग्यता. तेचि योगस्थिति उत्तमीं प्रशंसिजे = हीच योगस्थिति उत्तमांनीं–श्रेष्ठांनीं–वाखाणावी आहे, प्रशंसिली आहे, प्रशंसावी हें केव्हांहि–(२७२).

अर्जुना, तूं योगयुक्त–निष्काम कर्मयोग करणारा–होऊन व फळाचा संग (फळाशा संग) टाकून (= मत् क्रिया)–फलाचे ठायीं आसक्त नच होतां (फल+असंग)–मगच अर्जुना! चित्त देऊन आपलीं कर्में कर– (२६७)

पण आदरिलेलें, अवलंबिलेलें, लक्ष दिलेले, मान दिलेलें कर्म, दैवयोगानें–आकस्मिक योगानें (दैवयोग = संभव), दैवानें सत्त्वगुणविशिष्ट प्रारब्धानें, जरी का समाप्तीस पावतें व्हावें–पावलें तरी, तेथें विशेषसें असामान्यतेनें–अधिक प्रकारानें–तोषावें, संतोष, तृप्ति, आनंद, तृप्त होणें हेंहि नको–(२६८)

अथवा कोणी एका निमित्तानें तें सिद्धीस न जातां (वचतां) अपूर्ण राहिलें (ठाके), तरी पण तेथच्या अपरितोखानें, अपरितोषानें, असंतोषानें खिन्न होऊं नये–क्षोभास येऊं नये–(२६९)

आचरतां सिद्धीस गेलें तरी मग कामच झालें, कामास आलें, उपयोगाला आलें–तें काजासच आलें (उगवलें), पण जर का अपुरें राहिलें, राहून गेलें, गेल्यानें आहे तरी तें सगुण झालें, म्हणजे सफळ झालें–गुणत्वाचें झालें असेंच मान, असेंच समज–(२७०).

पाहा कीं, जेवढें कांहीं कर्म निपजत आहे, तेवढें जरी का आदिपुरूषाचे ठायीं अर्पिलें, समर्पिलें व्हावें, तरी मग सहजच कीं परिपूर्ण झालें असें जाण–(२७१)

असें पाहा कीं, सत् व असत् कर्माचे ठायीं, मोक्षदायक का बंधनकारक–(भलेंबुरें कसलेंहि) कर्म झालें तरी मन सरसें म्हणजे समान ठेवणें–व कर्मामध्यें हें जें कांहीं मनोधर्माचें सरिसेंपण–सारखेंपण–समता–(तीच कीं उत्तम अशी)–हीच योगस्थिति = ज्ञानयोगस्थिति होय, असें (उत्तमांनीं) श्रेष्ठांनीं–सर्वांत श्रेष्ठ जे चांगले त्यांनीं, मुख्यांनी–(उत्तम पुरुष परमात्मा)–प्रशंसिलें आहे–(२७२)

**दूरेण ह्यवरं कर्म बुद्धियोगाद्धनंजय ।**
**बुद्धौ शरणमन्विच्छ कृपणाः फलहेतवः ॥ ४९ ॥**

[दूरेण–दूरं, दूरेण, दूरात्, दूरस्य = पूर्ण, अंतर, अतिदूर, फार दूर, अत्यंतच, दूर, अति, फार, (दूर = लांबचे). हि = च. अवरम् = कनिष्ठ, नीच, हलकें, निकृष्ट आहे. कर्म = काम, कर्म, सकाम कर्म. बुद्धियोगात् = (मनबुद्धीचें ऐक्य = बुद्धियोग), समबुद्धीनें केलेलें युक्त ब्रह्मार्पण निष्काम कर्म. धनंजय =

अर्जुना. बुद्धौ = बुद्धियोगाला. शरणं अन्विच्छ = शरण जा. अन्विच्छ = अनुलक्षून, निष्ठावंत, बाजूनें, जवळ, जोडून, अनुसरून; आश्रय, रक्षण करणारा, आश्रयास योग्य. अनु + इच्छ् = इच्छा, खुषी. (इच्छत् = खुषी, मनाचा कल). अनु + ई = मागून जाणें, अनुसरणें, अनुकरण करणें, संबंध असणें. इष् = पसंत करणें, प्रयत्न करून मिळविणें, प्रयास करणें, आवडून घेणें. अन्विष् (अन्विष्ट) = पाहणें, शोधणें, तपास करणें, हुडकणें, इच्छा करणें. फलहेतवः कृपणाः = केलेल्या कर्माच्या फलाची आकांक्षा करणारे–कोत्या बुद्धीचे अज्ञानी. फल = परिणाम, हेतु, उद्देश, फायदा, लाभ. हेतु = उद्देशानिमित्त, तर्क, उगम. कृपणः = अनाथ, दुबळा, दरिद्रि, निंद्य, नीच, मूर्ख, लोभी, कंजूष.]

**अन्वय :** धनंजय। कर्म। बुद्धियोगात्। दूरेण हि अवरम्। बुद्धौ शरणम् अन्विच्छ। फलहेतवः कृपणाः।

**अर्थ :** समबुद्धीनें युक्त होऊन ब्रह्मार्पण केलेलें निष्काम कर्म म्हणजे बुद्धियोगानें केलेलें जें कर्म, त्यापेक्षां –(जन्ममरणाच्या फेऱ्यांत लोटणारें) त्याहून कर्म म्हणजे सकाम कर्म अत्यंत निकृष्ट आहे; म्हणून तूं सम-बुद्धीनें युक्त होऊन, कर्म करणें जें त्याला–बुद्धियोगाला शरण जा (निष्काम कर्माचा आश्रय कर). कारण फलहेतवः म्हणजे केलेल्या कर्माच्या फलाची आकांक्षा करणारे अज्ञानी कोत्या बुद्धीचे होत–तसा तूं होऊं नकोस–बुद्धौ शरणमन्विच्छ–परमेश्वराप्रीत्यर्थ कर्म कर (४९).

**बुद्धियुक्तो जहातीह उभे सुकृतदुष्कृते।**
**तस्माद्योगाय युज्यस्व योगः कर्मसु कौशलम्॥ ५०॥**

[बुद्धियुक्तः = समत्वबुद्धिसाधक. जहाति = सोडतो. हा = त्याग करणें, सोडणें, वगळणें. इह = ह्या लोकींच, येथें, आतां. उभे = दोन्ही. (उभ उभय = दोघे, दोन्ही). सुकृत (= पुण्य, सदैव चांगलें करणें जें)–दुष्कृते (= पातक) = पुण्यपाप यांना. योगाय युज्यस्व = चित्ताची एकाग्रता–चित्ताचें समत्व जोडणें, प्राप्त करून असणें. कौशलम् (= चातुर्य, खुशाली)–कर्मसु योगः (= जीवात्मा परमात्मा ऐक्य) = कर्माचरण कौशल्य म्हणजेच योग = चित्ताची एकाग्रता ठेवून कर्म करणें जें.]

**अन्वय :** इह। उभे सुकृत दुष्कृते। बुद्धियुक्तः जहाति। तस्मात्। युज्यस्व योगाय। कर्मसु कौशलम् योगः।

**अर्थ :** समत्वबुद्धि–बुद्धियुक्त दोन्ही ह्या लोकींच पापपुण्य टाकून देतो आणि म्हणून (योगाय युज्यस्व) समत्व चित्ताचा योग (चित्तवृत्तिनिरोधः) तो प्राप्त करून घे, जोडून ऐस–कारण कर्मामध्यें कौशल्य (योगाचे) तोच योग (चित्तनुरोध–जीवात्मा परमात्मा भेट, ऐक्य) जाण–(५०).

**अर्जुना समत्व जे चित्ताचें। तेंचि सार जाण योगाचें।**
**जेथें मना आणि बुद्धिचें। ऐक्य आथी॥ २७३॥**

**तो बुद्धियोग विवरितां। बहुत पाडें पार्था।**
**दिसे हा अरुता। कर्मभाग॥ २७४॥**

**परि तेंची कर्म आचरिजे। तरिच हा योग पाविजे।**
**जे कर्मशेष सहजें। योगस्थिति॥ २७५॥**

**म्हणौनि बुद्धियोग सधरू। तेथें अर्जुना होयि स्थिरू।**
**मनें करि अव्हेरू। फळहेतुचा॥ २७६॥**

**जो बुद्धियोगा योजिले। तेचि पारंगत जाहले।**
**यिहीं उभयें बंधि सांडिले। पापपुण्यीं॥ २७७॥**

समत्व चित्ताचें = समता चित्ताची (मन, अंतःकरण, विचार). समम्×सार्धम्×साकम्×सत्रा× समम्×सह इति ५ सहत्यर्थे । समत्व = समता, सारखेपणा. समता = समदृष्टि, सारखेपणा. समचित्त = निःपक्षपाती. समकोल = माप. चित्त–चित्तम्, चेतः, हृदयम्, स्वान्तम्, हृत्, मानसम् इति ७ चित्तस्य। चित्तविभ्रम×उन्माद. चिन्मय = ज्ञानस्वरूप. चिनचिनि–चिणचिणी = रातकिड्यांचें चिणचिणणें. चेत = चित्त. तेंचि सार = (सार अलंकार) बळ, सत्त्वांश, तात्पर्य, दृढता, धैर्य, शौर्य, न्याय्य. जाण योगाचें = समत्व चित्ताचें. जेथें मना आणि बुद्धिचें = (मन = अंतःकरण बुद्धि. बुद्धि = ज्ञान विचार अंतःकरण शक्ति) ऐक्य = एकोपा. आथी = आहे– (२७३). बुद्धियोग = ज्ञानपूर्वक कर्म विचारिता–विवरितां = विचार, मीमांसा, विचार करितां. बहुते पाडें = पुष्कळशा मानानें. कर्मभाग–कर्मयोग = दीर्घ प्रयत्न. (कर्मपाक = कर्माचें फळ). अरुता = अलीकडचा (२७४).

तेंची कर्म आचरिजे तरिच हा ( = बुद्धियोग) योग पाविजे. कर्मशेष ( = कर्माचा शेवट, कर्मोत्तर (स्थिति–बाकी, उच्छिष्ट) सहजें योगस्थिति. योग = अप्राप्तीची प्राप्ति (२७५). बुद्धियोग ( = ज्ञानपूर्वक कर्म) सधरु = बळकट, सधैर्य, श्रेष्ठ, मोठें). तेथें होयि स्थिरु = दृढ, निश्चळ, चिरस्थायी, निग्रह. मनें करि अव्हेरु ( = तिरस्कार) फळ–( = पीक, नफा, परिणाम, उपयोग, फायदा) हेतुचा [ = उद्देशाचा, निमित्ताचा, उगमाचा, साधनाचा] (२७६). जे बुद्धियोगा = ज्ञानपूर्वक कर्म करण्यास. योजिले = उद्युक्त झाले. पारंगत ( = पार) पावले–जाहले = जे बुद्धियोगाचा–ज्ञानपूर्वक कर्म करणाऱ्या क्रियेचा आश्रय करतात, तेच भवाच्या पार–पारंगत ( = पलीकडच्या कांठास जाणारा समर्थ–निष्णात) जातात. यिहीं उभयें बंधि = इहीं उभय पुण्यपाप संबंधि–दोघे (उभ, उभय), पापपुण्य, देहकरार, बंधन (२७७)

हे अर्जुना, मन अंतःकरण विचार–चित्ताचें समत्व, सारखेपणा, समता–जेथें मनबुद्धीचें ऐक्य असतें, तेंच जीवात्मा–व परमात्मा यांचा संयोग हेंच–योगाचें सार–बळ–श्रेष्ठ–जाण–(२७३)

तो ज्ञानविचार अंतःकरण शक्ति बुद्धियोग विवरितां, हे पार्था, बहुते पाडें (कर्मयोग) कर्मभाग, प्रदेश, दैव, वांटा, स्वकर्म ( = स्वधर्म) हा अरुता खालचा असाच दिसत आहे–(२७४)

पण तेंचि कर्म–कर्म तेंचि–कर्मच एक आचरावें, तरीच हा योग (जीवशिवैक्य) पावावा, जें कांहीं कर्मशेष (उरलें होतें) सहजें योगस्थिति, ज्ञानयोगस्थिति–अवस्था स्थिरता–होय–(२७५)

म्हणून श्रेष्ठ, सधर बुद्धियोग तेथेंच स्थिर होई व मनानें फळहेतूचा अव्हेर कर.... (२७६)

जे बुद्धियोगा–निष्काम कर्म समबुद्धीनें युक्त असें ब्रह्मार्पण केलेलें निष्काम कर्म–योजिले, तेच पारंगत झाले –जे बुद्धियोगाचा आश्रय करतात तेच भवाच्या पार जातात–व त्यांनीं तर उभय बंधांनीं, पापपुण्यांनीं, अधर्म का सत्कर्म ह्यांनीं बांधणें केलें नाही–(सांडून टाकलें–सोडून दिलें)–(२७७)

**कर्मजं बुद्धियुक्ता हि फलं त्यक्त्वा मनीषिणः ।**
**जन्मबन्धविनिर्मुक्ताः पदं गच्छन्त्यनामयम् ॥ ५१ ॥**

[कर्मजम् = कर्मापासून मिळणारें इष्टानिष्ट फल. (फलं) त्यक्त्वा = टाकून. बुद्धियुक्ता = निर्विकार बुद्धीनें युक्त. मनीषिणः = मनाचें नियमन करणारे ज्ञानी पुरुष. जन्मबन्धविनिर्मुक्ताः = जन्ममरण यातायातीपासून पूर्ण मुक्त होऊन. अनामयम् पदं गच्छन्ति = कल्याणकारक परमपदाला जातात.]

**अन्वय :** मनीषिणः । बुद्धियुक्ताः । कर्मजं फलं त्यक्त्वा । हि । जन्मबन्धविनिर्मुक्ताः । अनामयं पदं गच्छन्ति ।

**अर्थ :** कारण चतुर किंवा पंडित ज्ञानी (साधुमहात्मे) जे आहेत ते कामकाजापासून–कर्मापासून उत्पन्न होणारें फल टाकून दिल्यामुळें, जन्ममरणाच्या बंधापासून, करारापासून मुक्त होऊन, अनामय म्हणजे आरोग्यतेच्या अशा, कल्याणाच्या अशा, दुःखरहित उपद्रवरहित पदास–पदाला जातात-(५१).

[समत्व बुद्धीनें कर्मानुष्ठान केल्यास चित्तशुद्धि होते, ज्ञानप्राप्ति होते, मुक्ति होते. (समता–समत्वं–एकरूपता, सादृश्य–बरोबरी–तुल्यता–निःपक्षपात–ऐकमत्य)]

**ते कर्मी तरि वर्तति । परि कर्मफळा नातळति ।**
**आणि यातायाती लोपति । अर्जुना तयां ॥ २७८ ॥**

**मग निरामयें भरित । पावति पद अच्युत ।**
**ते बुद्धियोगयुक्त । धनुर्धरा ॥ २७९ ॥**

कर्मी तरि वर्तति = (कर्मिन् = कार्यव्यग्र, उद्योगी, यज्ञादि कर्मनिष्ठ, कारागीर. वर्तन् = उपजीविका, वागणूक, धंदा, वृत्ति). कर्मफळा नातळति = काज कर्मफळास, लाभास, परिणामास, शिवत नाहींत. तयां– यातायाती = जन्ममरणादि येरझारा–जन्ममृत्यूचे फेरे, (यात + आयात = येरझारा) लोपति = (लोप = नाश, मोडून टाकणें, हिरावून घेणें; धर्म, जात, नातें इत्यादि प्रपंचांतून जाणें, अतिक्रमण, अभाव) (२७८). निरामयें = सुखरूप, निरोगी, क्षेम, कल्याण–रान-डुकर, रान-बकरा, रान-एडका–भरित = पुष्ट, भरलेलें, पूर्ण, भारयुक्त (हिरवा). पावति (पावनपण = शुद्ध करण्याचें सामर्थ्य). पद अच्युत = अविनाशी पद अच्युत = दृढ, अविनाशी, इत्यादि; विष्णु, कृष्ण; बळीराम; काव्यविशेष १२ सर्गाचें. (पीताम्बर अच्युतः शार्ङ्गी। बलदेवः, अच्युताग्रजः, रेवतीरमणः). धनुर्धरा, ते बुद्धियोगयुक्त = ज्ञान, विचार, अंतःकरणशक्तिरूपी योग, ऐक्य, भेटणें, ध्यान, जीवात्मापरमात्मा संयोग–संबंध–(२७९).

हे अर्जुना, ते कर्मामध्यें वर्ततात, पण कर्मफळास आतळत–इच्छित नाहीं–आणि त्यांचे जन्ममृत्यूचे फेरे लोपतात, नाहींसे होतात–(२७८)

मग निरामयभरित म्हणजे सुखरूप, कल्याण, निरोगी, क्षेम असें अविनाशी पद, अच्युत पद, शाश्वत पद पावतात असे ते बुद्धियोग (समबुद्धीनें युक्त असे ब्रह्मार्पण केलेले निष्काम कर्मयोग) युक्त जाणावेत– स्वर्गप्राप्ति हें विनाशी फळ आहे–(२७९)

**यदा ते मोहकलिलं बुद्धिर्व्यतितरिष्यति ।**
**तदा गन्तासि निर्वेदं श्रोतव्यस्य श्रुतस्य च ॥ ५२ ॥**

[ते तुझी. यदा = जेव्हां. मोहकलिलं (गहनं कलिलं) = मोहानें व्यग्र–ग्रस्त–अज्ञान पावलेली. बुद्धि = तुझी बुद्धि. व्यतितरिष्यति = तरून जाईल, ओलांडील, मुक्त होईल, पोहून जाईल, जिंकील, पार होईल. तदा = तेव्हां. गन्तासि = प्राप्त होशील. निर्वेदं = वैराग्याला. श्रोतव्यस्य = ऐकण्यास योग्य त्याविषयीं. श्रुतस्य = पूर्वी ऐकलेलें असेल त्याविषयीं. च = आणि.]

**अन्वय :** ते मोहकलिलं बुद्धि यदा व्यतितरिष्यति तदा श्रोतव्यस्य श्रुतस्यच निर्वेदं गन्तासि ।

**अर्थ :** मोहानें कलिल झालेली तुझी बुद्धि जेव्हां व्यतिरेकानें तरून जाईल, तेव्हां ऐकलेली का ऐकण्याचें तें नच घेतां–होतां–तुझी बुद्धि विरागवान–मुक्त होईल–(५२).

**तूं यैसा तैं होसि । जैं मोहातें यया सांडिसि ।**
**आणि वैराग्य मानसिं । संचरेल ॥ २८० ॥**

**मग निष्कळंक गहन । उपजेल आत्मज्ञान ।**
**तेणें निचाड होईल मन । अपैसें तुझें ॥ २८१ ॥**

**तेथें आणिक कांहिं जाणावे । का आणिकातें स्मरावें ।**
**हें अर्जुना आघवें । पारुषेल ॥ २८२ ॥**

मोहातें यया सांडिसि = मोह = अज्ञान (दुःख, भ्रांति, अविद्या) टाकशील. मानसिं वैराग्य (= मनामध्यें प्रपंचाविषयीं उदासीनता) संचरेल [ = उत्तेजनाचें होईल. संचार = फिरेल, शिरेल. संचर = अडचणीची एकपावली वाट-मार्ग] (२८०). निष्कलंक = निर्दोष गहन = दुर्गम, खोल. आत्मज्ञान = ब्रह्मज्ञान-स्वतः ब्रह्मरूपतेचें. उपजेल-निपजेल. तुझे मन अपैसें (= आपोआप) निचाड (= निष्काम) होईल (२८१). आणिक कांहिं-जाणावे = आणखी कांहीं जाणावें-शिकावें असें. का आणिकाते स्मरावें = आणिकाचें स्मरण करावें तें. हे आघवें पारुषेल = असें सर्व कांहीं थांबेल-राहिल (२८२)

बुद्धियोगानें (समबुद्धि कर्मब्रह्मार्पण निष्काम कर्म) युक्त असा-अविनाशपदाचा असा-तूं तेव्हां होशील जेव्हां का ह्या (-भुरळ, अज्ञान, दुःख, भ्रांति, अविद्या, चूक-) मोहास टाकून देशील तरच वैराग्य प्रपंचाविषयीं उदासीनता हे मना-मानसामध्यें संचरून असेल-वाट दाखविणारे का उत्तेजन देणारे होईल-(२८०)

मग निष्कलंक असें दुर्गम, खोल, गहन आत्मज्ञान म्हणजे ब्रह्मज्ञान उपजेल-उत्पन्न होईल-उगवेल ज्यायोगें का तुझे मन आपोआपच कीं निरिच्छ निःस्पृह होईल-(२८१)

तेथें आता आणीक कांही जाणावें आहे असें कांहींहि उरणार नाहीं, अथवा मागीलचें कांहीं स्मरावें-आठवावें का पश्चात्तापाचें करावें-असें हें अघवें हे अर्जुना नाहींसें होईल-(२८२)

**श्रुतिविप्रतिपन्ना ते यदा स्थास्यति निश्चला ।**
**समाधावचला बुद्धिस्तदा योगमवाप्स्यसि ॥ ५३ ॥**

[श्रुतिविप्रतिपन्ना = वेदश्रुतींनीं दर्शविलेल्या कर्मफलासंबंधी गोधळलेली. निश्चला स्थास्यति बुद्धि = स्थिर होईल बुद्धि ती. समाधौ अचला यदा = अचल समाधिस्थितीमध्यें जेव्हां का. योगम् अवाप्स्यसि = योग (जीवात्मा परमात्मा ऐक्य) प्राप्त होईल.]

**अन्वय :** ते बुद्धिः श्रुतिविप्रतिपन्ना यदा निश्चला समाधौ अचला स्थास्यति तदा योगम् अवाप्स्यसि ।

**अर्थ :** श्रुति (स्मृति) वेद मंत्र श्रवणानें गोधळलेली-अनेकत्वें कर्मफळदर्शकतेची ती-बुद्धि जेव्हां निश्चल होईल, स्थिर होईल,-समाधीमध्यें अचल होईल, तेव्हां योग साधेल, यथार्थ योगबुद्धि परमार्थ-जीवात्मा परमात्मा ऐक्य-बुद्धि तुला प्राप्त होईल-(५३).

**इंद्रियांचिये संगति । जीये पसर होतसे मति ।**
**ते स्थिर होईल मागुति । आत्मस्वरूपीं ॥ २८३ ॥**

**समाधीसुखीं केवळ । जैं बुद्धि होईल निश्चळ ।**
**तैं पावसी तूं सकळ । योगस्थिती ॥ २८४ ॥**

(ई)द्रियांचिये संगति, मति पसर ( = विस्तृत) होतसे = इंद्रियांच्या संगतीनें फांकलेलें मन. (संगतम् हृदयंगमम् = संबद्ध वचनस्य). चित्ताभोगः, मनस्कारः इति २ मनसः सुखादौतत्परतायाः । प्रज्ञाशेमुषीमति (प्रेक्षाबुद्धिः ।). मागुति = पुन्हा स्थिर = चिरस्थायी, दृढ, निश्चल. आत्मस्वरूपी = स्वस्वरूपीं (२८३).

समाधी=चित्ताची एकाग्रता. सुखी=पुण्यवंततेचा आनंद. केवळ=खरोखर, मात्र, फक्त. (केवल= मत्सरी, एकटा, सर्व) जै बुद्धि होईल निश्चळ= (स्थिर). तै सकळ (=सगळी, पूर्ण) योगस्थिती (= अवस्था, मर्यादा, स्थिरता, राहणें) पावसी (२८४).

इंद्रियांच्या संगतीनें फांकलेलें मन अथवा जी ही बुद्धि-मति फांकते, ती पुन्हा आत्मस्वरूपीं स्थिर होईल-(२८३).

चित्ताची एकाग्रता व्रतमौन शंकेचा परिहार इत्यादि समाधि सुखीच आनंदानेंच कीं खरोखर फक्त केवळ जेव्हां जर का बुद्धि निश्चळ-स्थिर-होईल तेव्हांच तूं सकळ संपूर्ण योगस्थिति-ज्ञानयोगस्थिति-स्थिरता, अवस्था पावशील-(२८४)

**अर्जुन उवाच।**

**स्थितप्रज्ञस्य का भाषा समाधिस्थस्य केशव।**
**स्थितधीः किं प्रभाषेत किमासीत व्रजेत किम्॥५४॥**

[स्थित = स्थिर. प्रज्ञस्य = शहाणा, स्थिरबुद्धीचा. का = कसे, कसले ते. भाषा = बोलणें, बोली, वाग्देवता, भारती. समाधि = चित्तैकाग्र्य, मौन, भक्ति, व्रत, चित्तशांति, अष्टांग योगापैकीं शेवटचें अंग केशव=विष्णु. स्थितधीः = स्थिरबुद्धीचा, मनाचा, विचाराचा. किम्=काय उपयोग. प्रभाषेत=स्पष्टीकरण करणें. किम् = कोण, काय. आसीत् = बसणें, आसन्, वासस्थान. व्रजेत = यात्रा करणें, फिरणें, जाणें. कम्=कसें तें.]

**अन्वय :** का भाषा समाधिस्थस्य स्थितप्रज्ञस्य। किम्। प्रभाषेत स्थितधी.। स्थितधीः किम् आसीत। स्थितधीः किम् व्रजेत।

**अर्थ :** अर्जुन म्हणतो हे केशव! विष्णो! श्रीकृष्णा! समाधिस्थस्य म्हणजे आत्मनिष्ठ झालेल्या स्थिर-बुद्धीच्या शहाण्या मनुष्याचे का भाषा म्हणजे काय लक्षण असतें-त्याचें बोलणें कसें असतें (भाषा=लक्षण), तो स्थिरबुद्धीचा पुरुष स्वतः आपण कसें बोलतो, कसा वागतो, राहातो, असतो-त्याचे (व्रजेत) व्यवहार जाण्याचे फिरण्याचे ते कसे असतात-एकंदरीत स्थिरप्रज्ञेचा तो कसा ओळखावा, त्याची लक्षणे ती कोणतीं, तें सांगा (५४).

**तेथें अर्जुन म्हणे देवा। हाचि अभीप्रावो आघवा।**
**मी पुसेन आतां सांगावा। कृपानिधी॥ २८५॥**
**मग अच्यूत म्हणे मुखें। जे किरीटी तुज निकें।**
**तें पूस पां उन्मेषें। मनाचेनि॥ २८६॥**
**या बोला पार्थें। म्हणीतले सांग पां श्रीकृष्णा तें।**
**काय म्हणिये स्थितप्रज्ञातें। वोळखो केविं॥ २८७॥**
**आणि स्थि(स्थि)रबुद्धि जो म्हणिजे। तो कैसा चिन्हि जाणिजे।**
**जो समाधिसुख भुंजे। अखंडित॥ २८८॥**
**तो कवणे स्थि(स्थि)ती असे। कैसेनि रूपीं विलसे।**
**देवा सांगावे हे यैसे। लक्ष्मीपति॥ २८९॥**
**तंव परब्रह्म अवतरणु। जो षड्गुणाधिकरणु।**
**तो काय तेथें श्रीनारायणु। बोलत असे॥ २९०॥**

अभीप्रावो आघवा = मनांतील आशय, तात्पर्यांश सगळा–(२८५). निकें = चांगलें. मनाचेनि उन्मेषें = मनाच्या संतोषानें–उल्हासानें, प्रसन्नतेनें, विकासानें, उघडण्यानें (२८६). म्हणिये = वर्णावें, म्हणावें (२८७). स्थि(स्थि)रबुद्धि ( = म्हटला जातो ) म्हणिजे = दृढ, ज्ञान, विचार, अंतःकरणशक्तीचा म्हटला होतो. कैसा चिन्हिं जाणिजे = कमच्या खुणांनीं जाणावा. समाधिसुख भुंजे ( = भोगतो ) अखंडित–(२८८). कवणें स्थि(स्थि)ति ( = राहणें, अवस्था, स्थिरता ) असे. कैसेनि रूपें विलसे = कसल्या रूपानं शोभतो–वर्ततो–विलासतो (२८९). परब्रह्मअवतरणु ( = अवतार ) = परब्रह्माचा पूर्ण अवतार श्रीकृष्ण. षड्गुण अधिकरणु = यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य, ऐश्वर्य ह्या सहा गुणांचे स्थान–गुणांनी युक्त (२९०).

तेथें आतां अर्जुन म्हणत आहे कीं–अहो देवा, हे कृपानिधी, (अभीप्राव शब्दाचा अर्थ–) उल्लेख, हेतु अवघा सर्व आतां मी पुसेन, विचारीन तो सांगावा–(२८५).

यावर अच्युतांनीं म्हणूं केलें कीं, हे किरीटी, तुला जें कांहीं तुझ्या हिताचें असें विचारणें आहे तें सुखानेंच–मनाच्या उल्हासानें–मनाच्या प्रसन्नतेनें विचार–( २८६ ).

यावर पार्थ म्हणत आहे–हे श्रीकृष्णा, तें सांगावें कीं सत्यवचनी म्हणजे स्थितप्रज्ञास काय म्हणावें ?–तो स्थितप्रज्ञ कसा म्हणावा ?–तो कसा ओळखावा ?–(२८७)

तसेंच स्थिरबुद्धि जो म्हणावा तो कैशा (–खूण, लक्षण, ठसा–) चिन्हांनीं जाणावा ?–जो का अखंडित समाधिसुख भोगून असतो–भोगतो–(२८८)

तो कोणत्या स्थितींत असतो ?–कसल्या (रूप–स्वभाव, शरीर, आकृति, प्रकार, सौंदर्य, वर्ण) रूपानें विलसतो ? (शोभतो, क्रीडा करतो), असें हें सर्व लक्ष्मीपती देवांनी सांगावे कीं–जी अहो–(२८९)

तेव्हां परब्रह्माचा अवतार श्रीकृष्ण, यश (कीर्ति), श्री (संपत्ति), औदार्य (तेजस्विता, अर्थगांभीर्य), ज्ञान (ब्रह्मज्ञान), वैराग्य (प्रपंचाबद्दल अनासक्ति), ऐश्वर्य (स्वामित्व), ह्या सहा गुणांनी युक्त ते श्रीनारायण तेथे तेव्हां काय म्हणत आहेत तें पाहा .... (२९०)

**श्रीभगवानुवाच ।**

**प्रजहाति यदा कामान्सर्वान्पार्थ मनोगतान् ।**
**आत्मन्येवात्मना तुष्टः स्थितप्रज्ञस्तदोच्यते ॥ ५५ ॥**

[ प्रजहाति = पूर्णपणें सोडून देतो. (हा + प्र = त्याग करणें, सोडणें, वगळणें, नाकारणें, टाळणें. जहत् = टाकणारा, त्याग करणारा ). यदा = जेव्हां. कामन् = कामना, वासना, मदन, इच्छा, भोग्यवस्तु. सर्वान् = सगळ्या, प्रत्येक. मनोगतान् = विचारांना, कल्पनांना. प्रजहाति कामान् सर्वान् मनोगतान् = मनांतील सर्व प्रकारच्या वासना पूर्णपणें सोडून देतो. आत्मनि ( = जीव, ब्रह्म, मूलस्वभाव, मन, बुद्धि, स्वतः ) एव = आपल्याच ठिकाणीं. आत्मना = आत्मस्वरूपानें, आत्मस्वरूपांत. तुष्टः = संतोषानें आल्हादित होतो. तदा स्थितप्रज्ञः उच्यते = तेव्हां स्थिर, दृढ, चिरस्थायी, निश्चल बुद्धीचा असा म्हटला जातो. ]

**अन्वय :** पार्थ । यदा आत्मनि एव आत्मना तुष्टः । मनोगतान् सर्वान् कामान् प्रजहाति । तदा स्थितप्रज्ञः उच्यते ।

**अर्थ :** पार्था, जेव्हा (आत्मनि एव) आपल्याच ठिकाणीं विरक्ततेमुळें (आत्मना तुष्टः) आत्मस्वरूपांत संतोषानें तल्लीन होतो, त्यावेळीं त्या पुरुषाला स्थितप्रज्ञ म्हणतात (५५).

[ अंतःकरणांतील अहंकारासह वासना दग्ध झाल्या, त्यायोगें आत्मस्वरूपांतच समाधान वृत्तीनें निमग्न, तो सिद्ध स्थितप्रज्ञ होय ].

**म्हणे अर्जुना परियेसीं । जो हा अभिलाष प्रौढ मानसिं ।**
**तो अंतरावो स्वसुखेंसि । करित असे ॥ २९१ ॥**

**जो सर्वदा नित्यतृप्त । जो अंतःकरणभरित ।**
**परी विषयामाजीं पतित । जेणे संगे किजे ॥ २९२ ॥**

**तो काम सर्वथा जाये । जयाचे आत्मतोषीं मन राहे ।**
**तो स्थित(र)प्रज्ञ होये । पुरुष जाणें ॥ २९३ ॥**

अभिलाष = काम, वासना, इच्छा. प्रौढ = धीट, विवाहित, पूर्णदशेला आलेला. मानसीं = (मानस् = मन) मनोगत, मनासंबंधीं, मन, चित्त, कल्पना, गर्भित, ध्वनित, संमति. अंतरावो = अडथळा, विघ्न. स्वसुखेंसि = जो आपल्या स्वतःचें-आत्म्याचें-सुख, आनंद, पुण्य. करीत असे = करतो (२९१). सर्वदा नित्य-तृप्त = सदासर्वदा नेहमीं तृप्त-संतुष्ट. अंतःकरणभरित = तात्पर्य, परब्रह्म, भरलेलें, पुष्ट, पूर्ण. पतित = जातिभ्रष्ट, बहिष्कृत (२९२). काम = मदन, इच्छा, भोग्य वस्तु. (कामम् = पोटभरू, स्वेच्छेनें, खरोखर). सर्वथा = सर्वप्रकारें, बहुतकरून. जाये = नाहींसा होतो. आत्मतोषीं मन राहे = स्वतःसंबंधीं संतोष-तृप्ती-आनंद. आत्मतोषी = रामकथा. आत्मकाम = स्वतःचें हित पाहणारा. स्थित(र)प्रज्ञ पुरुष जाणें = स्थिरबुद्धीचा पुरुष जाण (२९३).

श्रीनारायण म्हणत आहेत कीं, हे अर्जुना ऐक-असें पाहा कीं, हा जो अभिलाष, काम, इच्छा, वासना म्हणून जो मानसामध्यें, धीट, दाट, विवाहित-प्रौढ असा होऊन आहे, तो स्वसुखासंबंधीं अंतराय, अडथळा, विघ्न उत्पन्न करीत असतो (२९१).

जो नेहमींच्या नेहमींच नित्य तृप्त संतुष्ट असा व अंतःकरणभरित पुष्ट, पूर्ण असा जरी तरीपण ज्यायोगे तो ज्याच्या संगेकरून ह्या भोग्य वस्तूमध्यें-विषयामध्यें पतित-पडलेला-बहिष्कृत केला जातो, होतो-(२९२)

तो काम सर्वथा जर नाहींसा झाला, व्हावा,-मग ज्याचें मन आत्मज्ञान तृप्ति आनंद आत्मसंतोषाचे ठायींच राहातें, राहावें, राहील, तो पुरुष स्थितप्रज्ञ होय असें समज-(२९३)

**दुःखेष्वनुद्विग्नमनाः सुखेषु विगतस्पृहः ।**
**वीतरागभयक्रोधः स्थितधीर्मुनिरुच्यते ॥ ५६ ॥**

[दुःखेषु = पीडा, शोक, कष्ट. सुखेषु = पुण्य, पावन, सुख देणारें, आनंद. विगत = गेलेला, तेजोहीन. स्पृहः = इच्छा करणें. स्पृहा = इच्छा. वीत = टाकलेला, गेलेला, मुक्त. राग = मनोविकार, तांबडा रंग, द्वेष, रंग, आवड भय = भीति, अरिष्ट. क्रोध = राग. (क्रोधन = रागीट). स्थितधीः = स्थिर बुद्धीचा. मुनिः = तपस्वी, ऋषी, साताची संख्या. उच्यते = बोलला, वाचला.]

**अन्वय :** दुःखेषु अन् उद्विग्न मनाः । सुखेषु विगतस्पृहः । वीतरागभयक्रोधः । स्थितधीः । **मुनिः** उच्यते ।

**अर्थ :** कसल्याहि प्रकारच्या दुःखामध्यें ज्याचें मन खिन्न, उद्विग्न होत नाहीं; तसेंच स्वयमेव चालून आलेल्या सुखाविषयीं ज्याची इच्छा, स्पृहा सर्वथैव नष्ट झाली आहे; तसेंच ज्याचे राग, अनुराग, प्रेम, भय व क्रोध इत्यादि विकार नामशेष झाले आहेत, अशा स्थिरबुद्धीच्या संन्याशाला मुनि म्हणतात (५६).

[सुख तृष्णा दुःख उद्विग्नता नष्ट होऊन निर्विकार झालेल्यास स्थितप्रज्ञ म्हणावें.]

**नाना दुःखीं प्राप्ति । जया उद्वेग नाहिं चित्ति ।**
**आणि सुखाचीया आर्ति । अडपैजेना ॥ २९४ ॥**

**अर्जुना तयाचा ठाइं । कामक्रोध सहजे नाहिं ।**
**आणि भयाते नेणें कंहिं । परिपूर्ण तो ॥ २९५ ॥**

**ऐसा जो निरवधि । तो जाण पां स्थि(स्छि)रबुद्धि ।**
**जो निरसुनि उपाधि । भेदरहित ॥ २९६ ॥**

नाना दुःखीं प्राप्ति = अनेक (पीडा, शोक) कष्ट झाले तरी–दुःखें प्राप्त झालीं असतां. जया उद्वेग = चित्तास येणारी अस्वस्थता, त्रास. नाहिं चित्ति = मनामध्यें, अंतःकरणामध्यें, विचारामध्यें. आणि सुखाचीया ( = आनंद, सहज, पुण्य.) आर्ति ( = आशेला; पीडित; आतुरता; दुःख रोगीपणानें). अडपैजेना ( = अडविला जात नाहीं, पेंचांत पाडला जात नाहीं) = सुखाच्या इच्छेनें अडकून पडत नाहीं; अडचणींत पडत नाहीं (२९४). काम = विषयभोग इच्छा. (कामचर = यथेच्छ वर्तन). क्रोध = राग. सहजे = स्वाभाविकपणेंच. परिपूर्ण = भरलेला, तृप्त. भयाते = भीतीस, अरिष्टास. कंहिं = कधीं. नेणें = जाणत नाहीं (२९५). निरवधि = निस्सीम, केवळ. निरसुनि उपाधि = कामनेचा विटाळ दूर करुन, संसार सोडून, उपसर्ग टाकून. भेद = भिन्न भाव, निराळेपणा, फरक (२९६).

अनेक दुःखांच्या भेटण्यामुळें तरी प्राप्तीमुळें, ज्याचे (मनीं) चित्ती उद्वेग, उद्विग्नता, भीति, कंप नाहीं; तसेंच सुखाच्या इच्छेत अडकून पडत नाहीं. . . . (२९४)

हे अर्जुना, तयाच्या ठिकाणीं तो परिपूर्ण असल्यामुळें कीं, सहजच मग इच्छा, क्रोध राग कोप नाहींत, कसलेंहि (केव्हांहि) भय केव्हांहि त्यास तें कसें नाहींच. . . .(२९५)

असा जो निरवधि अमर्याद जो उपाधि–पदवी, कामनेचा विटाळ दूर करुन, निरसून, भेदरहित असा तो स्थिरबुद्धि जाण–(२९६)

**यः सर्वत्रानभिस्नेहस्तत्तत्प्राप्य शुभाशुभम् ।**
**नाभिनन्दति न द्वेष्टि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५७ ॥**

[यः = जो पुरुष. सर्वत्र = सर्वाठायीं, सर्व ठिकाणीं, देहासंबंधीं तसेंच जीवितासंबंधीं देखील. अन् अभिस्नेहः = स्नेहपाशवर्जित असतो (ज्यास प्रेम इच्छा आसक्ति नाही). तत् तत् = तें तें म्हणजे कोणतेंहि. प्राप्य = प्राप्त झालें असतां शुभ = बरें, तेजस्वी, सुंदर, न्याय्य, रास्त, सौदर्य, इच्छा, सुख, कल्याण. अशुभम् = वाईट. न अभिनन्दति = (अभिनंदन) स्तुति, आनंद, सुख आनंद मानीत नाहीं. न द्वेष्टि = दुःखद्वेष करीत नाहीं, (शत्रुत्व ईर्षा प्रतिकूलतेचा होत नाही). तस्य = त्याची. प्रज्ञा = बुद्धि. प्रतिष्ठिता = स्थिर-प्रतिष्ठित झाली समजावी–स्थिर–निश्चित झाली समजावी].

**अन्वय :** सर्वत्र अनभिस्नेहः । शुभ अशुभ तत् तत् प्राप्य । न अभिनन्दति । न द्वेष्टि । यः । तस्य प्रतिष्ठिता प्रज्ञा ।

**अर्थ :** देहजीवितासंबंधी स्नेहपाशवर्जित, कोणतेंहि बरेंवाईट प्राप्त झालें तरी (सुख) आनंद मानीत नाहीं, द्वेष करीत नाहीं-स्थिर निश्चल त्याची बुद्धि समजावी (५७).

**जो सर्वत्र सदा सरिसा । परिपूर्ण चंद्र का जैसा ।**
**अधमोत्तम (अंधोत्तम) प्रकाशा । माजी न म्हणे ॥ २९७ ॥**

**ऐसि अनवच्छिन्न समता । भूतमात्रिं सदयता ।**
**आणि पालट नाहिं चित्ता । कव्हण वेळी ॥ २९८ ॥**
**गोमटें कांहिं पावे । तरी संतोषे तेणें नाभिभवे ।**
**जो वोखटेन न नागवे । विषादासि ॥ २९९ ॥**
**ऐसा हरिखशोकरहित । जो आत्मबोधभरित ।**
**तो जाण पां प्रज्ञायुक्त । धनुर्धरा ॥ ३०० ॥**

जो सर्वेदा = नेहमीं. सदा = निरंतर. सरिसा = सारखा (सारखें–सरसें). परिपूर्ण = भरलेला, तृप्त. (चंद्रमत् = चंद्र). चंद्र = चंद्रमा, कापूर, पाणी, सोनें, मोतीं, आनंद देणारा. का = जैसा. अधम = नीच, दुष्ट. उत्तम = श्रेष्ठ, सर्वांत चांगला. प्रकाशा = सारखा, स्पष्ट, कीर्तिमान, उजेड, खुलासा, कीर्ति, उघडी जागा. माजी = मध्यें. न म्हणे = म्हणत नाहीं (२९७). ऐसि अनवच्छिन्न = अखंड. समता = सारखेपणा, समदृष्टि. भूतमात्रिं = प्राणिमात्रावर. सदयता = दयायुक्तता. पालट नाहिं चित्ता = मन–अंतःकरणाचे ठायीं विचाराची पालट–बदल नाहीं. कव्हण वेळी = केव्हांहि (२९८). गोमटें = चांगलें. पावे = मिळाले. संतोषे = खुषीनें. तेणें = त्या. नाभिभवे–न अभिभवे = वाहवला जात नाहीं, गर्व पावत नाहीं. वोखटेन = वाईटानें. न नागवे = सांपडत नाहीं–पावत नाहीं. विषादासि = दुःखाला (२९९). हरिख ( = हर्षहि) शोक ( = शोक खेदहि) रहित ( = नाहीं असा) = हर्षशोकरहित. आत्मबोधभरित = आत्मबोधानें ( = आत्म–ब्रह्म, जीव, स्वतः, मूळ स्वभाव, मन, बुद्धि–, बोध ज्ञान जागृत करणें जें) परिपूर्ण. भरित = परिपूर्ण. प्रज्ञायुक्त = बुद्धियुक्त. धनुर्धरा = अर्जुना (३००).

जो सर्वत्र नेहमीं सरिसा–सारखा–जसा का चंद्र परिपूर्ण असा–प्रकाशामध्यें असतां त्यानें हा अधम (प्रकाश) का तो उत्तम (प्रकाश) असें म्हणणें नाहीं....(२९७)

अशी अखंड समता, भूतमात्रीं सदयता, पालट नाही चित्ता कवणेहि काळीं, कवणे वेळेहि....(२९८)

कांहीं एकादें चांगलें गोमटें पावावें, तेव्हां त्या संतोषानें वैभव चढलें असा होत नाहीं, आनंदित होत नाहीं, वाहवला जात नाहीं–अथवा वाईटानें, वोखटें खोटें एखादें भेटलें त्यानें तो बद्ध होत नाहीं, विषादामध्यें सांपडत नाहीं....(२९९)

असा हर्षहि नाहीं व शोकखेदहि नाहीं असा हरिख आनंद शोक दुःखरहित जो आत्मबोधानें भरित परिपूर्ण असा तो प्रज्ञायुक्त, हे धनुर्धरा जाण–(३००)

**यदा संहरते चायं कूर्मोऽङ्गानीव सर्वशः ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ५८ ॥**

[यदा = जेव्हां (हा योगी). संहरते = परावृत्त करून–आवरून घेतो (आंत पोटाखालीं), जबरीनें घेणें, एकत्र करणें. च = त्याप्रमाणें. अयं = (स = एकत्र, सदृश, सहबद्दल) हा योगी (जेव्हां). कूर्म = कांसव, (एक मुद्रा). अंगानि = इंद्रियें आपलीं. अंग = शरीर, अवयव. इव = ज्याप्रमाणें. सर्वशः = सर्वथैव, सर्व बाजूंनीं. इंद्रियाणि = सर्व इंद्रियें. इंद्रियार्थेभ्य = इंद्रियांच्या विषयापासून. तस्य = त्याची. प्रज्ञा = बुद्धि. प्रतिष्ठिता = स्थिर, निश्चल, अचल होते का होती म्हणावी.]

**अन्वय :** तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता। यदा कूर्मः अयं च अंगानि (अंगान्–इव) सर्वशः संहरते। य इंद्रियाणि इंद्रियं अर्थेभ्यः संहरते सर्वशः अंगान् इव।

**अर्थ :** (१) त्याची बुद्धि स्थिर म्हणावी–जसा कूर्म हा आपल्या अंगांना सर्व प्रकारें, सर्व बाजूंनीं आवरून घेतो, त्याप्रमाणें जो पुरुषयोगी इंद्रियांना इंद्रियांच्या विषया–अर्थापासून सर्व तऱ्हेनें, सर्व बाजूंनीं आवरून धरतो तसा–(त्याची प्रज्ञा स्थिर म्हणावी)–

(२) आनंदास आलेल्या कूर्माचें सर्व शरीर ताणलेलें, पसरलेलें, जेव्हां का तो कूर्म स्वइच्छेनें तें शरीर आवरून घेतो, लपवितो–तशी ज्या योग्यानें आपलीं इंद्रियें विषयापासून आवरून धरिलेलीं असतात–(तेव्हां) तो स्थितप्रज्ञ म्हणावा (५८).

**का कूर्म जियापरी । उवाइला अवेव पसरी ।**
**नातरी इच्छावशें आवरी । आपले आपण ॥ ३०१ ॥**
**तैसीं इंद्रियें आपैतीं । जयाचें म्हणितलें करिती ।**
**तयाची प्रज्ञा जाण स्थिती । पावली असे ॥ ३०२ ॥**

कूर्म ( = कासव, तसेंच कूर्म नांवाची एक मुद्रा आहे)–जियापरी. पसरी = प्रसार, प्रसारण = विस्तार, पसरणें. प्रसरणें = व्यापणें, पुढें जाणें, पुढें ससरणें, उद्भवणें, वाहणें, लांब दीर्घ मोठें होणें, फैलावणें, प्रसार पावणें, लांब करणें, ताणणें, विक्रीस मांडणें, जाहीर करणें. उवाइला = आनंदांत असतां (आनंदला म्हणजे कांसव शरीर पसरतो). अवेव–अवयव. आवरी = वृ + आ = झांकणें, लपविणें, व्यापणें, भरणें. आपले आपण = आपण होऊनच (३०१). आपैतीं = स्वाधीन, वश. जयाचें म्हणितलें करिती = म्हटलेलें करतात, ताब्यांत राहतात. तयाची प्रज्ञा जाण स्थिति (= अवस्था, स्वरूप, रचना, स्वभाव, शाश्वती, टिकणें, व्यवस्था, शिस्त ठेवणें, राहणें, वास.) पावली असे = त्याची बुद्धि शिस्त ठेवणारी झाली–(३०२).

[ओवी क्षेपक पाहा—तै तयाची प्रज्ञा । स्थिर जाली प्राज्ञा । इये अर्थी अवज्ञा । करूं नको ॥ ३०३ ॥]

**इंद्रियें अंकित तो स्थितप्रज्ञ–(३०१–३०२)—**

–अथवा कूर्म–कासव ज्याप्रमाणें आनंदला असतां, प्रसन्न झाला असतां आपले अवयव पसरतो, अथवा इच्छामात्रेंकरून आपले आपणच ते अवयव आवरतो–(३०१)

त्याप्रमाणें ज्याचीं इंद्रियें आपोआपच कीं ज्याच्या आज्ञेप्रमाणें वागतात, ज्यास तीं स्वाधीन–वश होतात, ज्यानें जें म्हटलें तसें करतात–त्यानें म्हटलेले करतात, त्याच्या ताब्यांत राहातात, त्याची प्रज्ञा स्थिति पावली आहे, असें समज (३०२).

(इंद्रियें आपलीं तीं आज्ञापित तो स्थितप्रज्ञ ज्ञानवान् होय—३५३).

**विषया विनिवर्तन्ते निराहारस्य देहिनः ।**
**रसवर्जं रसोऽप्यस्य परं दृष्ट्वा निवर्तते ॥ ५९ ॥**

[विषयाः = सर्व विषय. विनिवर्तन्ते = पराङ्मुख होतात (पण कसें तर). निराहारस्य = उपाशी राहून, केवळ एक नियमच करून, निराहारानें इंद्रियें उपाशी राखिलीं आहेत ज्यानें. देहिनः = त्या पुरुषापासून देखील. रसवर्जं = रस म्हणजे वासना वेगळी करून, वासनेला मनांत मागें–शेष–ठेवून विषय त्यापासून निवृत्त होतात—तथापि. रसः = विषयप्रीति–वासना. अपि अस्य = अशा साधकाचीदेखील. परम् = परमात्मस्वरूप. दृष्ट्वा = दर्शन-अनुभवानें. निवर्तते = निवृत्त होते.]

**अन्वय :** निराहारस्य देहिनः। विषया विनिवर्तन्ते। रसवर्जं। अस्य अपि। रसः। परं दृष्ट्वा। निवर्तते।

**अर्थ :** केवळ नेम करून इंद्रियें उपाशी ठेविलीं, त्या इंद्रियांपासून सुद्धां सर्व विषय पराङ्मुख होतात–कसे तर–रस म्हणजे वासना मनांत ठेवून असणें–लपणें–अशाची विषयीं प्रीति परमात्मस्वरूपदर्शनानें निवृत्त होते [५९].

[हा श्लोक अतिमहत्त्वाचा असून त्याचा अर्थ मनात ठसलेला असावा–कारण विषयरुची वासने (रस) सहित नष्ट झाली पाहिजे. ती परम-दर्शनानें (आत्मज्ञानानें) नाहींशी होते.]

**अर्जुना आणिकही येक। सांगेन आयिके कवतिक।**
**जे विषयातें साधक। त्यजीति नियमे॥ ३०३॥**

**श्रोत्रादि इंद्रियें आवरिति। परि रसनें नियम न करिति।**
**ते सहश्रधा कवळीजेति। विषयिं यिहिं॥ ३०४॥**

**जैसि वरिवरि पालवि खुडिजे। आणि मुळिं उदक घालीजे।**
**तरि कैसेनि नाश निफजे। तया वृक्षां॥ ३०५॥**

**तो उदकाचेनि बळें अधिकें। जैसा आडवेनि आंगे फांके।**
**तैसा मानसिं विषो पोखे। रसनाद्वारे॥ ३०६॥**

**येरां इंद्रियां विषय तुटे। तैसा नियम न ये रस हटें।**
**जे जीवनचि हें न घटे। येणेंविण॥ ३०७॥**

**मग अर्जुना स्वभावे। यैसियाहि नियमातें पावे।**
**जें का परब्रह्म अनुभवें। होउन जायिजे॥ ३०८॥**

**तें शरिरभाव नाशती। इंद्रियें विषय विसरति।**
**जें सोहंभाव प्रतीति। प्रकट होये॥ ३०९॥**

कवतिक (=कौतुक=आनंद, उत्कंठा, आश्चर्य) सांगेन आयिके. साधक विषयातें नियमे त्यजीति = नियम करून साधक इंद्रिय-विषय सोडतात (३०३). श्रोत्रादि (श्रोत्र=कान) ईंद्रियें (=ज्ञानाचें किंवा कर्माचें साधन (इंद्रिय), आवरिति = विरोध करणें, निवारण करणें, व्यापणें, झांकणें, लपविणें, भरणें. परि रसनें (रसना=जीभ) नियम (=कमरपट्टा)–नियमन (=शासन, बंधन, निग्रह, दमन) न करिति. ते सहस्र(श्र)धा (=हजारो प्रकारांनीं, हजार तऱ्हांनीं. धा=धारणारा, ठेवणारा) कवळीजेति–कवळित (=ग्रासलेला, व्याप्त, खाल्लेला) = ग्रासले जातात, वेढले जातात. रसना स्वाधीन न ठेवणाऱ्या पुरूषांना विषय हजर हा (हजार) वाटांनीं येऊन दीन करतात. कवलिन्=रेडा. विषयी (=इंद्रियग्राह्य पदार्थविषय, देश, आश्रय, कर्म, अर्थ, व्यवहार, लक्ष्य). यिहिं=ह्या. [कामधमिन्=कासार. कामिक=बदक.] (३०४). वरिवरि (=वरच्यावरच) पालवि खुडिजे=एखाद्या झाडाची पालवी नुसती वरवरच खुडावी का छेदावी. आणि मुळिं उदक घालीजे = मुळामध्यें पाणी घालीत राहावें तर त्या वृक्षाचा नाश केव्हांहि निपजणार नाहीं (३०५).

आडवेनि आंगे फांके=विषय आडव्या अंगानें (फांकतो), फुटतो, फोफावतो, विस्तारतो. तसा रसनाद्वारे (=वासनाद्वारे) मानसिं विषो पोखे–पोषे=मनामध्यें जिव्हेच्या रसत्यांनीं, वासनेच्यामुळें विषय पोसला होतो (३०६). येरां=इतर (रसना सोडून) दुसऱ्या सर्व इंद्रियांचा ईंद्रियां विषय तुटे=इंद्रियांचा विषय तुटतो. रस हटें=खाण्याच्या निग्रहानें. तैसा हटें रस नियम (=संयमन) न ये=आग्रहपूर्वक–हट्टानें–प्रयत्न करण्यानेंहि वासनेचा निग्रह बहुधा करतां येत नाहीं. त्याप्रमाणे हट्ट का आग्रह का नुसता नेम केल्यानें जिव्हेची रस, रसना, आवड, स्वाद, शब्द, रसासंबंधींची आवड ती कमी होत नाहीं. कारण काय, तर ह्या इंद्रियांच्या विषयांशिवाय तर हे जीवित–जीवनच–जीवितानें असणें जगणें वांचणेंच मुळीं नच घडणारें, घटणारें, घडलें जाणारें नाहीं. त्याशिवाय जीविताचें मुळींच कांहीं चालत नाहीं (३०७) (तेव्हां) मग अर्जुना स्वभावे-ह्या वासनेचें नियमन होतें (नियमाते पावे)–रसासंबंधींची जिव्हेची आवड तीही नाहींशी होते, जेव्हां का–ब्रह्माचा अनुभव-आपणच ब्रह्म असा अनुभव आला, ब्रह्मच होणें झालें, परब्रह्मच तें आपण स्वतः होऊन जावें

( तेव्हां विषयीं आवड संपूर्ण नाहींशी होते ). रसमय = ब्रह्ममय (३०८). इंद्रियें = हृषीकं, विषयि, इंद्रियम्. विषय = आश्रय. विसरति = (सृ + वि) सोडतात. जैं सोहं = मीच ब्रह्म अशी प्रतीति. भाव = उत्पत्ति, अस्तित्व, स्वभाव, अभिप्राय, मनोविकार, विलास. प्रतीति = आनंद, अनुभव, सत्कार. प्रकट = व्यक्त, स्पष्ट होये (३०९).

**मनांत विषय ते बाधक – रसनेविषयीं नियम नाहीं – मानसीं विषय रसनाद्वारें पोखे— ३०३–३०७ :**

आणीक कांहीं एक हे अर्जुना, जें कौतुकच–आश्चर्य एक असें, तें कौतुकानेंच ऐकण्याचें कर, जें का साधकजन अगदीं नित्यनियमानें नियमन–दमन करून विषयास त्यागितात तत्संबंधीं होय....(३०३)

ते श्रोत्र आदिकरून इंद्रियें आवरतात, पण रसनेस आवरीत नाहींत–खाण्यासंबंधी का खाणेंपिणें जें तत्संबंधीं जी जिव्हेची आवड तेथें रसना स्वाधीन न ठेवणाऱ्या पुरुषांना विषय हजार वाटांनीं येऊन दीन करतात–रसनेस नियमाचें करीत नाहींत असे ते ह्या विषयांनीं सहस्रधा कवळिजेत–आकळिले जावेतच–असे होऊन असतात (३०४)

जसें का झाडाची पालवी वरवरच खुडावी व मुळाच्या ठायीं–तळीं पाणी घालीतच असावें असें जर तर तेथें त्या वृक्षास केव्हांहि नाश होणें नाहींच–निपजणारच नाहीं–(३०५)

तो तर उदकाच्या बळावर अधिकाधिकच कीं जसा आडव्या अंगानें फांकला, फोंफावला, विस्ताराचा झाला, तसा ह्या मानसामध्यें–मनामध्यें रसनाद्वारेंच कीं विषय हा पोसला जातो, पुष्ट होतो–(३०६)

इतर इंद्रियांचा विषय नियमानें जसा तुटतो तसा नियमाचें येणें होणें नाहीं–ह्या रसना रस हट्टामुळें होत नाहीं जें का जीवित, जीवन हेंच मुळीं जीवित्वाचें नच घडनेचें, त्याच्याशिवाय का घटनेचें होणारें असें, त्याशिवाय जीवितच चालत नाहीं....(३०७)

**सोऽहंभाव प्रतीतीनें विषय स्थिर—(३०८–३०९) (रस) :**

यावर स्वभावेंकरूनच अशा ह्या रसनेच्या नियमास पावणें झालें तर मग अनुभवावरच तें सहजच कीं परब्रह्म होऊन जावें–असावें असें होतें–(३०८)

तेव्हां तर शरीरभाव नासतात–नाहींसे होतात–इंद्रियें आपआपले विषय विसरतात जेव्हां का सोहंभाव-प्रतीति–मीच ब्रह्म अशी प्रतीति–अनुभव आनंद सत्कार–प्रकट होतो जेव्हां का....(३०९)

**यततो ह्यपि कौन्तेय पुरुषस्य विपश्चितः ।**
**इन्द्रियाणि प्रमाथीनि हरन्ति प्रसभं मनः ॥ ६० ॥**

[ यततः = प्रयत्न करणाऱ्याचे. हि = कारण. अपि = देखील. कौन्तेय = कुंतिपुत्रा अर्जुना. पुरुषस्य = (नर, विष्णु, ईश्वर) विवेकी बुद्धिवंत मनुष्याचे. विपश्चितः = पंडित, विद्वान, शहाणा. (विद्वान्, विपश्चित्, दोषज्ञः, सन्, सुधीः, कोविदः, बुधः, धीरः, मनीषी, ज्ञः, प्राज्ञः, संख्यावान्, पण्डितः, कविः, धीमान्, सूरिः, कृती, कृष्टिः, लब्धवर्णः, विचक्षणः, दूरदर्शी, दीर्घदर्शी इति २२ पण्डितस्य ।). इन्द्रियाणि = कर्माचें का ज्ञानाचें साधन. प्रमाथीनि = पीडा किंवा बलात्कार करणारी, क्षोभविणारी. हरन्ति = हैराण करतात, आकर्षतात. प्रसभं = बलात्कारानें (प्रसभम्, बलात्कारः, हठ इति ३ बलात्कारस्य । अमर० ). प्रसभ = जुलूम, बलात्कार. मनः = विचार, चिंतन, अंतःकरण, बुद्धि. ]

**अन्वय :** कौन्तेय विपश्चितः पुरुषस्य (मनः)। यततः (मनोनिग्रहे) अपि हि। प्रमाथीनि इंद्रियाणि। मनः प्रसभं हरन्ति।

**अर्थ :** कौंतेय, कारण प्रयत्न केला तरीहि विपश्चित पुरुषाचें मन-प्रयत्न करणाऱ्या अशा विवेकी पुरुषाचें मन-प्रमाथी निलाजरी, कोडगी, व्याकुळ करणारी, घातक इंद्रियें प्रसभं म्हणजे बलात्कारानें (हरन्ति) हरण करतात, आकर्षण करतात (६०).

**ये-हवीं तऱ्हि अर्जुना। हें आया न ये साधना।**
**जे राहाटताति जतना। निरंतर ॥ ३१० ॥**
**जयातें अभ्यासाची घरटी। यमनियमांची ताटी।**
**जे मनाते सदा मुठिं। धरूनि आहाति ॥ ३११ ॥**

**तेहीं किजेति कासाविसी। या इंद्रियांचि प्रौढि ऐसि।**
**जैसि मंत्रज्ञाते विवसि। भुलवि का ॥ ३१२ ॥**

**देखें विषय हे तैसे। पावती ऋद्धिसिद्धीचेनि मिसें।**
**मग आकळिती स्पर्शें। यिंद्रियांचेनि ॥ ३१३ ॥**

**तिये संधी मन जाये। मग अभ्यासीं थोटावलें ठाये।**
**ऐसें बळिकटपण आहे। इंद्रियांचे ॥ ३१४ ॥**

हें = इंद्रियांना स्वाधीन करणें जें. आया (= आयः = आकार, प्रमाण, मान) न ये साधना (= आराधना, उपाय) = बाह्य साधनांनीं हीं इंद्रियें जतन का स्वाधीन करून घेतां येत नाहींत, स्वाधीन होत नाहीत. जे निरंतर = नेहमीं. जतना = यत्नानें जीवंत ठेवण्यास-रक्षणास. राहाटताति = वागतात (३१०). जयातें अभ्यासाची घरटी = गस्त. ज्यास अभ्यासाची-आवृत्तीची संवय-गुणाकार करणें. यम = धर्मराज, शनि, यमुनेचा भाऊ, (अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह) नियम = [अंतर्बाह्य शुचिता (शौच) संतोष, तप, अभ्यास आणि परमेशपूजन]. ताटी = कुंपण, बंधन. जे मनाते = मनाला. सदा = नेहमीं. मुठिं = मुठींत, गच्च. धरूनि = आवरून, पकडून. आहाति = आहेत (३११). तेहीं कासाविसी किजेति = तेही कासावीस केले जातात. या इंद्रियांचि प्रौढि (= बळ, महत्त्व) ऐसि. जैसि मंत्रज्ञाते = मंत्र (बोलावणें) जाणणाऱ्यास. विवसि = पिशाच्च, भूत, विघ्न करणारी देवता-भुलवि का (३१२).

देखें विषय = इंद्रियांचे अर्थ. पावती = येतात, पोहोचतात. ऋद्धि = श्रीमंति, समृद्धि, वाढ. सिद्धीचेनि (= सिद्धि = कार्याची पूर्णता, फलोत्पत्ति, दैवशक्ति, कल्याण). मिसें = सोंग, कपट. मग = नंतर. आकळिति = आवरतात. स्पर्शे = संपर्क, दान, रोग, कातडी, परीस, हेर, लढाई. यिंद्रियांचेनि = इंद्रियांच्या निमित्तानें (३१३). तिये संधी = मिलाफ, सांधा. मन मायें-जाये मग अभ्यासीं = आवृत्तीच्या संवयीमध्यें. थोटावले ठाये = निर्बळ होऊन राहतें-शरण करीत बसतो. ऐसें बळिकटपण = बळवत्-बळवानपण त्यापुढें त्याचें कांहीहि चालत नाहीं. इंद्रियांचे = साधन जे ज्ञानाचे का कर्माचें-(३१४).

## इंद्रियांचें बळकटपण—(३१०-३१४) :

ये-हवीं हे अर्जुना, पाहिलें असतां हीं इंद्रियें बाह्य साधनांनीं जतन का स्वाधीन करून घेतां येत नाहींत -त्यांना जे का ह्याच्या जतनासंबंधी-साटीं नेहमींच निरंतर राहाटतात-कारण-(३१०)

ज्यास अभ्यासाची गस्त-घरटी-यम व नियमाची ताटी म्हणजे कुंपण, जे ह्या मनास नेहमींच्यानेहमींच मुठीमध्यें धरून असतात-(३११)

–तेही कासावीस केले जातात, एवढी अशी जबरदस्त ह्या इंद्रियांची प्रौढी, बलिष्ठपणा, जसें का, मंत्रज्ञानावरच विवशी–पिशाच्च–ती भुरळ घालणारी व्हावी ती–(३१२)

पाहा कीं, विषय हे तसे ऋद्धिसिद्धीच्या निमित्तानें येतात व मगच इंद्रियांच्या स्पर्शानें साधकास आकळण्याचें करतात, आवरून धरितात–(३१३)

त्यावेळेच्या मिलाफामध्यें संधी मन जाते व मग अभ्यासामध्यें थोटावलें होतें; साधक तो आतां कानशिलांत बसल्यामुळें दुःख करीत बसतो, त्याचें मुळींच कांहीं चालत नाहीं–असें ह्या इंद्रियांचें बळकटपण आहे–(३१४)

**तानि सर्वाणि संयम्य युक्त आसीत मत्परः ।**
**वशे ही यस्येन्द्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६१ ॥**

[तानि = तीं (इंद्रियें) सर्वाणि = सर्व. संयम्य = दमन करून. युक्त = चित्ताचें समत्व करून. आसीत = असावें, राहावें. मत्परः = (वासुदेवः सर्वम् इति–) वासुदेवाचे–माझे–ठायीं मन लावून. वशे = स्वाधीन. हि = कारण. यस्य = ज्यांच्या. इन्द्रियाणि = इंद्रियें असतात. तस्य = त्याची. प्रज्ञा = बुद्धि. प्रतिष्ठिता = स्थिर असते.]

**अन्वय :** तानि सर्वाणि । इन्द्रियाणि । संयम्य । युक्तः मत्परः आसीत् । हि । यस्य वशे इन्द्रियाणि । तस्य प्रतिष्ठिता प्रज्ञा ।

**अर्थ :** सर्व इंद्रियांचें संयमन–दमन–करून मत्पर, मज वासुदेवाचे ठायीं, युक्त चित्ताचे समत्व करून असावें–कारण ज्याचीं इंद्रियें अभ्यासबळानें स्वाधीनतेची अशीं वश असतात तो प्रतिष्ठित प्रज्ञेचा जाणावा–त्याची प्रज्ञा स्थिर असते–[इंद्रियनिग्रह–अनन्यभक्तीच एक ईश्वराचे ठायींची बुद्धि ती शांत ठेवते] (६१).

**म्हणौनि आयिके पार्था । यातें निर्दाळि जो सर्वथा ।**
**सर्वविषयिं आस्था । सांडूनीयां ॥ ३१५ ॥**

**तोचि तुं जाण । योगनिष्ठेसि कारण ।**
**जयाचें विषयसुखें अंतःकरण । झकवेना ॥ ३१६ ॥**

**जो आत्मबोधयुक्त । होउनि असे सतत ।**
**जो मातें हृदयांत । विसंबेना ॥ ३१७ ॥**

**येऱ्हविं बाह्य विषय तन्हि नाहिं । परि मानसिं होईल जरि कांहिं ।**
**तरि साद्यंतचि पाहिं । संसार असे ॥ ३१८ ॥**

**जैसा का विषाचा लेसु । घेतलिया होय बहुवसु ।**
**मग निभ्रांत करि नाशु । जीवितासी ॥ ३१९ ॥**

**तैसि या विषयाचि शंका । मनिं वसति देखा ।**
**घात करि अशेखा । विवेकजाता ॥ ३२० ॥**

निर्दाळि = नाश करणें जें, विध्वंस करणें जें, संहारतो. सर्वथा = सर्वप्रकारें, एकंदरीत, कसेंहि, खात्रीनें. आस्था = आवड, इच्छा, काळजी, विचार, आदर, संमति. सर्वविषयीं = भोग्य वस्तु, पदार्थ, ज्ञानेंद्रियांचे रूपादि विषय. सांडूनीयां = टाकून देऊन (३१५). योग ( = अष्टांग योग–साधनाची जोड, प्राप्ती)–निष्ठेस ( = आस्था, विश्वास, श्रद्धा, श्रद्धेला अनुसरून स्वीकारलेला मार्ग). विषयसुखें = इंद्रियें व मन यांना गोचर होणारी वस्तु–ज्ञान, अनुभव, सुख. विषयाची शंका = इंद्रिय अर्थासंबंधीं–संदेह, भीति, संशय घेणें, संदेह वाटणें. कारण = हेतु, साधन, इंद्रिय, मूळ तत्त्व. जयाचें = ज्याचें. अंतःकरण = मन, हृदय, चित्त.

झकवेना = फसत नाहीं, भ्रंश पावत नाहीं, मोह पावत नाहीं (३१६). आत्मबोध = स्वरूपज्ञान. युक्त = रास्त, जोडलेले, गुंतलेला. मातें = मजला. हृदयांत = अंतःकरणांत, आंतल्या भागांत. विसंबेना = विसरत नाहीं (३१७).

बाह्य ( –बहिरिति बाह्ये- ) विषय जरी नाहीं = बाह्य विषय जरी सुटले तरी मनांत विषय दुराशा लवमात्र असेल तर संसार पुरा मागें लागला आहे, असें समजावें–परि मानसिं ( मन–मानस = चित्त, बुद्धि, विचार, तर्क, स्मृति इत्यादिकांचें उगमस्थान ; जाणीव, इच्छा, भान, अंतःकरणाची ओढ, आवड ). होईल ( = घडणें, अस्तित्वांत येणें ) जरि कांहिं = बाहेरचे इंद्रियांना गोचर होणारे–जगांतील व्यापारास उद्देशून. तरि साद्यंतचि पाहिं = आदिअंतासहित सर्व पूर्णपणें, आरंभापासून शेवटपर्यंत सर्व. संसार असे = संसार, प्रपंचपसारा, विस्तार, व्यवहार लागला आहे (३१८). विषाचा = मारक द्रव्याचा–विखाचा. लेसु = लेश, अल्पस्वल्प अंश, भाग. घेतलिया = स्वीकारल्यास–अंगिकार केल्यास. होय = अस्तित्वांत येतें, घडतें. बहुवस = पुष्कळ, फार, अतिशय. निभ्रांत = निःसंशय. जीवितासी = जीवनास, जीवंतपणास. ( जीवः , असुधारणम्–जीवित– ) (३१९). मनिं वसति देखा = मनामध्यें उरली असेल, राहिली असेल तर. घात = नाश, वध. करि अशेखा = सर्व. विवेक = सारासार विचार, प्रकार, वेगळेपणा–वैराग्य. जाता = समुदाय, प्रकार, पदार्थमात्र (३२०).

**इंद्रियदमनानें योगनिष्ठा—( ३१५-३१७ ) :**

याकरितां म्हणून हे पार्था, असें पाहा कीं–या (इंद्रियांच्या) विषयास जो सर्व विषयींची आस्था, आवड, इच्छा सांडून–त्यागून–सर्वथैव निर्दाळतो–(३१५)

तोच तूं पाहा कीं जाण योगनिष्ठेस कारण होतो–ज्याचें अंतःकरण ह्या विषयसुखानें मुळींच झकवि होत नाहीं, मोह-भ्रंश पावत नाहीं, झकविलें जात नाहीं–(३१६)

—जो सतत आत्मबोधरूपी ज्ञानी असा, जो मला मनांत विसरत नाहीं–जो सतत आत्मबोधयुक्त होऊन आहे, असतो, जो मजला हृदयामध्यें मुळींच केव्हांहि विसंबत नाहीं– (३१७)

**विषयध्यानानें सर्वस्वी नाश—(३१८-३२०) :**

बाह्य विषय जरी सुटले तरी मनांत विषयदुराशा लवमात्र असेल, तरी संसार पुरा मागें लागला आहे असें समजावें येऱ्हवीं पाहिलें असतां जरी बाह्य विषय कसलाहि नाहीं, तरीपण जरी का कांहीं मनामध्यें–मानसामध्यें होईल तरी असेंच जाण कीं तेथें साद्यंत संसारच कीं (ह्या इंद्रियांचा व विषयांचा) आहे–(३१८)

जसा का विषयाचा लेश घेतला असतां, तो बहुवस पुष्कळ होतो, व मग निभ्रांतपणें, निःशंकपणें, निःसंशय जीवितास नाशक होतो–जीवितासहित नाशच एक करणारा होतो–(३१९)

तैसी ह्या विषयांची शंका मनीं वसती अशी पाहिलीस तर, पाहावी तर, अवघ्या सर्व विवेकजातांचा ती शंका घात करणारी होते–(३२०)

**ध्यायतो विषयान्पुंसः सङ्गस्तेषूपजायते ।**
**सङ्गात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥ ६२ ॥**
**क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।**
**स्मृतिभ्रंशाद्बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥ ६३ ॥**

[ध्यायतः = ध्यान करणाऱ्या. विषयान् = विषयांचें. पुंसः = पुरुष. संगः = सोबत, आसक्ति. तेषु = विषयांचे ठायीं. उपजायते = उत्पन्न होते. संगात संजायते = आसक्तीमुळें उत्पन्न होते. कामः = विषय, संग, मदन, भोग, इच्छा. कामात् = विषयसंग इच्छेमुळें किंवा अपूर्ण राहिलेल्या इच्छेमुळें (इच्छातृप्ति नच झाल्यामुळें). क्रोध = संताप, राग. अभिजायते = उत्पन्न होतो.]

**अन्वय :** पुंसः विषयान् ध्यायतः। तेषु संग उपजायते। संगात् जायते कामः। कामात् अभिजायते क्रोधः।

**अर्थ :** पुरुष विषयध्यान करणारा, त्याची विषयाचे ठिकाणीं आसक्ति उत्पन्न होते; त्या आसक्तीमुळें कामइच्छा उत्पन्न होते व कामामुळें–कामेच्छेमुळें (अपूर्ण इच्छेमुळें)–संताप उत्पन्न होतो (६२).

[क्रोधात् भवति = संतापापासून होतो. संमोहः = भ्रांति, भुरळ, अज्ञान, अविवेक. संमोहात् = अविवेकामुळें–भ्रांति भुरळ अज्ञानामुळें. स्मृतिविभ्रमः = स्मरणशक्ति भ्रम. स्मृति ( = आठवण, स्मरणशक्ति, धर्मशास्त्र) भ्रंशात् = स्मरणशक्ति नष्ट झाली कीं–. बुद्धि ( = ज्ञान विचार अंतःकरणशक्ति) नाशः = बुद्धीचा नाश होतो. प्रणश्यति = प्रणाश होतो–(बुद्धि मन ठिकाणावर नसलें कीं) जीवितनाश होतो.]

**अन्वय :** क्रोधात् संमोहः भवति। संमोहात् स्मृतिविभ्रमः भवति। स्मृतिभ्रंशात बुद्धिनाशः भवति। बुद्धिनाशात् प्रणश्यति–(प्रणाशन् प्रणाशः भवति)।

**अर्थ :** संतापापासून भ्रांति, भुरळ, अज्ञान, अविवेक; अविवेकापासून भ्रांति, भुरळ; अज्ञानापासून स्मरण, स्मृति, आठवण शक्तीस भ्रम होतो; कर्तव्यच मुळीं जागृतीचें न राहिल्यामुळें–शेवटीं संमोह म्हणजे मूर्खपण, मूर्खपणा होतो–विचारशक्ति नष्ट झाली कीं बुद्धि नाश पावते–बुद्धिमनाचा नाश झाला कीं शेवटीं जीविताचाहि नाश होतो (६३) *

**जरि हृदयीं विषय स्मरति। तरि निःसंगाहि आपजे संगति।**
**संगें प्रकटे मूर्ति। अभिलाषाची॥ ३२१॥**

**जेथ काम उपनला। तेथें क्रोध आधींच आला।**
**क्रोधीं वसे ठेला। संमोह जाणें॥ ३२२॥**

**संमोहा जालिया व्यक्ती। तरि ना पावे स्मृति।**
**चंडवातें जोति। आहात जैसि॥ ३२३॥**

**का अस्तमानीं निशि। जैशी सूर्यतेजातें ग्रासी।**
**तैशि दशा स्मृतीभ्रंशीं। प्राणियासि॥ ३२४॥**

**मग अज्ञानांध केवळ। तेणें आप्लविजे सकळ।**
**तेथें बुद्धी होय व्याकुळ। हृदयामाजीं॥ ३२५॥**

**जैसी जात्यंधा पळणी पावे। मग तें काकुळति सैरा धांवे।**
**तैसे बुद्धीसि होति भंवे। धनुर्धरा॥ ३२६॥**

**ऐसा स्मृतिभ्रंश घडे। मग सर्वथा बुद्धि अवघडे।**
**तेथें समूळ हे उपडे। ज्ञानजात॥ ३२७॥**

**चैतन्याचा भ्रंशीं। शरिरा दशा जैसि।**
**तैसि पुरुषा बुद्धि नाशीं। होय देखा॥ ३२८॥**

**म्हणौनि ऐकें अर्जुना। जैसा विस्फुलींग लागे ईंधना।**
**मग तो प्रौढ जालिया त्रिभुवना। पुरों शके॥ ३२९॥**

* चुकून जरी विषयचिंतन झालें, तरी अनर्थपरंपरा होऊन नाश होतो. विवेकभ्रष्टतेमुळें मृतवत् वावरतो, म्हणून इंद्रियदमन–संयमन असावें.

**तैसें विषयांचे ध्यान । जरि विपायें वाहे मन ।**
**तरी येणे (संगें) (येसणे) हें पतन । गींवसीत पावे ॥ ३३० ॥**

हृदयिं = अंतःकरण. – (चित्तं तु चेतो, हृदयं, स्वान्तं, हृन्मानसं, मनः). मनोरथ–मन = चित्त, बुद्धि, विचार, तर्क, स्मृति, इत्यादींचें उगमस्थान; हृदयांतील भाव व विचार; जाणीव, इच्छा, भान. अंतःकरणाची ओढ व आवड. विषयस्मृति = इंद्रियग्राह्य पदार्थाचें–अर्थाचें–विषयाचें स्मरण–आठवण. स्मरण (विस्मरण) = अपोहनं, विस्मरण, नाश होणें, आक्षेपाचा विचार, तर्कशक्ति, पूर्व पक्ष, शंकानिवारण, रोग बरा करणें, दूर घालविणें, दूर करणें. ज्ञान = बोध, जाणीव, बुद्धि. ज्ञानतः = जाणूनबुजून. ज्ञप्ति = बुद्धि, ज्ञान, स्तुति. निःसंगाहि = विरक्तासहि–व्यवहारात आसक्तीनें वागत नाहीं व देहभावाला वश होत नाहीं जो त्यासहिपण. संगति = सुसंबद्ध–सोबत, निरूपण. आपजे = भासते, उत्पन्न होते, उपजते. संगें = संबद्ध, आसक्ति–सोबतीमुळें. प्रगटे = व्यक्त होते, स्पष्ट होते, उदय पावते, उघड दिसते, दाखविते. मूर्ति = शरीर, प्रतिमा, रूप, आकार, अवतार. (काय, देह, मूर्ति, तनु, तनू इत्यादि). अभिलाषाची = इच्छेची (दोहदम्, इच्छा, काङ्क्षा स्पृहा, ईहा, तृट्, वाञ्छा, लिप्सा, मनोरथः, कामः, अभिलाषः, तर्षः इति १२ स्पृहायाः।)–(३२१). काम = इच्छा, वासना, इंद्रियसुखाची लालसा. उपनला = उत्पन्न झाला. तेथें = त्यावेळीं. त्यासंबंधीं, त्या ठिकाणीं, त्या प्रसंगीं. क्रोध = राग, कोप, संताप आधींच = पूर्वीच, अगोदर. आला = आणलेला जसा. क्रोधी = राग, कोप, संतापामध्यें वसे = राहणें, वसणें,–राहाते–असते. ठेला = (ठेणे = राहणें, बंद पडणें, कमतरता येणें.) संमोह = अविवेक, भ्रम. भ्रम = हिंडणें, वाटोळें फिरणें, भोवरा (पाण्याचा–केसाचा), चाकाचा फेरा, चक्कर, भोंवळ, पाण्याचा पाट, गटार, गोंधळ, घोटाळा, चाक, चरक, इ०, जातें, विपरित ज्ञान, भ्रांति, च्युत होणें. भ्रम + आसक्तः = शिकलगार. भ्रमण = भ्रम = चुकणें, सहल, पतिरंजनार्थ क्रीडाविशेष. सहलभ्रमणी (स्त्री) जाणें = समज, उमज, ओळख, खात्री असं दे (३२२).

संमोहा = भ्रम, अविवेक. जालिया = घडली. व्यक्ती = प्राणी, आकार, स्पष्टता, विवरण. व्यक्ति = विभूति अधिष्ठिलिया व्यक्ति (१०८–१०). तरी = तरीहि, तर, मग, सुद्धा. ना = नकारार्थी, प्रश्नार्थक. पावे = पोहोचत नाहीं–मिळत नाहीं, गांठीत नाहीं. स्मृति = जाणीव, आठवण, स्मृति–चिंता, स्मृति, आध्यानम् इति ३ स्मरणस्य। या मन्वादिभिः प्रणीता धर्मसंहिता धर्मबोधार्थ रचिता संहिता सा स्मृति। चंडवाते = प्रखर, भयंकर, मोठ्या प्रचंड वाऱ्यानें, हवेनें. चंडवात = (चंड = उष्ण, तीक्ष्ण, फार रागीट. वात = वायु) उष्ण वात, प्रचंड भयंकरअतिरागीट वारा. ज्योति = ज्योत, प्रकाश, दिव्याची ज्योत. ज्योतिस् = ज्ञान, प्रकाश, नक्षत्र, डोळ्यांतील बाहुली, सूर्य, अग्नि. आहत = जोरानें मारलेली, जोरानें लागलेली. आहत–हूत = हेन, नष्ट, आशाभंग झालेला, चुकलेला, भ्रष्ट, निंद्य, गुण (ग.). मारणें, गुणणें. आहति = मारणें, तडाखा, येणें, (ग.) गुणाकार. आहावली = खोटें, (चर्मवाद्य) ढोल, जीर्ण वस्त्र, कोरें वस्त्र, असंभवनीय, वस्तुकथन (वंध्यासुत), हताश = निराश झालेला, नीच, दुष्ट, निर्दय, निर्बल, क्षुद्र, वंध्य, निष्फल. हतविनय = दुष्ट. जैसी = जशी का (३२३) का = अथवा. अस्तमानीं = सूर्य मावळते वेळी, अस्ताम जाते वेळी. निशी = रात्र (अंधार, अज्ञान). निशीथिनी = रात्र. निशिथ = रात्र, मध्यरात्र. जैसी = ज्याप्रमाणें. सूर्यतेजातें = सूर्याची कांती, चकाकी उष्णता, उजेड त्यास. ग्रासी = घेरते, आच्छादते, व्यापते. तैशि दशा = अवस्था, स्थिति. स्मृति = आठवण, स्मरण, जाणीव नाहींशी झाल्यावर–विस्मरणानें. भ्रंशीं = पतन, नाश. प्राणियासि = शरीर जो त्यास, जन्तु, प्राणी.–(पंचप्राणांचा जीव–अंतःकरणसर्वस्व–) (३२४). अज्ञानांध = अज्ञान अंधाला. व्याकुळ = कासावीस, म्लान. हृदयामाजीं = अंतरामध्यें, मनानें. आप्लविजे = बुडते. सकळ = सर्व कांहीं–(३२५). जात्यंधा = जन्मांधाला. पळणी = धांवाधांव = जन्मांधाला पळण्याचा प्रसंग आला कीं तो काकुळती येतो–गोगलगाय होतो. काकुळति = दीनतेनें. सैरा = हवें तिकडे. भंवे = भ्रम, स्मृतिनाश,–भ्रमण (३२६). स्मृतिभ्रंश = विस्मरणानें,

स्मरण भ्रंश पावल्यावर-नाहींसें झाल्यावर. बुद्धि अवघडे = घोटाळ्यांत पडते-भ्रमते-भ्रमांत पडते. सर्वथा = सर्वथैव. ज्ञानजात समूळ उपडे = मूळासह उपटलें जातें-नाहींसें होतें (३२७).

चैतन्याच्या भ्रंशीं = जीवनचैतन्य भ्रंश पावल्यावर. चैतन्याचा व जीवाचा वियोग झाल्यावर. शरिरा दशा जैसि = ह्या शरीराची जशी दशा, प्रौढ अवस्था-स्थिती होते-बाल, तारुण्य, वृद्धाप्य ह्या दशा. पुरुषा = जीवचैतन्यरूप पुरुष; चैतन्य पुरुष; क्षेत्रज्ञ आत्मा पुरुष इति । पुनांगः, पुरुषः, तुङ्गः, केसरः, देववल्लभः-पंचजनाः, पुरुषाः, पूरुषाः, नरः इति मनुष्याणाम्-आत्माक्षेत्रज्ञः मानवश्च पुरुषः । (अमर०). बुद्धि = विचार-शक्ति, समजूत, मत, हेतु, उद्देश, विचार, जाणीवशक्ति, बुद्धिचैतन्य, वृत्ति-[बुद्धिः, मनीषा, धीषणा, धीः, प्रज्ञा, शेमुषी, मतिः, प्रेक्षा, उपलब्धि, चित्, संवित्, प्रतिपत् ज्ञप्तिः, चेतना इति १४ बुद्धेः.] (३२८). विस्फुलींग = अग्नीची ठिणगी. लागे ईंधना = जळणाला. प्रौढ जालिया = स्थितीस आल्यावर. त्रिभुवना (भुवन = स्थान, लोक) = तीन लोक (भुः भुवः स्वः) स्वर्ग, मृत्यु, पाताळ. चौदा भुवनें = सप्त लोक + सप्त पाताळें. चौदा विद्या = ४ वेद, ६ वेदांगें, पुराणें, मीमांसा, न्यायशास्त्र, धर्मशास्त्र (३२९).

विषयांचे ध्यान = चिंतन, मनन, चित्त तद्रूप ध्यावे [चित्तं, चेतः, हृदयम्, स्वान्तम्, हृत्, मानसम् मनः इति ७ चित्तस्य ।]. ध्यान = एकाच विषयाचें चिंतन, रूप स्वरूप चिंतन. (ध्यान, धारणा, समाधि त्रयमेकत्र रूप = संयमः) मन विपायें ( = कदाचित्) वाहे [मनस् = अंतःकरण, बुद्धि (मनीषा). मन् = विचार करणें, आदर करणें]. तरी येणें (संगे) - येसणे ( = एवढें अशा प्रकारचें मोठें) पतन गींवसित पावे = शोधीत येते. विषयिन् = गुलहौशी (३३०).

जरी हृदयीं विषय (स्मृति = धर्मशास्त्र, आठवण, स्मरणशक्ति. स्मर = स्मितयुक्त, प्रफुल्लित) स्मरती, तरी विरक्त-वैराग्ययुक्त निःस्पृह उदासीन पुरुषालाहि, निःसंगालाहि, विरक्तालाहि संगती-सोबत भेटते. आपजे-संगे, (सोबत, भेट, संवय, स्पर्श, सांधा) - संगी संगी(ति) संभाषणामुळें, अभिलाषाची, इच्छेची, मूर्ती शरीर प्रतिमा प्रकटते-व्यक्त होते-स्पष्ट होते-(३२१)

जेथे काम उपजला, उपनला (४८८-६ हरीखे उपनला) अगोदरच्याच मुळीं त्या क्रोधानें येण्यामुळींच कीं तो काम उद्भवला, काम प्रगट का दुर्लभ झाले, आतां क्रोधाच्या रागाच्या मुळींच की तो-भ्रांति, भुरळ, अज्ञान-संमोह परिणाम करणारा झाला-(३२२)

त्या संमोहास व्यक्ति जाल्यास-संमोह प्रगट झाला म्हणजे-स्मृति नाश पावते, चंडवातें (प्रचंड वाऱ्यानें), ज्योति दिव्याची जशी-आहत होते-ताडित होते-हत होते-नष्ट होते त्याप्रमाणें-(३२३)

—अथवा (अस्तमन) अस्तमानसमयीं निशी (रात्र) जशी सूर्यतेजास ग्रासते तशी स्मृतिभ्रंशीं पतन ऱ्हास बुद्धीचा चळ, माजलेली भ्रष्ट स्मृति तेव्हां जशी कांहीं प्राण्याची दशा होते-(३२४)

—त्यामुळें केवळ अज्ञान अंध तो त्याचे सकळ कांहीं बुडलें होतें (आप्लविजे) तेथें बुद्धि हृदयामध्यें व्याकुळ म्हणजे विव्हळ, गुंतलेली, उत्कंठित, चंचल होते- (३२५)

—जो जन्मतः अंध त्यास पळणें होतें, तेव्हां ते काकुळती असे सैरा धावूं लागतें, तसें बुद्धीला भ्रमण होतें. जन्मांध पुरुषाला पळण्याचा प्रसंग आला असतां तो गोगलगाय होतो (काकुलती)-(३२६)

असा स्मृतिभ्रंश पतन ऱ्हास बुद्धीचा चळ होतो व मग बुद्धि सर्वथैव अवघडते-अयथार्थ ज्ञानामुळें चक्कर येते, बुद्धि भटकते, भ्रमांत पडते, तेव्हां तेथ समूळच्या समूळ ज्ञानजात हें उपडलें होतें- (३२७)

चैतन्याच्या भ्रंशीं-म्हणजे चैतन्याचा व जीवाचा वियोग झाला म्हणजे ह्या शरीराची जशी कांहीं दशा, पतन, ऱ्हास, बुद्धीचा चळ होतो, तसें पुरुषास बुद्धिनाशामुळें बुद्धिध्वंस होतो, बुद्धीचें मरण होतें-जाण, देख, पाहा, समज-(३२८)

याकरितां हे अर्जुना, ऐक कीं-जशी विस्फुलिंग, अग्नीची ठिणगी (विषभेद) जळणास लागावी व मग ती प्रौढ-धीट, पूर्ण, दाट, पूर्ण दशेला आलेली-झाली वाढली म्हणजे त्रिभुवनहि-त्रैलोक्य-स्वर्ग, मृत्यु, पाताळ-जाळण्यास ती पुरती होऊं शकते-(३२९)

तसें विषयांचें -इंद्रियग्राह्य पदार्थ, करावयाचें कर्म-ध्यान चिंतम आराधन, जरी का कदाचित् मन हें वाहूं-उचलूं लागलें, सेवेचें झालें, तरी येवढें मोठें पतन-अवनति, नाश-त्यास हुडकित येऊन गाठतें-(३३०)

**रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।**
**आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥ ६४ ॥**

[राग=आसक्ति, क्रोध, आवड. द्वेष=लोभ व द्वेष-मत्सर, दावा, तिटकारा, वैर, द्वेख. रागद्वेष= आवडनावड, कामक्रोध. (संध्यारागरंग=संध्याकाळच्या आकाशींचे रंग). विषयान्=विषयांचा. विषय= इंद्रियें व मन यांना गोचर होणाऱ्या वस्तु. अशा वस्तूचें ज्ञान व अनुभव. इंद्रियैः=इंद्रियांनी. इंद्रियैः आत्मवश्यैः=आपल्या स्वाधीन असलेल्या इंद्रियांनीं. वियुक्तैः=सुटल्यावर. तु=परंतु. चरन्=उपभोग घेत असतां. विधेयात्मा=अंतःकरण स्वाधीन योगी (क्रिया करण्यास योग्य आत्मा). प्रसादम्=चित्तशांति. अधिगच्छति=मिळवितो. ]

**अन्वय :** विधेयात्मा । तु । रागद्वेषवियुक्तैः । आत्मवश्यैः इंद्रियैः । विषयान् चरन् । प्रसादम् आधिगच्छति ।

**अर्थ :** अंतःकरण स्वाधीन योगी राग लोभ द्वेष सोडून आपल्या स्वाधीनतेच्या इंद्रियांनीं विषयाचा उपभोग घेत असला तरी चित्ताची शांति मिळवितो-(६४).

(मनोविजयी, मन व इंद्रियें स्वाधीन अशा पुरुषानें विषयोपभोग घेतला तरी त्याचें चित्तस्वास्थ्य ढळत नाहीं).

**म्हणौनि विषय आघवे । सर्वथा मनोनि सांडावे ।**
**मग रागद्वेष स्वभावें । नाशतिल ॥ ३३१ ॥**

**पार्था आणिकही येक । जरि नाशले हे रागद्वेष ।**
**तरि इंद्रियां विषयिं बाधक । रमतां नाहिं ॥ ३३२ ॥**

**जैसा सुर्य आकाशगत । रश्मिकरि जगातें स्पर्शत ।**
**तरि संगदोषें काय लिंपत । तेथिचेनि ॥ ३३३ ॥**

**तैसा यिंद्रियार्थी उदासीन । आत्मरसें निर्भिन्न ।**
**जो कामक्रोधाविहीन । होउनि असे ३३४ ॥**

**तरि विषयांतुहि कांहिं । आपणपेंवांचुनि नाहिं ।**
**मग विषये कवण काये । बांधतिल कवणा ॥ ३३५ ॥**

**जरि उदके उदकिं बुडिजे । कां अग्नीं आगीं पोळीजे ।**
**तरि विषयसंगें आप्लविजे । परिपूर्ण तो ॥ ३३६ ॥**

**ऐसा आपणचि केवळ । होउनि असे निखळ ।**
**तयाची प्रज्ञा अचळ । निभ्रांत मानि ॥ ३३७ ॥**

विषय आघवे मनोनि (=मनांतून तसेंच मनापासून) सर्वथा सांडावे=मनांतूनच विषय काढून टाकावेत-(३३१). नाशले रागद्वेष=लोभ व मत्सर. ईंद्रियां विषयिं रमतां बाधक नाहिं=मग इंद्रियें विषयांत

रमली-रमत असली तरी बाधा होत नाहीं-(३३२). जगातें रश्मिकरे ( = किरणांनी, किरणरूपी हातांनी) स्पर्शत. तेथिचे निःसंग दोषे काय लिंपत = लिप्त होत नाहीं-(३३३). आत्मरसेंचि निर्भिन्न = आत्मसुखानें स्थिर झालेला, आत्मसुखाहून निराळा नसलेला-(३३४). आपणपेंवांचुनि नाहिं = आत्मस्वरूपावाचून विषयांतहि वेगळे कांहीं नाहीं-( विषय तो त्याचा जाला नारायण)-(३३५). विषयसंगे आप्लविजे = बुडविणें, स्नान-(३३६). निखळ-निखिळ = केवळ, सर्व ( निखिल = सर्व. निलेखन = पूर्णपणें). प्रज्ञा अचळ = बुद्धि स्थिर झाल्यावर-(३३७).

## रागद्वेष गेले कीं स्थितप्रज्ञ—(३३१-३३७):

याकरितां अवघे सर्व विषय मनांतूनच मुळीं काढून टाकावेत, सोडून द्यावेत व नंतरच मग राग-मनोविकार, आवड, संतोष-व द्वेष-शत्रुत्व ईर्षा-हे सहजे स्वभावें करूनच प्रकृतिपासूनच हे सहज कर्मे करून उत्पन्न झालेले ते आतां नाश पावतील-(३३१)

हे पार्था आणीकहि एक गोष्ट सांगण्याची आहे, ती म्हणजे, जरी का हे रागद्वेष, कामक्रोध, प्रीतिद्वेष मनांतून नाहींसे झाले तरी मग इंद्रियांनी विषयामध्यें रमणे-रमण्याचे ते केले तर ते बाधक होणारे, होत नाही-इंद्रियें विषयांत रमली तरी विषयाची बाधा होत नाहीं-(३३२)

आकाशी असलेला सूर्य-मध्यान्हीचा समजा-तो आपल्या रश्मिरूपी किरणांनी-करांनी जगास शिवला-स्पर्श करीत असला तरी काय तेथच्या संग सोबत स्पर्श दोषानें अपराधानें तो लिंपला-भरला, माखला, सारवला होतो-?(३३३)

तसा इंद्रियांच्या अर्थामध्यें उदासीन वैराग्ययुक्त तटस्थ व आत्मरसेंचि निर्भिन्न-ब्रह्मरसानें आत्मसुखानें -शब्द-स्थिर झालेला असा काम व क्रोधविहिन-विरहित होऊन आहे-(३३४)

तरीसुद्धा विषयांमध्येंहि, आत्मस्वरूपावाचून विषयांतहि वेगळें कांहींहि नाहीं-कांहीं का दुसरें तिसरे आपणा स्वतःवाचून नाहींच नाहीं व असे आहे तर मग विषय ते-आपणा स्वतःस-का कुणास कसचे बाधणारे ते होतील-(३३५)

जरी का उदकानें उदकामध्यें बुडणें बुडावें केलें, अथवा अग्नीनें आगी पोळावे तरीच कीं परिपूर्ण ते विषय संगाने बुडविला होईल ( थबकत जाणारा तो ) आप्लविला होईल-(३३६)

असा केवळ आपणच तो स्वतःच एक निखिळ केवळ सर्व कांहीं असा होऊन असतो त्याची प्रज्ञा, ज्ञान-शक्ति, बुद्धि, अचळ-स्थिर-निश्चळ-ब्रह्म अशी निःसंशय मान, जाण, ओळख, पाहा-(३३७)

**प्रसादे सर्वदुःखानां हानिरस्योपजायते।**
**प्रसन्नचेतसो ह्याशु बुद्धिः पर्यवतिष्ठते ॥ ६५ ॥**

[प्रसादे = चित्त प्रसाद झाला म्हणजे, चित्त स्वस्थ झाल्यावर. अस्य सर्व दुःखानाम् हानिः उपजायते = (यतीच्या) ह्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो. प्रसन्नचेतसः (ह्याशु = हि + आशु) = शांत चित्त सिद्धपुरुषाची बुद्धि, मन आशु (फार लवकर) आत्मस्वरूपांत लीन होते-सर्व बाजूंनीं स्थिर होते. हि = कारण. पर्यवतिष्ठते = ( स्था + पर्यव ) स्थिर राहाणें, सर्वत्र असणें, प्रेमधार देणें, सांत्वन करणें.]

**अन्वय :** प्रसादे। अस्य। सर्वदुःखानाम् हानिः उपजायते। हि। प्रसन्नचेतसः। बुद्धिः आशु पर्यवतिष्ठते।

**अर्थ :** ईश्वराच्या कृपेने चित्तप्रसाद-चित्तकृपा-अनुग्रह झाला असतां त्याच्या (ह्या यतीच्या) सर्व दुःखांचा नाश होतो-कारण शांतचित्त, प्रसन्न, संतुष्ट, आनंदित, सकृप चित्त, सिद्ध पुरुषाची बुद्धि फारच लवकर पर्यवतिष्ठते म्हणजे आत्मस्वरूपांत लीन होते, स्थिर रहाते, स्थैर्याला पावते-(६५).

**देखे अखंडित प्रसन्नता । आथी जेथें चीत्ता ।**
**तेथें रीगणें नाहिं समस्तां । संसारदुःखां ॥ ३३८ ॥**

**जैसा अमृताचा निर्झर । प्रसवे जयाचा जठर ।**
**तया क्षुधेतृषेचा अडदर । कहिंचि नाहिं ॥ ३३९ ॥**

**तैसे हृदय प्रसन्न होये । तरि दुःख कैंचे कें आहे ।**
**तेथें आपैसी बुद्धि राहे । परमात्मरूपीं ॥ ३४० ॥**

**जैसा निर्वातिंचा दिप । सर्वेथा नेणें कंप ।**
**तैसा स्थीरबुद्धि सस्वरूप । योगयुक्त ॥ ३४१ ॥**

प्रसन्नता = संतुष्टता, कृपाळुपणा, निर्मळता, आथि चित्ता जेथ = चित्तास ज्या आहे. संसार = प्रपंच, व्यवहार, प्रवाह. दुःख = पीडा, शोक, कष्ट. समस्तां तेथें रीगणें नाहिं = प्रवेश करणें, शिरणें नाहीं-(३३८). अमृताचा = सुधेचा. निर्झर = झरा. जठर = उदर. जयाचा प्रसवे = उत्पत्ति, प्रसूति, फल. तया क्षुधा = भूक. तृषेचा = तहान, इच्छा, लोभ. अडदर = भय, पीडा नाहीं = कांहीं नाही-(३३९). हृदय = छाती, हेतु, मन, इच्छा. प्रसन्न = संतुष्ट, कृपाळु होय. तरी दुःख = पीडा, शोक, कष्ट. आपैसी = आपोआप. बुद्धि राहे परमात्मरूपीं = परब्रह्म, आत्मरूप, स्वरूपीं (३४०). निर्वातीचा दीप = निवाऱ्याच्या जागेंतला, निवाऱ्यांतला. नेणें कंप = हालचाल, चलनवलन, कांपरे. सर्वेथा = नेहमी, मुळीहि, सर्व बाजूंनी पाहातां. योगयुक्त = जोडलेला योग = चित्तनुरोध, जीवात्मा परमात्मा संयोग, ऐक्य, भेटणें, साधनाची जोड, प्राप्ति, अष्टांगयोग. स्वस्वरूप = आपला मूळस्वभाव, आकार, प्रकार इत्यादि. स्थिरबुद्धि = ज्ञान विचार, अंतःकरण-शक्ति, दृढ, निश्चल-(३४१).

जेथें संतत अखंडित संतुष्ट कृपाळुपणा प्रसन्नता आहे ज्याचे-(मनास, अंतःकरणास, विचारास)-चित्तास, तेथे त्या चित्तामध्यें संसारदुःखासमस्ता-प्रपंच व्यवहार, पीडा, शोक, कष्ट इत्यादि सर्वांनी एकीभूततेने रिगणें नाहीं-प्रवेश करणें नाहीं-(३३८)

जसा अमृताचा-(सूर्य, अश्वविशेष-तृषाग्नि-पर्वतावरून वाहाणारा ओढा) निर्झर म्हणजे झरा, ज्याचे पोटामधून प्रसवत-प्रसवत आहे केळी जशी-आहे, त्यास, क्षुधा, तृषा इत्यादिचे भय पीडा कसची ती, ती कांहींची मुळीं नाहींच-(३३९)

तसें हृदय प्रसन्न व्हावे-झाले तरी मग कैचे कसले दुःख ते आहे म्हणावे-अहो, तेथें तर बुद्धि ती आपोआपच कीं परमात्मरूपीच राहाणारी असते-(३४०)

जसा निवाऱ्याच्या, वायुरहित निवाऱ्याचे जागेंतला दीप (दिवा) केव्हांहि सर्वेथा कंप कापणें हालणें जाणतच मुळीं नाही-तसा स्थिरबुद्धि तो सस्वरूप-स्वस्वरूपयोगयुक्त असा-(३४१)

---

**टीप :**—भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास। गेले आशापाश निवारूनि ॥ १ ॥ विषय तो त्यांना जाला नारायण। नावडे जन धन मातापिता ॥ २ ॥ निर्वाणी गोविंद असे मागेपुढे। कांहींच सांकडे पडो नेदी। तुका म्हणे सत्य कर्मा व्हावे साह्य। घातलिया भय (निरया) नरका जाणे ॥ ४ ॥

**चित्त प्रसन्न होते प्रभुचा महिमाचि आदरे गाता-(आर्या)—**

**नास्ति बुद्धिरयुक्तस्य न चायुक्तस्य भावना।**
**न चाभावयतः शान्तिरशान्तस्य कुतः सुखम्॥ ६६॥**

[न अस्तिबुद्धि=आत्मज्ञानासंबंधीं स्थिरबुद्धि नसते. अयुक्तस्य=चित्तस्थैर्य नाहीं त्याला. न=असत नाहीं. च=आणि. अयुक्तस्य=ज्याची बुद्धि स्थिर नाहीं त्याला. अयुक्त=अयोग्य. भावना=आत्मज्ञान, आदर. भावना=स्वभाव, तत्व. (भावयितृ=उत्कर्ष करणारा.) न=नसतो. च=आणि. अभावयतः =सद्भावना, अनुसंधान नाहीं त्याला. अभावयतः=नच प्रेमाचा,–नच भावाचा–प्रेमभावरूप अस्तित्वाच्या अभावाचा. शान्ति=चित्तस्वास्थ्य. अशान्तस्य=चित्त एकाग्र नाहीं त्याला. शांत=स्वभावानें गरीब, सत्त्वगुणी, जितेंद्रिय. अशम्=मनोवृत्तीचा निग्रह न करणें जें. सुखम् कुतः=सुखप्राप्ती कुठची?]

**अन्वय :** अयुक्तस्य बुद्धि न अस्ति। च। अयुक्तस्य भावना न अस्ति। च। अभावयतः शान्ति न अस्ति। अशान्तस्य सुखम् कुतः।

**अर्थ :** अयुक्ताला बुद्धि नाहीं, बुद्धि नसल्यामुळें अयुक्ताला भावना नाहीं, अभावयतः म्हणजे भावना नसल्यामुळें अयुक्ताला शांति नाहीं, व बुद्धि भावना अभावयतः शांति नाहीं तर चित्तस्वास्थ्य कुठचें? (६६).

**ये युक्तीचि कडसणि। नाहिं जयाचा अंतःकरणिं।**
**तो आकळीला जाण गुणिं। विषयादिकिं॥ ३४२॥**
**तया स्थिरबुद्धि पार्था। कहिं नाहिं सर्वेथा।**
**आणि स्थैर्याचि आस्था। तेहि नुपजे॥ ३४३॥**
**निश्चळत्वाचि भावना। जरि नव्हेची देखें मना।**
**तरि शान्ति केविं अर्जुना। आप होये॥ ३४४॥**
**आणि जेथें शान्तिचा जीव्हाळा नाहिं। तेथें सुख विसरोनि न रिगे कहिं।**
**जैसा पापियाचा ठाईं। मोक्ष न वसे॥ ३४५॥**
**देखें अग्निमार्जी घापती। तिये बिजें जरी विरूढति।**
**तरी अशांता सुखप्राप्ति। घडों शके॥ ३४६॥**
**म्हणौनि अयुक्तपण मनाचें। तेंचि भांडवल सर्वस्व दुःखाचें।**
**यालागीं यिंद्रियांचे। दमन निके॥ ३४७॥**

युक्तीचि=योजनेचे कौशल्य, नियम, नियमितपणा–निष्काम कर्म करण्याचे कौशल्य. कडसणी=विचार, छाननी, कसास लावणें, तावून सुलाखून घेणें, विचार करणें. विषयादिकिं=शब्दादिक विषयांनी. गुणी= मनोधर्म, स्वभाव, वस्तुचे धर्म, पाशानी. आकळिला=स्वाधीन केला, स्वाधीन झाला, मिळविला, समजविला (३४२). तया स्थिरबुद्धि=दृढबुद्धि. कहिं = कधी. नाहि सर्वेथा = सर्व प्रकारें, बहुतकरून. स्थैर्याचि = निश्चलपणा, स्थिरता. आस्था=कळकळ, प्रकट इच्छा, श्रद्धा–(३४३). निश्चळत्वाची = स्थैर्याची, स्थिरता नच ढळणारेपण. भावना = चिंतन, ध्यान, निश्चय, संस्कार, हृदयांतील भाव व विकार, जाणीव, इच्छा, भान, अंतःकरणाची ओढ व आवड. मना = चित्त, बुद्धि, विचार, तर्क, स्मृति इत्यादिकांचे उगमस्थान, शांति केवि=कशी ती. आप=प्राप्त होय (३४४). जेथें शांतीचा=निर्विकारता, समाधान, दैवी संपत्तीचा गुण जिव्हाळा = ओलावा, पाझर, उद्भव, लेश. पापीयाच्या = अपराध दोष करणारा, नीतिबाह्य वर्तन भोग, कुकर्माचे परिणाम ज्याचे ठायीं तो. मोक्ष = संसारांतून सुटका, परमानंद प्राप्ति, चौथा पुरुषार्थ (३४५). बीजें अग्निमाजि घापति = अग्नीमध्यें घातलेली, अग्नींत घालून भाजलेली. तरी अशांता = दुश्चित्त जो त्यास, शांति नसणाऱ्यास (३४६). अयुक्तपण मनाचे=मनोजय न करणें जें, मनाचे नियमन न करणें जे, मनाचे अनियमितपण. तेंचि भांडवल सर्वस्व दुःखाचे, यालागी इंद्रियांचे दमन (=निग्रह) निके–(३४७).

अहो युक्ति (योग्यता, मिलाफ, का उपयोग) म्हणून जी आहे तेथचा विचार, विचारणीय, अविचारणीय, मनन, समजूत, चिंतन, ज्याच्या अंतकरणामध्यें अंतरींद्रियामध्यें नाहीं तोच मुळीं लक्ष्य इंद्रियग्राह्य पदार्थ व्यवहार विषयादिकांच्या गुणांनी, मूळधर्मांनी आकळिला आवरलेला होतो–जाण–(३४२)

त्यास हे पार्था, स्थिर दृढ निश्चल बुद्धि, अंतःकरणशक्ति ज्ञान विचार–म्हणजे काय हे माहितहि नसतें, तसेंच–स्थैर्य–स्थिरता, निश्चलपणा म्हणून जे आहे अथवा आस्था कळकळ आधार स्थिति म्हणून जी आहे तेथचा गंधहि लेशमात्रहि त्याचे ठायीं उपजणारा जिवनोपायाचा होत नाहीं–(३४३)

अहो भावना, चिंतन, ध्यान, निश्चय, संस्कार, कल्पना जी का (निश्चला पृथ्वी) निश्चळत्वाची स्थिरतेची ती जर का ह्या कुणाच्याहि मनास जर मुळींच माहीत नसेल, शिवत नसेल, ती मनाच्या ठायींची नच होईल, तरी हे अर्जुना शांति निवृत्ति ती आपलीशी कसची बरे होणारी ती–(३४४)

आणि जेथें शांतिचा जिव्हाळा नाहीं, तेथें सुख सुख सहज आनंद पुण्य म्हणून जे ते स्वतःस विसरून जाऊन त्या अशांतीच्या मनाच्या ठिकाणीं केव्हांहि नच रिघणारे, प्रवेश करणारे, शिरणारे–जसा का पापियाच्या पातक्याचा ठायी केव्हांहि मोक्ष–मुक्तता–तो नच वसणारा राहाणारा कीं–(३४५)

असे पाहा कीं अग्निमध्यें घालून भाजलेलीं बीजें जर का जमिनीमध्यें उगवूं लागतील, तरच कीं अहो अशांतास–विकारसहिततास, सुख आनंद प्राप्ति ती मिळूं–घडूं शकेल. (उत्तर कीं अशांतास सुख नच घडूं शकणारे होय)–(३४६)

आणि असे आहे म्हणून, मनोजय न करणें जे, मनाचे नियमन न करणें असे, मनाचे अयुक्तपण, निराळेपण, न जोडलेलेपण, युक्ति विरुद्धता, तेच कीं सर्वस्वी दुःखाचे पीडा शोक कष्टाचे भांडवलच यासाठीं इंद्रियांचे दमन शासन करणें, जिंकणें हितकारक असें कल्याण करणारे सदैव शुभ होय–(३४७)

**इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।**
**तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ ६७ ॥**

[इंद्रियाणाम्=आपआपल्या विषयामध्यें. हि=कारण. चरताम्=(प्रवर्तणाऱ्या) भटकणाऱ्या इंद्रियांना. यत्=जे. मनः=मन. तत् अस्य=ते (मन) ह्या साधकाच्या. अनुविधीयते=मागोमाग जाते. प्रज्ञां हरति=सदसद्विवेक बुद्धिलाहि हरण करते, हैराण करते. वायुः नावम् इव अम्भसि=वारा जसा मोठ्या जलसंचयांत तरंगणाऱ्या नावेला हेलकावे देऊन खडकावर आपटतो–नावेचा नाश करतो–]

**अन्वय :** चरतां इंद्रियाणाम् हि यत् मनः अनुविधीयते । तत् अस्य प्रज्ञां अम्भसि वायुः नावम् इव हरति ।

**अर्थ :** कारण जे मन इंद्रियांच्या आपआपल्या विषयामध्यें भटकणाऱ्या (प्रवृत्त होणाऱ्या) इंद्रियांच्या मागोमाग जाते (भटकते), ते मन साधकाच्या विवेकबुद्धिलाहि हरण करते, हैराण करते,–कसें तर जलसंचयांत तरंगणाऱ्या नावेला वारा जसा हेलकावे देऊन खडकावर आपटण्याचे करतो तसें–(६७).

(विषयलंपटाची विवेकबुद्धि स्वरूपापासून हरण करून आत्मरूपीं नच स्थिर होऊं देतां त्याचें मन ते त्याला जन्ममरणाच्या फेऱ्यांत घालते)–

**यें यिंद्रियें जें जें म्हणति । तें तेंची पुरुष करिति ।**
**ते तरलेचि न तरति । विषयसिंधु ॥ ३४८ ॥**
**जैसि नाव थडि ठाकितां । जरि वरिपडि होय दुरावर्ता ।**
**तरि चुकलाहि माघौता । आपावो पावे ॥ ३४९ ॥**
**तैसी प्राप्तेहि पुरुषें । इंद्रियें लाळीलि जरि कौतुकें ।**
**तरि आक्रमिला देख (जाण) दुःखें । सांसारिकें ॥ ३५० ॥**

इंद्रिय = शरीराचा अवयव–काम करण्याचें साधन, ज्ञान संपादण्याचे साधन, दहा इंद्रिये (५ ज्ञानेंद्रियें, ५ कर्मेंद्रियें). इंद्रिये जे जे म्हणति ते तेन्चि जे पुरुष (= नर, ईश्वर, विष्णु) करिती, ते तरलेचि न तरति– विषयसिंधु (= समुद्र, नदी, एक देश, गाण्यांतील एक राग) (सिंधुज = शेंदेलोण) (३४८). जैसी नाव थडि (= तीराला) ठाकिता (= स्तब्ध असणारी, थांबणारी). वरपडि होय दुर्वाता = वावटळींत, वादळामध्यें,– वादळाच्या अनिष्ट प्रसंगात पडली, सांपडली–प्राप्त झाली. तरी चुकलाहि–अपराध घडलेला–ध्येय साध्य न झालेला, टळलेला. मागौता = पुन्हा. अपावो = अपाय, इजा, हानी (३४९). प्राप्तेहि पुरुषे = सिद्धपदाला पोहोंचलेला पुरुषहि. इंद्रियें लाळिती = इंद्रियांचे लाड करील–लालनपालन केली, पोसिली. जरी कौतुकें = सहज मौजेनें, हौसेनें, दिखाऊपणानें. तरी आक्रमिला = व्यापला. जाण दुःखें = कष्ट, पीडा, क्लेश. सांसारिकें = संसारासंबंधीं– (लल् = खेळणें, रमणें. ललन = विलास करणें) (३५०).

**प्राप्त पुरुषाससुद्धां इंद्रियलळा बाधक—(३४८–३५०) :**

हीं इयें इंद्रियें जें जें कांहीं म्हणतात तें तेंच जे पुरुष करतात, ते विषयसिंधु तरलेचि न तरतात–(३४८)

जसी नाव काठावर उभी आहे, पण जर का दुरावर्ता–दूरच्या भोंवऱ्यांत–सांपडली, प्राप्त झाली, वरपडी झाली, तरी चुकलेलाहि अपाव, अपकार, विभक्तपणा, नाश तो माघारीं पुन्हा पावणारा होतो–(३४९)

तशी–त्याप्रमाणें सिद्धपदाला पोहोंचलेला पुरुषहि जर इंद्रियांचें लाड करील–प्राप्त पुरुषानेंसुद्धां जरी का हीं इंद्रियें सहज कौतुकानें, आश्चर्यानें, उत्कंठेनें, आनंदानें, लाडिली केलीं, लाडीगोडी–लाडानें लाडविलीं, लळा देण्याची केलीं तरी–तर संसारिक प्रपंच व्यवहार दुःखानेंच शोक, कष्ट, पीडा इत्यादींनीं कीं तो आक्रमिला जाण–जिंकला होतो, ओझें लादलेला होतो, जवळ येऊं लागतात, धरिला होतो–(३५०)

**तस्माद्यस्य महाबाहो निगृहीतानि सर्वशः ।**
**इन्द्रियाणीन्द्रियार्थेभ्यस्तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता ॥ ६८ ॥**

[तस्मात् = आणि म्हणून. यस्य = ज्याची, ज्या पुरुषाची. महाबाहो = हे महाबाहो, पराक्रमी अर्जुना, निगृहीतानि = आकारलेली, नियमित केलेली, नेमिलेली असतात. (गृ + नि = गिळून टाकणें) (जिंकणें, आवरणें : निगृहीतिः = ). सर्वशः = सर्वतोपरी, सर्व बाजूंनीं, इंद्रियाणि = इंद्रियें–सर्व इंद्रियें. इन्द्रियार्थेभ्यः = इंद्रियांच्या अर्था–विषयापासून. तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता = त्याची बुद्धि (प्रज्ञा) स्थिर, एकाग्र, प्रतिष्ठित होय.]

**अन्वय :** महाबाहो । तस्मात् यस्य इन्द्रियाणि इन्द्रियार्थेभ्यः सर्वशः निगृहितानि–तस्य प्रतिष्ठिता प्रज्ञा।

**अर्थ :** आणि म्हणून हे महाबाहो अर्जुना, ज्याची–ज्या पुरुषाची–इंद्रियें इंद्रियार्था-विषया-पासून सर्वतोपरी सर्व बाजूंनीं निग्रह केलेलीं, आवरलेलीं आहेत, तो स्थिरप्रज्ञा पुरुष होय–त्याची बुद्धि प्रतिष्ठित - एकाग्र म्हणावी–(६८).

**म्हणौनि आपलिं आपणपेया । जरि इंद्रियें येति आया ।**
**तरि अधिक काहिं धनंजया । सार्थक असे ॥ ३५१ ॥**
**देखें कूर्मी जीयापरि । उवायिला आवेव पसरि ।**
**नातरी ईच्छावशें आवरि । आपणपेंचि ॥ ३५२ ॥**
**तैसिं यिंद्रियें अपैति होति । जयाचें म्हणितलें करिति ।**
**तयाचि प्रज्ञा जाणे स्थिति । पावलि असे ॥ ३५३ ॥**
**आतां आणिक येक गहन । पूर्णाचें चीन्ह ।**
**अर्जुना तुज सांगेन । परियस पां ॥ ३५४ ॥**

म्हणौनि आपलि ( =स्वतःची) आपणपेया ( =आपण होऊन, सहज,-स्वतः आत्मत्त्व देऊन)-आपणपया ( =आपणाला)=आपली इंद्रियें आपल्या स्वाधीन होतील तर. जरि इंद्रियें येति आया ( =स्वाधीन होतील). आकलन-ग्रहण होतील. तरि आधिक काहिं=दुसरें, निराळें, इतर, कांहीं, कोणतेंहि, थोडें, मुळींच. धनंजय = कृपीटयोनिः ज्वलनः वीतहोत्रः धनंजयः अग्निः. सार्थक असे=मग कांहीं इच्छिणें, मागणें (इच्छा, गरज, उद्देश-धर्म, अर्थ, काम, मोक्ष) नाहीं-(३५१). देखें जीयापरि कूर्मी उवायिला ( = आनंदांत असलेला, स्वेच्छ, शांत, प्रसन्न) आवेव (अवयव) पसरि. नातरी आपणपेंचि ( = स्वतःच) ईच्छावशें आवरि-(३५२). यिंद्रियें आपैति ( =वश) होति (३५३). आणिक गहन ( =गूढ, खोल) चीन्ह पूर्णाचें सांगेन परियस-(३५४).

## इंद्रियें अंकित तो स्थितप्रज्ञ—(३५१-३५३) :

याकरितां आपले आपणच आपणा स्वतःस जर का तीं इंद्रियें स्वाधीन झालीं-इंद्रियें आपलीं आपल्या स्वाधीन होतील, तर मग आणखी कांहीं तरी एक अधिकतेचें असें जन्माचें सार्थक होणारें होतें-(३५१)

कांसव (कूर्म) ज्याप्रमाणें का ज्या तऱ्हेनें खुषींत आला म्हणजे-प्रसन्न झाला म्हणजे-अवयव पसरतो, अथवा इच्छावशेंकरून-इच्छेला मोहित होऊन-इच्छेचा सेवक होऊन-आपण स्वतःच तीं आवरतो..(३५२)

..तशीं इंद्रियें अपैति म्हणजे वश अथवा स्वाधीन होतात, जयाचें म्हणितलें करतात तयाची प्रज्ञा स्थिति पातली आहे, असें जाण-(३५३)

## पूर्णाचें लक्षण—(३५४) :

आतां आणखी एक पूर्णाचें सर्वश्रेष्ठ अशाचें चिन्ह गहनतेचें-दुर्गम, खोल-असें तें अर्जुना, तुला सांगण्याचें करतों. अवधान-लक्ष दे-(३५४)

**या निशा सर्वभूतानां तस्यां जागर्ति संयमी ।**
**यस्यां जाग्रति भूतानि सा निशा पश्यतो मुनेः ॥ ६९ ॥**

[या=जी. निशा=रात्र. सर्वभूतानां=सर्व प्राणीमात्राची. तस्यां=तीजमध्यें. जागर्ति=जागृत असतो, जागृति ठेवतो. संयमी=इंद्रियनिग्रही पुरुष. यस्यां=जीमध्यें. भूतानि जाग्रति=प्राणिमात्र जागृत राहतात. सा=ती रात्र. निशा=रात्र असते-मुनेः पश्यतः=जागल्या म्हणजे ज्ञानवान् अशा पुरुषांची.]

**अन्वय :** सर्वभूतानाम् या निशा । संयमी तस्यां जागर्ति । भूतानि यस्यां जाग्रति । पश्यतः मुनेः । सा निशा ।

**अर्थ :** प्राणिमात्राची जी रात्र, संयमी इंद्रियनिग्रही तेथें त्या रात्रीमध्यें जागृत राहतो, जागृति ठेवतो; व ज्या रात्रीमध्यें सर्व प्राणिमात्र जागत असतात-जाग्रत राहतात, ती ज्ञानवान (जागल्या) पुरुषाची रात्र असते (६९).

[परमार्थज्ञान हा स्थितप्रज्ञाचा दिवस, पण मूर्खाची ती रात्र; विषयोपभोगांत निमग्न असतो हा मूर्खाचा दिवस पण सिद्धाची ती रात्र होय.]

**देखें भूतजात निदेलें । तेथेंची जया पाहालें ।**
**आणि जीव जेथें चेईले । तेथें निद्रिस्त जो ॥ ३५५ ॥**

**तोचि तो निरुपाधी । अर्जुना जो स्थिरबुद्धि ।**
**तोचि जाणें निरवधी । मुनीश्वर ॥ ३५६ ॥**

देखें भूतजात (=प्राणीमात्र) निदेलें (=निजलेले) = प्राणीमात्र जेथें आत्मस्वरूपीं निजले आहेत, तेथें–याचें पाहालें–उजाडलें व जीव जेथें जागे चेईले तेथें (विषयांत) हा निजलेला. तेथेंची जया पाहालें = उजाडलें. जीव जेथें चेईले (=जागे झाले) तेथें तो निद्रिस्त–(३५५). तोचि निरवधि (=उपाधिरहित, नेहमींच) मुनीश्वर–[ स्थिर = निग्रही, चिरस्थायी, दृढ. बुद्धि = अंतःकरणशक्ति, ज्ञान, विचार.]–(३५६).

**महासुखांत गुंतलेला ऋद्धिसिद्धि पाहत नाहीं—(३५५–३६५):**

पाहा कीं, प्राणिमात्र जेथें (आत्मस्वरूपीं) निजले आहेत तेथें–भूतजात निजलेले–तेथें ह्यास उजाडलें, दिवस उगवला, पाहालें, प्रभात झाली; व जीव जेथें चेईले–जागे होतात, जागे झाले–तेथें विषयांत का विषयाविषयीं हा निद्रिस्त–निजलेला–(३५५)

अर्जुना, तोच जो निरुपाधि अकपट परिशुद्ध असा–स्थिरबुद्धि तोच निरवधि अमर्याद सतत मुनीश्वर–(३५६)

**आपूर्यमाणमचलप्रतिष्ठं समुद्रमापः प्रविशन्ति यद्वत् ।**
**तद्वत्कामा यं प्रविशन्ति सर्वे स शान्तिमाप्नोति न कामकामी ॥ ७० ॥**

[ आपूर्यमाणं = चहूंबाजूंनीं पूर्ण, सतत भरलेल्या, अचलप्रतिष्ठम् = न चळतां स्थिर राहतो. समुद्रम् = समुद्राला. आपः = पाण्यानें भरलेल्या हजारों नद्या. यद्वत् = ज्याप्रमाणें. प्रविशन्ति = येऊन मिळतात. तद्वत = त्याप्रमाणें. सर्वे कामाः = अनेक, सर्व, नानाविध इच्छा. यं प्रविशन्ति = ज्या पुरुषामध्यें का पुरुषाला. स शान्तिमाप्नोति = तो शांतीस प्राप्त होतो. न कामकामी = वासनाधीन असा जो विषयांची इच्छा करणारा तो शांतीला प्राप्त होत नाहीं. ]

**अन्वय :** आपूर्यमाणम् आपः । यद्वत् । समुद्रं प्रविशन्ति । समुद्रः अचलप्रतिष्ठम् । तद्वत सर्वे कामाः यं प्रविशन्ति स शान्तिम् आप्नोति ।

**अर्थ :** चहूंकडून सतत पूर्ण भरलेल्या नद्या ज्याप्रमाणें–जरी समुद्राला मिळाल्या, तरी समुद्र अगदीं स्थिर राहतो, त्याप्रमाणें अनेकविध इच्छा ज्या पुरुषास भिडतात–त्याच्या मनांत प्रवेश करितात–तरी जो सागरासारखा निर्विकार असतो, तो शांतिप्रत पावतो–परंतु कामकामी म्हणजे विषयांची इच्छा करणारा वासनाधीन झाल्यानें शांतीस प्राप्त होत नाहीं (७०).

**पार्था आणीकहि परि । तो जाणों येयिल अवधारिं ।**
**जैसी अक्षोभता सागरिं । अखंडित ॥ ३५७ ॥**

**जऱ्हि सरितावोघ समस्त । परिपूर्ण होउनि मिळत ।**
**तऱ्हि अधिक नव्हे ईषत् । मर्यादा न संडि ॥ ३५८ ॥**

**नातरि ग्रीष्मकाळिं सरिता । शोषोनि जाति समस्ता ।**
**परि न्यून नव्हे पार्था । समुद्र जैसा ॥ ३५९ ॥**

**तैसा प्राप्तीं रिद्धि सीद्धि । तयासी क्षोभ नाहिं बुद्धि ।**
**आणि न पवतां न बाधी । अधृति तयातें ॥ ३६० ॥**

**सांगे सूर्याचा घरिं । प्रकाश काये वातिवेऱ्हीं ।**
**कीं न लाविजेचि तरि । अंधारिं कोंडेल तो ॥ ३६१ ॥**

**देखें रिद्धि सिद्धि तयापरि । आली गेलि से न करि ।**
**तो विगुंतला असे अंतरिं । महासुखिं ॥ ३६२ ॥**
**जो आपलेनि नागरपणें । इंद्रभुवनातें पाबळें म्हणें ।**
**तो केविं रंजे पालीवणें । भीलांचेनि ॥ ३६३ ॥**
**जो अमृतासि दीठी ठेवि । तो कांजी जैसा न सेवि ।**
**तैसा स्वसुखानुभवि । न भोगी रिद्धि ॥ ३६४ ॥**
**पार्था नवल हें पाहिं । जेथें स्वर्गसुख लेखणिये नाहिं ॥**
**तेथें रिद्धिसिद्धि कायि । प्राकृता होति ॥ ३६५ ॥**

आणीकहि परि = आणखी दुसऱ्या रीतीनें पूर्णपणें. अवधारि = ठरीव, निश्चयाचें कर, उच्चारणें. जाणों येईल = समजेल, उमजेल, कळेल, ओळखतां येईल. जैसी सागरिं अक्षोभता = शांतता, नच व्यग्रता, चांचल्य उद्वेग नाहीं. अखंडित = संतत (३५७). जन्हि सरिता–वोघ समस्त = सर्व नद्यांचे ओघ समस्त. परिपूर्ण होउनि मिळत = भरलेले पुरते होऊन एकत्र होत भेटतात, लाभतात, एक होतात, मिळतात. तन्हि अधिक नव्हे ईषत् = किंचितहि देखील, किंचित् मात्र अधिक न होतां. मर्यादा न संडि = सीमा ओलांडित नाहीं (३५८). ग्रीष्मकाळिं सरिता = उष्णकाळीं नद्या. समस्ता शोषोनि जाति = सर्वहि आटून जातात. पर समुद्र जैसा न्यून नव्हे = पण समुद्र कांहीं यत्किंचितहि अपुरा–उणा–होत नाहीं (३५९). रिद्धि सीद्धि प्राप्तीं = लाभ, प्राप्ति, परिपूर्णता, योगानें मिळविलेली सिद्धि, यशःप्राप्ती. रिद्धि = संपत्ति, समृद्धि, योगसाधनानें मिळालेलें ऐश्वर्य. तयासी क्षोभ नाहिं बुद्धि = त्याचे ठायींच्या बुद्धीस राग व्यग्रता, संतापणें, अस्वस्थता मुळींच होत नाहीं. न पवतां (रिद्धि सिद्धि) = यश व संपत्ति नच मिळतां महत्त्वाची झाली नव्हे तरी. अधृति ( = अस्थिरता, अधीरपणा, चंचलपणा ) तयातें न बाधी (३६०).

सूर्याचा(च्या) घरिं = सूर्याचा प्रकाश काय. प्रकाश काये वातिवेन्हीं = (दिव्याची) वात लावण्यानें होईल तेवढाच काय, दिव्याच्या वातीनें जेवढा. कीं (वाती) न लाविजेचि तरि तो अंधारिं कोंडेल = वात न लाविली असतां अंधारामध्यें अडकून पडेल, अंधारानें बंद केला जाईल,–त्यास अंधार आपल्या ताब्यांत ठेवील –(३६१). देखें तयापरि रिद्धि सिद्धि = त्याप्रमाणें योगानें यश का संपत्ति. आली गेलि से ( = आठवण, सई ) न करि = आली गेली तरी तिची मुळींच आठवण नाहीं. अंतरिं तो = अंतःकरणामध्यें, (हृदय चित्त मनामध्यें). महासुखिं विगुंतला = महासुखांत–आत्मानंदांत मग्न झाला (३६२). आपलेनि नागरपणें = शहाणपणानें, आपल्या घरच्या सौदर्यानें, ऐश्वर्यानें. इंद्रभुवनातें म्हणें पाबळें = तुच्छ, हलकें, क्षुद्र. तो केविं भीलांचेनि पालीवणें–पालवणे ( = पर्णकुटीनें–भिकार पालानें ) रंजे (३६३). जो अमृतासि दीठी ठेवि–"ठी" ( = नांवें, दोष, खोडी, उणेपणा ) ठेवि = दोष देतो. तो कांजी जैसा न सेवि = जो अमृत तसेंच ठेवतो, तो पेज पिणार नाहीं. तैसा स्वसुखानुभवि = आत्मसुख–ब्रह्मानंद अनुभवाचा का परिपूर्णतेचा का. न भोगी रिद्धि = योगानें मिळालेल्या यशःप्राप्तीचा कांहीं भोग घेत नाहीं–[ऋद्धि नामक ओषधि विशेषस्य–योग्यम्, रिद्धिः, सिद्धिः, लक्ष्मीः इति ४।] (३६४). नवल पार्था हें पाहिं = आश्चर्यकारक वाटेल हें पाहिल्यास–ऐकण्यास. जेथें स्वर्ग-सुख ( = देवलोकचें आत्मसुख ) लेखणिये ( = परवा, गणना, पर्वा ) नाहीं. तेथें प्राकृता ( = अल्प, सामान्य, क्षुल्लक ) रिद्धिसिद्धि कायि होति–प्राकृत = नीच [ = विवर्णः, पामरः, नीचः, प्राकृतः, पृथग्जनः, निहीनः, अपसदः, जाल्मः, क्षुल्लकः, इतरः, इति १० नीचस्य।] (३६५)

हे पार्था, आणखीहि एका तऱ्हेनें तो जाणतां येईल, पाहा कीं त्याचे ठायीं अखंडित अक्षोभता असते, जशी ती सागराचे ठायीं तशी–(३५७)

जरी का सर्व नद्यांचे ओघ समस्त परिपूर्ण होऊन (सागरीं) सागरास मिळतात–मिळाल्या म्हणाव्यात, म्हणावें तरी ते अधिक न होतां सागर जसा किंचितहि मर्यादा न सांडणारा–(३५८)

अथवा ग्रीष्म ऋतूमध्यें नदी–समस्ता नद्या–सरिता आटून जातात, पण त्यामुळें कांहीं न्यूनता आली आहे असें केव्हांहि नाहीं तसा का समुद्रच एक कीं तो..(३५९)

त्याप्रमाणें रिद्धि व सिद्धींची प्राप्ती तेथें त्याच्या बुद्धीस मुळींच क्षोभ नाहीं व रिद्धि सिद्धि नच पावल्या तरी त्या अधैर्य (अधृति) धैर्यनाश–बाधा करीत नाहीं–(३६०)

सांग बरें कीं, सूर्य जो त्याच्या घरीं काय दिव्याच्या वातीनें प्रकाश केला जातो व ती वात नच लाविली तरी तो अंधारामध्यें–अंधारानें–कोंडला जाईल..(३६१)

त्याप्रमाणें पाहा कीं, रिद्धि सिद्धि आली गेली तरी तो मुळींच (से) आठवणच मुळीं करीत नाहीं, अहो तो तर अंतःकरणाच्या महासुखामध्येंच कीं विगुंतलेला–मग्न झालेला असा–बुडालेला, तल्लीन असा–(३६२)

जो आपल्या ऐश्वर्यानें उत्तमत्वावर इंद्रभुवन तें पाबळें म्हणजे क्षुद्र म्हणतो, तो काय कसा बरें भिल्लांच्या पालानें रंजविला व्हावा–मनाचें त्याच्या रंजन झालें असें होईल–(३६३)

जो अमृताम नांवें ठेवितो–तेथचा उणेपणा का खोडी "ठी" ठेवतो, तो जसा कांजी सेवणारा केव्हांहि नव्हेच तसा स्वआत्मसुख अनुभवी तो रिद्धि भोगीत नाहीं–(३६४)

पार्था, नवल ते पाहा कीं, जेथें स्वर्गसुखाला किंमत नाहीं, तेथें रिद्धि सिद्धि त्या काय प्राकृतच कीं होणाऱ्या–(३६५)

**विहाय कामान्यः सर्वान्पुमांश्चरति निस्पृहः ।**
**निर्ममो निरहंकारः स शान्तिमधिगच्छति ॥ ७१ ॥**

[ विहाय = टाकून देऊन. सर्वान् = सर्व तऱ्हेच्या. कामान् = वासनांना, इच्छांना. यः = जो (पुरुष). पुमान् = पुरुष. निस्पृहः चरति = इच्छाशून्य वागतो, असतो, संचार करतो. निरहंकारः = अभिमानरहित (संचरतो). निर्ममः = ममत्वशून्य. स अधिगच्छति शान्तिम् = तोच ब्रह्मानंदाला मिळवितो, शांतिसुखाला प्राप्त होतो. ]

**अन्वय :** यः पुमान् सर्वान् कामान् विहाय निस्पृहः चरति निर्ममः निरहंकारः सः अधिगच्छति शान्तिम् ।

**अर्थ :** जो पुरुष सर्व प्रकारच्या वासना टाकून निस्पृह, इच्छाशून्य, ममत्वशून्य (निर्ममः) आणि अभिमानशून्य होऊन (निरहंकार) वागतो (चरति) तोच शांतिसुखाला मिळवितो–ब्रह्मानंदास प्राप्त होतो–(७१).

**ऐसा आत्मबोधें तोषला । जो परमानंदे पोषला ।**
**तोची स्थिरप्रज्ञ भला । वोळख तुं ॥ ३६६ ॥**

**तो अहंकाराते दंडुनि । सकळ काम सांडुनि ।**
**विचरे विश्व होउनि । विश्वाचीमाजी ॥ ३६७ ॥**

ऐसा आत्मबोधें तोषला–पोखला = पोसला, पुष्ट झाला. परमानंदे पोषला = सांभाळला, पोसला, बढती समृद्धीचा झाला, (पोषः पोषण, पोषक). तोची स्थिरप्रज्ञ = स्थिरबुद्धि भला ओळख (३६६). तो अहंकाराते दंडुनि = (यमनियमांनीं) शिक्षा करून. काम–मनोभवो मदनः इच्छा च कामः। सकळ काम ( = इच्छा, भोग्यवस्तु) सांडुनि. विचरे = फिरतो [ चर् + वि = हिंडणें, चुकणें, पाप करणें, विचार (ध्यान इत्यादि) करणें, शंका काढणें ]. विश्वाची ( = जगामध्यें, ब्रह्मांडामध्यें) माजी–(३६७).

**ब्रह्मस्थिति—(३६६-३७०) :**

याप्रमाणें आत्मबोधरूप ज्ञानी, आत्मबोधानें तृप्त झालेला, तो परम आनंदानें पोसला-पुष्ट झाला, तोच योग्य असा स्थिरप्रज्ञ वोळख, जाण, पाहा-(३६६)

तो अहंकारास, गर्व अभिमान अहंपणास दवडून लावितो; सर्व काम इच्छा-कामना इच्छा सोडून देऊन, अखिल सर्व कांहीं होऊन म्हणजे विश्व होऊन विश्वामध्यें-जगामध्यें-ब्रह्मांडामध्यें विचरतो, हिंडतो-(३६७).

**एषा ब्राह्मी स्थितिः पार्थ नैनां प्राप्य विमुह्यति।**
**स्थित्वा स्यामन्तकालेऽपि ब्रह्मनिर्वाणमृच्छति ॥ ७२ ॥**

[पार्थ = पार्था. एषा = आतांपर्यंत सांगितलेली ही. ब्राह्मी = (सप्त मातृकांपैकीं एक) सरस्वति, ब्रह्मशक्ति, ब्रह्मस्वरूपांत निमग्न करणारी. स्थिति = स्थिति, स्वरूप, रचना, अवस्था, स्वभाव, अविच्छिन्नता. एनां = ह्या अवस्थेला. प्राप्य = प्राप्त झालें असतां. न विमुह्यति = (मुह् + वि = गोंधळणें, बेशुद्ध होणें, चुकणें, मूढ होणें, वेडें करणें, भूल पाडणें, गोंधळविणें) = मोह, ममता, अहंता उत्पन्न होत नाहीं. अस्याम् = ह्या ब्रह्मस्वरूपांत निमग्न करणाऱ्या वृत्तीमध्यें. अंतकाले अपि = आयुष्याच्या अखेरच्या घटिकेसही-घटकेलाहि. स्थित्वा = स्थिर राहणारा वासनाशून्य योगी. ऋच्छति = (जाणें, मोह पावणें, पीडणें) पावतो, घट्ट होणें. ब्रह्मनिर्वाणम् = जन्ममरणरहित मुक्तीला-मोक्षपदाला पावतो. निर्वाण = संयोग, ऐक्य, शांत.]

**अन्वय :** पार्थ। ब्राह्मी स्थिति एषा। एनाम् प्राप्य। न विमुह्यति। अस्याम् अंतकाले अपि स्थित्वा। ऋच्छति ब्रह्मनिर्वाणम्।

**अर्थ :** हे पार्था, ब्रह्मस्वरूपांत निमग्न करणारी ही आतांपर्यंत सांगितलेली स्थिति होय. ही स्थितप्रज्ञाची अवस्था-ही ब्रह्मस्वरूपांत निमग्न करणारी अवस्था-प्राप्त झाली म्हणजे कसलाहि मोह होत नाहीं, कसलीहि ममता उत्पन्न होत नाहीं, कसलीहि अहंता उत्पन्न होत नाहीं; ह्या वृत्तीमध्यें-ब्रह्मस्वरूपांत निमग्न करणाऱ्या वृत्तीमध्यें आयुष्याच्या अखेरच्या घटकेलाहि असणारा (स्थित्वा) वासनाशून्य योगी मोक्षपदाला जातो, पावतो, जन्ममरणापासून मुक्त होतो-(७२).

**हे ब्रह्मस्थिति निस्सीम। जया अनुभवितां निष्काम।**
**ते पातले परब्रह्म। अनायासें ॥ ३६८ ॥**

**जे चिद्रूपीं मीळतां। देहांतिची व्याकुळता।**
**आड ठाकों न शके चित्ता। प्राप्ता जया ॥ ३६९ ॥**

**तेचि हे स्थिती। स्वमुखें श्रीपति।**
**सांगतसे अर्जुनाप्रति। संजयो म्हणे ॥ ३७० ॥**

**ऐसें श्रीकृष्णवाक्य आयिकिलें। तेथें अर्जुनें मनीं म्हणितलें।**
**आतां आमुचिया काजा आलें। उपपत्ती इया ॥ ३७१ ॥**

**जें कर्मजात आघवें। येथ निराकारिलें देवें।**
**तरि पारुषलें म्यां झुंझावे। म्हणोनियां ॥ ३७२ ॥**

**ऐसा श्रीअच्युताचिया बोला। चित्ति धनुर्धर उवायिला।**
**आतां प्रश्न करिल भला। आशंकुनिया ॥ ३७३ ॥**

**तो प्रसंग असे नागर। जो सकळ धर्मासि आगर।**
**किं विवेकामृतसागर। प्रांतहिन ॥ ३७४ ॥**

**जो आपण सर्वज्ञनाथ। निरूपीता होईल श्रीअनंत।**
**तें ज्ञानदेव सांगेल मात। निवृत्तिदास ॥ ३७५ ॥**

हे ब्रह्मस्थिति निस्सीम = सीमारहित (३६८). चिद्रूपीं = ज्ञानस्वरूपांत [चित् स्वरूप = ईश्वर. चित् = विचार, बुद्धि, मन, ज्ञान, चैतन्य, ब्रह्म. चिदात्मा = परमात्मा, विचारशक्ति. चिदाभास = जीवात्मा. चित्घन = परमात्मा. चित् + मय = परमात्मा, शुद्ध चैतन्य. चित् = थोडें कांहीं किमू इत्यादींशी]. प्राज्ञा चित्ता (तया) जया = त्या ज्ञानियाच्या मनाला. आड ठाकों न शके = (मनाला) प्रतिबंध करूं शकत नाहीं-(३६९). तेचि हे स्थिती = अविच्छिन्न स्वभाव (३७०).

ऐसें श्रीकृष्णवाक्य = भाषण, आज्ञा, नियम, वार्तिक. आमुचिया काजा आलें = ही युक्ति आम्हांला पटली. इया उपपत्ति = कल्पना, युक्ति, विचारसरणी (३७१). जें कर्मजात आघवें = सर्व कर्में. देवें येथ निराकारिलें = निषेधिलें. म्यां जुंझावे तरि पारुषलें = संपलें, खुंटलें; मी लढावें तें झुंजणें माझे तें थांबलें-बंद झालें. म्हणोनियां = आणि म्हणून. स्थितप्रज्ञाचें हें वर्णन ऐकून भगवंतांनीं कर्माचा निषेध केला असा अर्जुनाचा समज झाला (३७२). ऐसा धनुर्धर अच्युताचिया बोला उवायिला = हर्ष पावला, प्रसन्न झाला. आशंकुनिया आतां प्रश्न करिल-(३७३). (तो प्रसंग) नागर = सुंदर, मनोरम. सकळ धर्मासि आगर = उत्पत्तिस्थान. विवेक = सारासार विचार, वैराग्य. अमृत = सुधा, न मागतां मिळालेली वस्तु, प्रिय. प्रांतहिन = अमर्याद, पाररहित (३७४). सर्वज्ञनाथ = सर्व जाणणारा परमेश्वर, योगी, धनी. निरूपीता होईल = विचाराच्या अवलोकनास घेईल. श्रीअनंत = विष्णु, बलराम, शेष, चौदा गाठीचा हातांत बांधावयाचा रेशमी दोरा, ब्रह्म, आकाश (३७५).

ही निस्सीम अंतिम अशी ब्रह्मस्थिति, आत्मस्थिति, चैतन्यतत्त्व स्थिति, अवस्था, निष्काम निरिच्छ निकाम-निष्काम कर्मयोगी असे जे, तेंच अनुभवितात-व ते अशा सोप्या रीतीनें अनायासानेंच कीं परब्रह्म परमेश्वर होतात-(३६८)

जे चिद्रूपीं ब्रह्मीं ज्ञानमयाचे ठायीं चांगल्या अंतःकरणीं मिळाले असतां, त्या प्राज्ञाची-बुद्धिमानाची-ज्ञात्याची, (प्राज्ञ अभिमानी कारण देहाचा) देहांतींची, देहत्यागाच्या वेळची, व्याकुळता, विव्हळता, मन अंतःकरण विचाराच्या-चित्ताच्या आड उभी होत नाहीं-(३६९)

संजय म्हणतो कीं-तीच ही स्थिति, अवस्था, स्थिरता श्रीपति स्वमुखें-आपल्या मुखानें-अर्जुनाप्रति सांगत आहेत-(३७०)

## अर्जुन आशंका—(३७१-३७५):

असें श्रीकृष्णवाक्य-संपूर्ण श्रीकृष्ण अर्थवाहक पदसमूह-ऐकलें व अर्जुनानें मनामध्यें म्हणूं केलें कीं, आतां ह्या देवाच्या उपपत्ति आमच्या कामास आल्या-कामाच्या झाल्या-ही युक्ति आम्हाला पटली (उपपत्ति काजा आली)-(३७१)

कर्मप्रकार-कर्ममात्र-कर्मसमुदाय-कर्मजात जेवढें म्हणून तें अवघें सर्व येथें आतां देवानीं निराकारिलें, आकारशून्य केलें, परमेश्वरमय केलें, म्हणजे कर्माचा निषेध केला-(असें स्थितप्रज्ञाचें वर्णन ऐकून अर्जुनाचा-असा अर्जुनाचा समज झाला)-म्यां झुंजावें असें कांहीं जें देवाचें म्हणणें होतें तें आतां संपलें, खुंटलें-(३७२)

श्रीअच्युताचा बोल ऐकून, भला असा धनुर्धर चित्तीं उवायिला–आनंदित झाला, खुषीस आला, प्रसन्न झाला व आशंकून–संशय, कल्पना, वितर्क, भय घेऊन–आतां प्रश्न, जिज्ञासा, पृच्छा करील–(३७३)

तो समय संयोग प्रसंग नागर म्हणजे मनोरम सुंदर रसज्ञ सभ्य असा जो सकळ संपूर्ण धर्मास पुण्य सदाचरणाचा आगर कीं–अहो ! विवेक, सारासार विचार, वैराग्यरूपी अमृताचा सुधा, उदक, न मागतां मिळालेली वस्तु, देव, प्रिय, तेजस्वी असा, सागरच कीं एक प्रांतहीन, अंतहीन अमर्याद असा–(३७४)

तो आपणच श्रीसर्वज्ञनाथ–सर्व जाणणारा परमेश्वर–योगी, श्रीअनंत ते अवलोकनास देणार आहेत, विचारास आणणार आहेत–निरुपिता होणारा होत आहे–ती मात, गोष्ट निवृत्तिदासांचे ज्ञानदेव सांगत आहेत, सांगतील–(३७५)

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रह्मविद्यायां योगशास्त्रे
श्रीकृष्णार्जुनसंवादे सांख्ययोगो नाम द्वितीयोऽध्यायः ॥

[ श्लोक ७२. ओंव्या ३७५. एवम् ४४७. श्रीकृष्णार्पणमस्तु । ]

॥ हरिः ॐ तत्सत् ॥